गुणलब्धाः स्वयमेव संपदा ।

# मा णि क

लेखक :
नारायण विनायक कुलकर्णी

आवृत्ति दुसरी

सन १९३९

किंमत १२ आणे

# प्रस्तावना

—— ० ——

श्री. नारायणराव कुळकर्णी ह्यांचें नांव महाराष्ट्र-वाचक-वर्गास मशहूरच आहे. कादंबरीकार आणि नाटककार या दोन्हीं नात्यांनीं त्यांची ओळख सर्वांस आहेच. महाराष्ट्र-कुटुंब-मालेंत त्यांनीं पुष्कळ पुष्पें गोंविलेलीं आहेत. ही माला समाजाची सेवा व रंजन बरींच वर्षे करीत असली तथापि तीस अद्यापि मिळावा तितका भरपूर व भक्कम आधार प्राप्त झालेला नाहीं.

पूर्वीं माझे मित्र कै० सहकारी कृष्ण यांचे काळीं त्यांच्या मालेनें धिम्मेपणानें परंतु समोरील उच्च ध्येयावरील दृष्टि किंचित्‌हि ढळूं न देतां आपलें कार्य केलें. पुढें सहकारी कृष्णांच्या अपमृत्यूनें त्यांच्या कुटुंब-शिक्षण–मालेला मोठा धक्काच बसला !

त्याच उच्च ध्येयाचें उज्जीवन रा. खाडिलकर यांनीं दीर्घ प्रयत्नानें केलें आणि सुमारें आज सात वर्षे आपली ही नवी महाराष्ट्र–कुटुंब–माला चिकाटीनें तगविली आहे.

नुसत्या गोष्टी किंवा कादंबऱ्या लिहून रंजन करण्याचा या मालेचा उद्देश नाहीं. तर महाराष्ट्र–कुटुंबांत नवचैतन्य निर्माण करावें, महाराष्ट्र-कुटुंबांच्या समोर प्रस्तुत परिस्थितींतील बिकट प्रश्न ठेवून त्यांस विचारशील आणि कार्यप्रवृत्त करावें आणि महाराष्ट्र–कुटुंबांचें सर्वच जीवन परमोज्ज्वल व भाग्यशाली करण्याविषयीं प्रेरणा करावी हा या मालेचा प्रधान उद्देश आहे. वाचकांच्या भावनेच्या सूक्ष्म तारा खूप छेडल्या जाव्या आणि त्यांच्या बुद्धीचेंहि घुसळण होऊन तेजस्वी नवनीतनिष्पत्ति व्हावी हाच हिचा पोटांतला हेतु !

श्री. नारायणराव कुळकर्णी यांनीं मजूरप्रभृती आपल्या छोट्या कादंबऱ्यांतून महाराष्ट्र–समाजाला वेढून टाकणारे विषय व त्यांचें स्वरूप मनोरंजक पद्धतीनें आविष्कृत करण्याचा प्रयत्न या मालेंत अनेकवार केलेला आहे.

आजचा यत्नहि त्याच पूर्वींच्या दिशेनेंच झालेला आहे. आपल्यांतील इनामदार वर्ग म्हणजे एक फार जुनें खोड; वतन म्हणजे आमच्या

पूर्वेतिहासांतील एक मोठेंच मर्मस्थान होय. पंतांनीं दृष्टांतानें स्पष्टच अभिप्राय दिलेला प्रसिद्ध आहे कीं, या वतनांतले किडे होऊन बसल्या-योगानें आमचा एका दृष्टीनें मोठा अधःपात झालेला आहे. या वत-नाच्या दाव्यानें आमचा सारा उत्साह ठाणबंदी झाल्यासारखा झाला. त्यांत जेव्हां काप गेले आणि भोंकेंच राहिलीं असा वख्त आला तेव्हांची दुर्दशा पुसूंच नये! ते आमचे पंगू परंतु जळक्या सुंभासारखा पीळ शाबूत असलेले इनामदार आपल्याच कुर्‍यांत आणि तोर्‍यात राहून जगाकडे, प्रगतीच्या वाहत्या ओघाकडे पाठ करून बसलेले पाहून हे कधीं काळीं ताळ्यावर येतील किंवा नाहीं याची शंकाच वाटते!

प्रस्तुत कथेंत हाच प्रश्न मांडला आहे. मांडणी मनोरंजक तर केलीच आहे, परंतु या कथेची रचना श्री. नारायणरावजींनीं खरोखरच अत्यंत कुशलतेनें केली आहे असें कोणासहि दिसून येईल. एक तर या कथें-तील तीन मुख्य पात्रें म्हणजे माणिक, अण्णा व मनोहर या **तिघांच्या तीन मुखांनीं** सारी कथा सांगितली आहे. हा उपक्रम अगदीं **अभिनव रमणीय** आहे. एकच कथा, परंतु ती तीन ओघांनीं वाहवून त्या सार्‍या ओघांचा एकजीव करावयाचा हें कसब मोठेंच कटीण यांत संशय नाहीं. कथेचे हे तीन पेड एका कथासूत्रानें वळून त्यांची सुंदर वेणी घालण्याचें हें अवघड काम श्री. कुळकर्णी यांनीं फारच यशस्वी रीतीनें शेवटास नेऊन महाराष्ट्र–कथा-लेखकांपुढें एक **नवा आदर्श** ठेविला आहे यांत शंका नाहीं.

या कथेंतील रा. कुळकर्णी यांची भाषा घोंटीव दगडाप्रमाणें स्वच्छ आणि पाणीदार दिसते. सुंदर कथा, सुंदर भाषा आणि सुंदर विचार यांचा या कथेंत मनोहर संगम झालेला आढळतो आणि तिच्या वाचनानें मन प्रसन्न होतें. हातचा घेतलेला ग्रंथ खालीं ठेववत नाहीं आणि संप-ल्यावरहि अधिक वाचण्याची इच्छा अतृप्तच राहते.

आमच्या भरतभूमीचे पंचप्राण म्हणजे आमचीं खेडेगांवें! आम्हां भार-तीयांचीं उदार व निर्मळ अंतःकरणें अजूनहि तेथेंच राहतात. खरी मनाची श्रीमंती अद्यापिहि तेथेंच भेटते! अशीं आमचीं खेडेगांवें हाडाच्या

सांपळ्याप्रमाणें शुष्क होत चाललीं तरी आमचे डोळे उघडत नाहींत. आमची दृष्टि पुनः तिकडे वळावी, इनामाच्या हक्कानें त्यांचें रक्तशोषण करण्यापेक्षां निरपेक्ष सेवेच्या वर्षावानें तीं पुन: टवटवीत करणें हें आमचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य तडीस नेण्यास अंगीं कोणचे गुण बाणले पाहिजेत याचें विवेचन मरणाच्या दारीं उभ्या राहिलेल्या निर्मळ 'माणिक'च्या या कथेंतील अखेरच्या पत्रांत श्री. कुळकर्णी यांनीं अंतरींच्या कळकळीनें प्रतिपादन केलें आहे. खरोखर हिंदुस्थानाची संपत्ति म्हणजे त्यांतील हिऱ्या–माणिकांच्या खाणी नसून खेडेगांवांत वा कोन्याकोपऱ्यांत राहून कीर्तीची, नांवाची, पैशाची, प्रत्युपकाराची कसलीहि आशा न ठेवतां परमेश्वराला साक्ष ठेवून निरपेक्षपणें समाजासाठीं झिजणारीं देवमाणसें हीच होय. ज्या मातींत असलें सोनें पिकेल तिला सुवर्णभूमि कां म्हणूं नये, येथें देवांनीं निरंतर नांदण्याची इच्छा कां धरूं नये आणि त्याच मातींत आपलीहि माती पडून तिचें सोनें व्हावें असें आपणांपैकीं प्रत्येकानें कां इच्छूं नये ?

कार्तिक शु. ११ शके १८५३<br>२०।११।३१, पुणें, } दत्तो वामन पोतदार

## रसिकांचे सेवेशीं—

प्रिय वाचकांच्या हातीं माणिक कादंबरी देतांना माझ्या मनाला एक प्रकारचें विशेष समाधान होत आहे. मालेच्या ठरीव कालमर्यादेंत सदर कादंबरी अनेक बिकट अडचणीमुळें संपूर्ण करतां आली नाहीं, याची जाणीव मला आहे व त्याबद्दल मला अत्यंत वाईटही वाटत आहे. त्याबद्दल उदार हृदयाचे वाचक मला क्षमा करतील अशी मी आशा बाळगीत आहें.

माणिकच्या अंतरंगाविषयीं मला स्वतःला विशेष असें कांहीं सांगावयाचें नाहीं. त्या बाबतींत प्रो० दत्तोपंत पोतदार यांनीं कादंबरी वाचून अधिकारयुक्त वाणीनें प्रस्तावना लिहून मला ऋणी करून ठेवलें आहेच. त्याकरितां त्यांचें व माझ्या मनाच्या अत्यंत अस्वास्थ्याच्या स्थितींतही एकसारखें प्रोत्साहन देत राहून कादंबरी अथपासून इतिपर्यंत मजकडून लिहविण्याचें सर्व श्रेय ज्यांच्याकडे आहे त्यांचें—म्हणजे मित्रवर्य श्री. वामन श्रीधर पुरोहित बी. ए. व मित्रवर्य श्री. सदाशिव काशिनाथ गोखले, बी. ए., बी. टी. यांचें आणि निस्सीम प्रेम ठेवणाऱ्या ज्या आणखी कांहीं बंधुभगिनींचें उपकार-ऋण माझे शिरावर आहे त्यांचे साभार उल्लेख येथेंच करावयास पाहिजेत!

बंधुभगिनींचे, मित्रांचे, माझ्या आवडत्या माणसांचे, मलपृष्ठाकरितां आस्थेनें चित्र देणारांचे तसेंच आत्मीयतेनें पुस्तकाची सुन्दर सजावट करणाऱ्या माझ्या जिवलग मित्राचे अगत्यपूर्वक आभार मला मानलेच पाहिजेत. ते आभार मानून माणिकला प्रिय वाचकांच्या स्वाधीन करतांना सविनय विनंति कीं, माणिक कशीही भोळीभाबडी, खेडवळ असली तरी तिला संभाळून घ्यावी, तिच्या गुणाकडे पाहून दुर्गुणाकडे दुर्लक्ष करावें.

रसिकांचा नम्र,

**नारायण विनायक कुळकर्णी**



# मा णि क



## अण्णाचें अंतरस्थ



## प्रकरण पहिलें

### श्रीमंत इनामदार

सदरेवर राजाभाऊकडे आलेले प्रतिष्ठित पाहुणे, मी व इनामदार असे बसलों होतों. मध्येंच कशालासे राजाभाऊ इनामदार आमच्यांतून उठून आंत गेले. पाहुण्यांनीं राजाभाऊंच्याबद्दल सहजपणें प्रशंसोद्गार काढले. मलाही आमच्या श्रीमंत मित्राचें गुणवर्णन करण्याची उकळी आली. मी मोठ्या आढ्यतेनें पाहुण्यांना सांगूं लागलों—

“ अहो राजाभाऊसाहेबांच्याबद्दल वर्णन किती प्रकारें करावें ? त्यांच्या गुणांचें, त्यांच्या उदारपणाचें, त्यांच्या धाडसाचें, आम्हां मित्रमंडळीविषयींच्या कळकळीचें कीं त्यांच्या बेदरकारपणानें वागण्याचें आणि नेहमीं हंसतमुख असणाऱ्या त्यांच्या मनोवृत्तीचें ! आम्हीं मित्रमंडळी प्रसंगविशेषीं राजाभाऊंच्यासमोर त्यांच्या हरेक गुणांची थट्टा करतों—करीत असतों—आणि यापुढेंही नेहमीं करीत राहूं; कारण आमचें तें पवित्र कर्तव्य आहे

असें आम्हीं समजतों. श्रीमंत राजाभाऊ इनामदार आम्हांला आपल्या बरोबरीनें वागवतात, गाड्याघोड्यावरून हिंडवितात; आम्हांला क्षणभर कधीं विसंबत नाहींत. आमचीं गांवांत घरें आणि पेठेंत उद्योगधंदे असून सुद्धां आमचा विरह होईल म्हणून राजाभाऊ इनामदार आम्हांला महिनेच्या महिने आमच्या उद्योगधंद्याकडे पाहूं देत नाहींत कीं घराकडे फिरकूं देत नाहींत. धंद्यांत नुकसान आलें तर आपण भरून देऊं. घरांत कांहीं अडलें तर आमच्या कोठींतून पाठवून देण्याची व्यवस्था करतां येईल, असें वरचेवर राजाभाऊ आम्हांला बजावतात, पण म्हणतात कांहीं झालें तरी तुम्हीं माझ्यापासून दूर होत जाऊं नका! श्रीमंत इनामदारांच्या या थोर गुणांचें वर्णन करण्यासारखें नाहीं काय? मित्रमंडळीकरितां हवा तसा, हवा तितका खर्च बेगुमानपणानें कोण करायला बसला आहे? श्रीमंत असो कीं सावकार असो, कोणीही मायेचा पूत आपल्या मित्रमंडळींच्या जीवासाठीं वाटेल तशी झीज सोशील का? आम्हांला नाहीं वाटत कीं या कलियुगांत तरी असे खर्चिक हरीचे लाल फारसे सांपडतील! चांगलं नेहमीं जगांत फार थोडंच असतं. 'शैले शैले न माणिक्यं' असं म्हणतात तें अगदीं सत्य आहे. मात्र आमचे श्रीमंत राजाभाऊ इनामदार त्या दुर्मिळ माणकांपैकींच एक होत, हें आम्हीं प्रांजलपणानें आणि अत्यंत आनंदानें अगदीं झोपेंतसुद्धां कबूल करूं! कां नाहीं कबूल करणार? आज अनेक वर्षें अहोरात्र आम्हांला तसा त्यांचा अनुभव आहे ना? अनुभवावांचून कोण बोलणार? आम्हांला तरी एकाद्याची वृथा स्तुति करण्याची जरूरी काय?

बरें, राजाभाऊ म्हणजे मोठे थोरले पांचपन्नास हजारांचे इनामदार आहेत म्हणतां कीं काय? अहो मुळींच नाहींत. त्यांच्या इनामदारीचें उत्पन्न म्हणजे अवघें दहापासून पंधरा हजारांचें, पण स्वभाव काय, एकाद्या चांगल्या संस्थानिकाला लाजवील असा! पुष्कळ वेळां आम्हांलासुद्धां वाटतें आणि राजाभाऊंच्याजवळ बोलूनही दाखवितों कीं, 'बस्स! राजाभाऊ तुम्हीं इनामदार उगाच झालांत. त्यापेक्षां तुम्हीं संस्थानिक व्हावयाला पाहिजे होतं! तुमच्या गुणांचं मोल जगानं केलं असतं. सगळया जगानं तुमच्याकडे अगदीं आश्चर्यानं आणि डोळे फाडफाडून पाहिलं असतं!' त्यावर ते सुद्धां हंसून आम्हांला म्हणतात, 'मित्रमंडळी, तुमचं म्हणणं आम्हांला पटतं. पण

आम्हीं तरी काय करणार? कित्येक वेळां आमचं आम्हांला सुद्धां असं वाटूं लागतं, आपली ही इनामदारी आपल्या सुखाच्या संसाराला अगदीं अपुरी आहे. आपण संस्थानिकच असायला पाहिजे होतं! परंतु यांत आमचा कांहीं दोष नाहीं. दोष आहे तो आमच्या जनक वडिलांचा— दादासाहेबांचा! त्यांनीं आम्हांला इनामदार घराण्यांत दत्तक दिलें, त्याला आम्हीं आनंदानें कबूल झालोंच कीं नाहीं? आमच्या दादासाहेबांनीं आमच्याकरितां निपुत्रिक संस्थानिक गांठला असता, तर काय आम्हीं तिकडे दत्तक जायला नाखुष झालों असतों? पण त्यांच्याहि तें डोक्यांतच आलं नाहीं. आणि खरं सांगायचं म्हणजे आमच्या दादासाहेबांना मुळांत तसं थोडंसं डोकेंच कमी!' श्रीमंत राजाभाऊ असें जेव्हां आपल्या वडिलासंबंधानें देखील विनोदानें बोलतात, तेव्हां आम्हा त्यांच्या मित्रमंडळींना अलोट हसूं लोटल्याशिवाय राहात नाहीं.

हं, आमचे राजाभाऊ एकाद्या गर्भश्रीमंताप्रमाणें-किंवा गर्भइनामदाराप्रमाणें म्हणा वाटेल तर—गर्भश्रीमंत किंवा गर्भइनामदार नव्हेत, हें खरें, पण आम्हीं तुम्हांला अगदीं खात्रीपूर्वक सांगतों कीं त्यांच्या अंगांत उपजतसारखींच अगदीं श्रीमंतीचीं—इनामदारीचीं जागतीं लक्षणें आहेत. लहानपणचे त्यांचे खेळ, त्यांचे हट्ट, त्यांची वागणूक, त्याची मनोवृत्ति अगदीं श्रीमंती—इनामदारी थाटाची. त्यांच्या लहानपणीं कित्ती ज्योतिष्यांनीं त्यांच्या कुंडल्या वर्तविल्या, कित्ती हस्तसामुद्रिकांनीं त्यांच्या हाता—पायांवरच्या रेषा पाहिल्या त्याची दाद नाहीं! लोक म्हणतात, ज्योतिष आणि सामुद्रिकशास्त्र अगदीं झूट आहे. आम्हींसुद्धां तसें म्हणणाऱ्यांपैकींच! पण या बाबतींत मात्र सगळ्या बेट्या ज्योतिष्यांचीं आणि सामुद्रिक पाहणाऱ्यांचीं भविष्यें कशीं तंतोतंत उतरलीं. आम्हांला अगदीं आश्चर्य वाटतें ना!

बरें, वय तरी कांहीं फार आहे म्हणतां? अहो, नाहीं. अगदीं आमच्याच बरोबरीचे. कदाचित् आमच्याहीपेक्षां चार दोन वर्षांनीं लहानच असतील. तसेंच शिक्षण तरी फार झालंय? नाहीं. मुळींच नाहीं. अगदीं जेमतेम! शिक्षणाला त्यांना तसा फारसा वेळही मिळाला नाहीं; आणि खरें बोलावयाचें, तर पहिल्यापासून शिक्षणाकडे—पुस्तकी विद्येकडे—नुसत्या पोपटपंचीकडे—त्यांचें लक्षही कमीच! पण तसें असलें म्हणून काय झालें? दूर-

दृष्टि किती? पोंच काय? समयसूचकता काय? मनुष्यस्वभाव सहज जातां जातां ओळखण्याची हातोटी काय! त्यांच्यासमोर कोणी कां जाईना, नुसतें त्यांनीं एकदां त्याच्याकडे पाहाण्याचा आणि त्याच्या तोंडचा एकाद-दुसरा शब्द ऐकावयाचाच अवकाश कीं राजाभाऊंनीं त्याच्याबद्दल मनाशीं खूणगांठ बांधलीच! नंतर जे त्याच्याशीं बोलतील आणि त्याच वेळीं आमच्याकडे पाहून न कळत जे सहज डोळ्यांनीं सुचवतील त्या वेळीं आमच्या लक्षांत यायचें कीं राजाभाऊंनीं समोरच्याला ओळखून टाकला! आमच्यांत हें नाहीं. आम्हीं अगदीं प्रांजलपणानें कबूल करतों ना? राजाभाऊ ते राजाभाऊ आणि आम्हीं ते आम्हीं! आमच्यापेक्षां त्यांच्यांत कांहीं परमेश्वरानें ठेवलें आहे म्हणून ते इनामदार झाले आणि आम्हीं असेच्या असेच राहिलों.नाहीं तर काय? आतां राजाभाऊ आम्हांला आपलेपणानें जवळ करतात. आम्हीं त्याचा फायदा घेतों हेंच आमच्या बाबतींत जास्त म्हणायचें! आतां आमच्याशीं ते जसे खुल्या दिलानें वागतात, तसे सर्वांशींच वागत असतील अशी जर तुम्हीं कल्पना कराल कीं नाहीं, तर ती मात्र तुमची चूक होईल. ते सगळ्याशीं सारखे कधींच वागत नाहींत. आमच्याशीं निराळें, इतराशीं वेगळें. ज्याला त्याला पुरा ओळखून मग त्याच्याशीं तसे तसे वागतात! श्रीमंताला हेंच वागणें कठीण असतें. जगांत कोण कसें आहे, आणि कोणाशीं कसें वागायचें, हें श्रीमतांना फार फार चांगलें कळावें लागतें. नाहीं तर कोणाही श्रीमंताची जगांत धडगत राहिली नसती! राजाभाऊंच्या अंगीं तो गुण दांडगा. वाटेल त्याला ते अंगाशीं चिकटवून घेतील तें शक्य नाहीं! तसा कोणी प्रयत्न करूं लागला तरी त्याला राजाभाऊ हां हां म्हणतां असा सफाईनें झाडून टाकतात कीं यंव्! अशाच संबंधांतली राजाभाऊंची एक छोटीशीच गोष्ट सांगतों बरं का, म्हणजे राजाभाऊ केव्हां कुणाशीं कशी कशी गंमत करतात हें ध्यानांत येईल. विशेषतः गरिबींतून वर आल्यामुळेंच ज्यांना घमेंड झालेली असते; त्यांच्या डोळ्यापुढें तर राजाभाऊ चांगलेच काजवे चमकवितात ते असे—

आम्हीं, राजाभाऊ वगैरे मंडळी सहज एकदां पुण्याला गेलों होतों. पुण्याबद्दलची सर्वसाधारण माहिती तुम्हांला आहेच. 'उपर तो खूप—अंदरकी बात राम जाने' अशाचपैकीं तोंडओळखीचे गृहस्थ वाटेंत भेटले. त्यांनीं

राजाभाऊंना जरा उर्मटपणानेंच नमस्कार केला. आपल्या कर्तेपणाचा आणि चालत्या काळाचा त्यानें राजाभाऊपुढें या तऱ्हेनें बडेजाव मिरविला. आम्हांला तें चमत्कारिक वाटलें. राजाभाऊंनीं तें ओळखलें. पण ते बोलले नाहींत. त्यांनींच उलट किंचित् हंसून त्यांचा हात धरला आणि बरोबर चालविलें. थोडी औपचारिक चौकशी केली. बोलत बोलत आपल्या इतमामाला शोभेशा एका मोठ्या थोरल्या इंग्लिश तऱ्हेच्या उपाहारगृहांत घेऊन गेले. तेथें बरेचसें आणि बऱ्याच किंमतीचें खाद्यपेय मागवून यथेच्छ आडवा हात मारला. त्या गृहस्थाला हात मारायला लावत असतांना आम्हीं जवळ जवळ बसलों होतों. उपाहार चालू असतां हलकेच खालच्या हातांनीं राजाभाऊंनीं मला खूण केली. मी पाहूं लागलों. माझ्या हातांत राभाभाऊंनीं आपल्याजवळचें पैशाचें पाकिट दिलें आणि खिशांत ठेवण्याविषयीं इषारा दिला. माझ्या डोक्यांत तत्क्षणीं प्रकाश पडला. मीही सावधगिरीनें पैशाचें पाकिट माझ्या आंतील खिशांत हलकेच सारून दिलें. खाद्यपेयाचें आटोपल्यावर तेथील नोकर बशींतून बिल घेऊन आला, तेव्हां खिसे चाचपयाला सुरवात करीत, हलके हलके चेहरा बदलीत, आवाज चमत्कारिक काढीत राजाभाऊ आम्हांलाच विचारूं लागले, “अरे, हें काय ? आमचं पैशाचं पाकिट ? अरेच्या! दुसऱ्या कोटाच्या खिशांत राहिलं वाटतं ? तुम्हीं तरी आपलीं पाकिटं आणिलीं आहेत कीं नाहींत ?—” आम्हीही आपापले खिसे चाचपण्याचे चाळे केले आणि नकारघंटा वाजविली ! अखेर राजाभाऊंनीं आणलेल्या गृहस्थांनाच म्हटलें, “दोस्त ! घोंटाळा झाला पाहा ! आतां काय करणार ? आपल्याजवळ तरी पैसे आहेत ना ? नाहीं तर—” पण तो नाहीं कसा म्हणणार ? चेहरा वाईट केला पण चुंबत पैसे काढून बिल भागविलें. करतो काय ? राजाभाऊंना बुडवतां न येतां आपल्याच खिशाला चाट बसल्याचें दुःख त्याच्या चेहऱ्यावर आम्हांला स्पष्ट दिसत होतें. आम्हीं मनांतल्या मनांत हंसत होतों. राजाभाऊ प्रथम गंभीर होते. पण उपाहारगृहाच्या बाहेर येऊन त्या घमेंडानंदनानें उसन्या हंसण्याकरितां दंतपक्ती काढून निरोप घेतला आणि गेला. त्यानंतर “कशी खोड मोडली गुलामाची !” असें म्हणून ते खूप मोठ्यानें हंसले ! अशी राजभाऊंच्या अंगीं चाणाक्षपणाची चतुराई आहे.”

" काय रे काय ? कसली चालविली आहेस पाहुण्यांच्या पुढें टकळी ? अण्ण्या, बस्स कर तुझी बडबड ?—"

असा कानांवर आवाजाचा गडगडाट आला, चार शेलक्या शब्दांची माथ्यावर पुष्पांची वृष्टिही झाली. मीं मागें वळून पाहिलें, राजाभाऊ आलेले दिसले. आमचा विषय तितकाच राहिला. आतांपर्यंत मी सांगत असलेली हकीकत राजाभाऊंकडे आलेले पाहुणे ऐकण्यांत अगदीं दंग होऊन गेले होते. पण त्यांच्याही एकाग्रतेचा भंग झाला. ते कसेबसे—अस्ताव्यस्तच—बसले होते तेही राजाभाऊंना पाहून नीटनेटके सांवरून बसले. मी हंसत हंसत आपली कैफियत श्रीमंतांच्या चरणीं सादर करणार होतों. त्या अर्थानें जरा हंसलोंही, पण इतक्यांत इनामदारांच्या चेहऱ्याकडे माझें लक्ष गेलें. तों त्यांची नेहमींची चर्या दिसली नाहीं, त्यावर क्रोध धुमसत होता. खट्टूपणा हटून बसला होता. द्वेष वावरत होता. आणखी त्यावर काय काय होतें आणि काय काय नाहीं, याची मोजदाद मला निदान त्या वेळीं तरी करतां येणें शक्य नव्हतें. माझें हास्य जेथल्या तेथें थांबलें होतें. विकार नाहींसा झाला होता. तोंड वासल्याची कृति मात्र नेहमींच्या सरावाप्रमाणें अजून जशीच्या तशीच राहिली होती ! राजाभाऊंची मुद्रा एकंदरींत फिरलेली दिसली इतकें खरें ! पण त्या वेळीं एकदम त्यांना त्याबद्दल विचारणार कोण ? मी तर एखाद्या अपराधी चोरासारखा जागच्या जागीं चोरून बसलों.

इनामदारांच्या मुद्रेतील फरक नवख्या पाहुण्यांच्या लक्षांत येणें शक्यच नव्हतें; त्यामुळें राजाभाऊ जवळ येऊन आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें बैठकीवर बसतांच पाहुण्यांनीं राजाभाऊंकडे कांहींसें हंसत हंसत पहात म्हटलें, " इनामदारसाहेब, आपलं गुणवर्णन आणि आपल्याबद्दलची व स्वभावाची माहिती आपले अण्णासाहेब आम्हांला देत बसले होते. ऐकून फार फार आनंद झाला आपल्याला. आपल्यासारख्या थोर सद्गुणी श्रीमंताकडे पाहुणे या नात्यानें येण्याचं भाग्य आम्हांला लाभलं ही विशेष अभिमानाची गोष्ट आहे. आपली भेट झाली, सहवास घडला, पाहुणचार घेतां आला, अण्णासाहेबांकडून अनेक गोष्टी ऐकण्यांत आल्या आणि—"

" असं ! काय काय या लेकानं आमच्याबद्दल तुमच्याजवळ मुखरस पाघळला तें तर कळूं द्या. काय रे ये अण्ण्या, काय भकलास

पाहुण्यांच्याजवळ? कांहीं आमची निंदाबिंदा तर केली नाहींस ना आमच्या पाठीमागें!–"

राजाभाऊ मजजवळ येऊन व माझें आंग घुसळीत मला विचारूं लागले आणि म्हणूं लागले, "हं, बोल कीं अण्ण्या लेका, काय सांगत होतास पाहुण्यांना? बारा देशाला पाहुण्यांच्याबरोबर आमची निंदानालस्ती तर नाहीं ना धाडीत? तुम्हीं लेको कमी नाहीं करायचे! तुमच्यासारखे हलकट ज्या ताटांत जेवतील त्या ताटांतच विधि करतील. जाणून आहें मी तें! बोल अण्ण्या, लेका माझी नालस्ती या पाहुण्यांच्याजवळ काय केलीस? इतके दिवस आमच्या अन्नावर पोळासारखा पोसला आहेस तो काय आमची निंदा करण्याकरितां कां रे?—"

"छेः छेः छेः छेः! इनामदारसाहेब, अण्णासाहेबांनीं आपल्यासंबंधानें कोणत्याही प्रकारचा वांकडा शब्द—निंदाप्रचुर हकीगतीचा ब्र–काढला नाहीं अं! ते आतांपर्यंत आपल्या ठिकाणच्या थोर गुणांचीच प्रशंसा करीत होते!–" माझी बाजू घेऊन पाहुण्यांनीं राजाभाऊंना म्हटलें. घटके-पूर्वींचा राजाभाऊंचा चेहरा आतां राहिला नव्हता. त्यांत किंचित् फरक झाला. पाहुण्यांच्या कैफियतीनें स्वारी जराशी खुषींत आल्याचेंही दिसलें; तेव्हां माझ्या पण लक्षांत आलें कीं, आपल्यावर इनामदारांचा घुस्सा नाहीं. आंतून–घरांतूनच कांहीं तरी प्रकरण रंगून आलेलें आहे. माझ्या मनांत असा विचार येऊन जातो आहे नाहीं, इतक्यांत राजाभाऊंनीं माझ्या पाठीवर एक जोराची थाप मारली. मी चांगला कोलमडलोंच असतों पण तितक्यांतल्या तितक्यांत सांवरून बसलों.

"हें पहा पाहुणे, श्रीमंतांचें–आमचें हें प्रेम आहे बरं का? आल्या-बरोबर चार शिव्यांचा रतीब दिल्याशिवाय आणि पाठीवर थापट्या मारून माझ्या शरीराचा खुळखुळा केल्याशिवाय श्रीमंतांना चैनच पडत नाहीं पहा. आणि तसा प्रकार झाल्याशिवाय आम्हांलाही बरं वाटत नाहीं. रोजची संवय ना! राजाभाऊ, खरं आहे कीं नाहीं?"

"दातांच्या फारोळ्या काढून, डोळे पिचि पिचि करीत तोंड काय करतो आहेस आणखी?–बाकी, पाहुणे, हा अण्ण्या सांगतों आहे हेंच खरं बरं का? या लेकाशिवाय आम्हांला चैनच पडत नाहीं. आमच्या विश्वासाचीं जीं

काय चार दोन कुळं आहेत, त्यांपैकीं हें एक आचरट रत्न आहे. अहो, आमचा राग, आमच्या लहरी, आमच्या हातापायांची वळवळ, शिव्यांची हौस हीं सर्व आम्हीं आमच्या मित्रांवर आदळायचीं नाहींत तर कोणावर? जे आमचें ऐकत नाहींत ते आमचे स्नेही तरी कसले ?—" रंगांत येऊन राजाभाऊ वरीलप्रमाणें आमच्या स्तुतीचीं अशीं मुक्ताफळें उधळीत आहेत, इतक्या दरम्यान आंतून कुणी तरी डोकावलें. बांगड्यांचा आवाज ऐकायला आला. ओझरतें हंसरें तोंडसुद्धां राजाभाऊंना दिसलें. लगेच त्या दिशेकडे राजाभाऊंनीं डोळे मोठे करून पहात कान टवकारले. याच वेळीं बाहेरून बाबूराव–राजाभाऊंचा पहिल्या घरचा सख्खा वडील भाऊ–आणि त्याचा कोणी मित्र असे आंत आले. बाबूरावांकडून त्यांच्या मित्राचें नांव मी हलकेंच विचारून घेतलें. मनोहर असें त्याचें नांव कळलें. तो एक गरीब पण प्रतिष्ठित व कुलशीलवान् घराण्यांतील तरुण असून योगायोगानें बाबूरावाचा नुकताच मित्र बनला होता हेंही मी बाबूरावांकडून सहजीं काढून घेतलें. गरीब म्हणून ऐकल्यावर त्याकडे लक्ष देण्याचें किंवा राजाभाऊंचें मुद्दाम लक्ष वेधविण्याचें प्रयोजन मला मुळींच वाटलें नाहीं. हे दोघे व त्यांच्याबरोबरच इनाम जमिनीकडील शिवा, संभा, संतू, केरू, धारू वगैरे बरींच गरीब कुणबी कुळें आंत आलीं. त्या सर्वांनीं आपापल्यापरी राजाभाऊंस सन्मानिलें. बाबूरावांनीं किंचित् हंसल्यासारखें करून आपल्या श्रीमंत भावाचें स्वागत केलें; तर मनोहरानें नमस्काराकरितां कांहींसें कुऱ्यानें आणि नाखुषीनेंच हात उचलले. बाकी त्याच्याकडे आमच्या राजाभाऊंनीं लक्षच दिलें नाहीं कीं त्याला नुसतें बैसही म्हटलें नाहीं. कुणबी कुळांनीं मात्र मारे वांकवांकून आणि जमिनीपासून कपाळापर्यंत तीनतीनदां हात आणून, चांगली बत्तिशी वासून रामराम केले. श्रीमंत राजाभाऊ इनामदार यांनीं बसावयाला सांगितल्याशिवाय ते गरीब बापडे लोक एका बाजूला तरी बसणार कसे? ते आपले तसेच उभे राहिले. त्यांनीं श्रीमंतांचा असा मान राखला! पण तोच उर्मट मनोहर–शहाणा दिसत होता तो–राजाभाऊंनीं सांगण्यापूर्वींच दूर पण एका तक्याला टेकून मोठ्या ऐटींत खुश्शाल बसला कीं! राजाभाऊ आपल्या भावाशीं–बाबूरावाशीं तात्पुरते बोलले. बरे बोलले; पण त्याच

वेळीं मनोहराचा नुसता उल्लेखही न करतां किंवा त्याच्याकडे ढुंकूनही न पाहतां भाव मात्र असा व्यक्त केला कीं कशाला बाबूरावानें ही अनोळखी ब्याद आपल्याकडे आणली? आपल्या मित्राची अकारण हेटाळणी केल्याचें बाबूरावाला कांहीं वाटलें कीं नाहीं, याचा उलगडा त्यावेळीं तरी झाला नाहीं.

थोडा वेळ तसाच गेला. आमचें बोलणें तसेंच थांबलें. येणाऱ्या प्रत्येक माणसाकडे राजाभाऊंच्या पाहुण्याचें थोड्याशा कुतूहलानें व बऱ्याचशा चौकस नजरेनें पाहाणें चाललें होतें. राजाभाऊंना मनोहरानें नमस्कार नीट केला नाहीं, हें माझ्या नजरेंतून सुटलें नव्हतें व त्याबद्दल मला त्याचा रागही आला होता. पाहुण्यांनीं तें पाहिलें होतें हें मीं पाहिलें; पण त्याबद्दल त्यांना काय वाटलें हें मला कळलें नाहीं. त्यांच्या चेहऱ्यावर त्या वेळीं मला कसला विकारच दिसला नाहीं. राजाभाऊंविषयीं कुणबी कुळांनीं दाखविलेला आदर मात्र पाहुण्यांना अतिशय कौतुकास्पद वाटला असावा. कारण ते किती तरी वेळ राजाभाऊ आणि बाजूस आदबीनें उभे राहिलेले ते कुणबी यांजकडे आळीपाळीनें आणि चेहरा खुलून येऊन पाहात होते!

राजाभाऊंस त्या वेळीं तेथें आलेल्या मंडळीपैकीं कोणीही यायला नको होतें. आलेल्या मंडळींना निरनिराळ्या तऱ्हेनें मार्गाला लावावेत, असें मीं अगोदर ठरविलें; मी कांहीं बोलणार इतक्यांत राजाभाऊंचा हरकाम्या बाळक्या आंतून बाहेर आला आणि माझा व माझ्यामुळेंच राजाभाऊंचा जिगरदोस्त बनलेला गोपाळभय्या बाहेरून आंत आला. वड्याचें तेल वांग्यावर या न्यायानें इनामदारांनीं बाळक्यालाच चार शेलक्या शिव्या हांसडल्या आणि ताबडतोब चहा करून आणण्याबद्दल हुकूम फर्माविला. गोपाळभय्यास पाहतांक्षणीं राजाभाऊंचा चेहरा पुन्हां खुलून आला. लगेच माझ्या कानाशीं लागून गोपाळभय्याकडे आणि पाहुण्याकडे पाहात हंसरा चेहरा करून कांहीं सांगितलें. गोपाळभय्याला पाहिल्यावर त्याच्याकडे आणि माझ्याकडे राजाभाऊंकडून काय कामगिरी यावयाची हें अगदीं नेहमींच्या सरावानें ठरल्यासारखेंच झालें होतें! मीं ताडलें होतें तेंच तें काम होतें. इतरे जनांना तें कळूं नये एवढ्याचकरितां राजाभाऊ हलकेच कानांत बोलले इतकेंच. तरीही पाहुण्यांना, बाबूरावाला, मनोहराला आणि आणखी तेथें असलेल्या सगळ्यांना "...बरं का!......अगदीं आज रात्रींच

हं.........! बस्स ! दहानंतर... .....फक्त पाहुण्याकरितां .....माझा हुकूम......गोपाळभय्या करीलच तें सारें ...... नांव दूर देशीं जाणार आहे ...... त्यांनीं नांव काढलं पाहिजे....... आणि आमचा रसिक पणा–हो–बस्स! ......" असे कांहीं तुटक तुटक वाक्यप्रयोग ऐकायला येण्यासारखे होते. पण कोण त्याकडे विशेष लक्ष देणार आणि ती सारी कथा जुळवून त्यांतून राजाभाऊंचें रहस्य उकलण्याचा निष्कारण उपद्याप करणार ?

बाळक्यानें चहा आणला. पाहुण्यांनीं, मी व राजाभाऊंनीं चहा घेतला. बाबूरावानें नाकारला. मनोहराला विचारलेंच नाहीं. गरीब कुणबीकुळांना चहा विचारण्याचें तरी काय कारण? भलता मोठेपणा त्यांना पाहिजे आहे कशाला ? इनामदारी खाक्याचा चहा झाला. पान-तंबाखूचा यथास्थित बार भरला. पाहुण्यांना आपली गढी आणि शेजारचाच इनामी मळा दाखवायला न्यायचें ठरलें. राजाभाऊ कपडे करायला उठले. मीही कपडे चढवून सज्ज झालों. पाहुण्यांना इषारा मिळतांच तेही तयार झाले.

बाबूराव, त्याचा मित्र तो मनोहर आणि तीं कुळें तिथें तशींच सोडून आम्हीं बोलत बोलत त्या जागेतून बाहेर पडलों. दरवाजाच्या बाहेर पडा-यच्या आंत बाळक्या गडबडीनें आला. राजाभाऊंच्या कानाशीं लागला. त्याचें नीट ऐकूनसुद्धां न घेतां त्याच्या अंगावर खेंकसून राजाभाऊ, 'चल हट् गाढवा ! मला कांहीं सांगूं नकोस ! गाढव, मूर्ख, चोमडा" असें त्यावर ओरडले. बाळक्या लाचार होऊन आणि तिथेंच पोस्टाच्या पेटीसारखें तोंड वासून उभा राहिला आणि आम्हीं चालूं लागलों. वाटेंतून जातांना एकदां दोनदां उगीचच मनांत येऊन गेलें कीं " राजाभाऊ मघाशीं घरांतून संतापलेले आणि चिडलेले कां बाहेर आले ? बाळक्यानें त्यांना काय सांगितलें ? त्याच्यावर इतक्या तिरस्कारानें ते चवताळले तें कां? श्रीमंत सौभाग्यवती वहिनीसाहेब यांच्याच संबंधांत कांहीं जास्त कमी असेल का !—" पण ती वेळ त्यासंबंधाची चौकशी करण्याची नव्हती. तरी पण तें कळण्यासंबंधानें माझ्या मनाला चुटपुट लागली खरी. पण संधि साधून केव्हां तरी लवकरच त्याचा उलगडा करून घ्यायचा हें मात्र मीं मनाशीं ठरवून टाकलें.

---

# माणिकची मनोमंजूषा

## प्रकरण दुसरें

### माझ्या संसाराच्या सुरवातीस

"वहिनीसाहेब, धाकट्या वहिनीसाहेब, गरीबाची दाद घ्या! दया करा! आम्हां गरीब नाचाऱ्यांच्या वाली व्हा. तुमची कीर्त चांगली. तुम्ही गरीबांच्या कनवाळू आहांत, दयेच्या देवता आहांत! आमच्यासारख्या गोर-गरीबांच्या मायमाउली आहांत. म्हणून तुमच्या पायाजवळ धांव घेतली आहे. कसंही करा. पोटाशीं धरा, पाठीशीं घाला पण आमची अब्रू वांचवा. वहिनीसाहेब, इनामदारीणसाहेब, तुम्ही आम्हांला अभय दिलंत, तुम्हीं वाचविलंत, तुम्हीं आम्हाला राखण्याचं वचन दिलंत, तर आम्हां गरीबांचा तरणोपाय आहे. नाहीं तर आम्हांला नरकवास चुकविण्याकरितां देशो-धडीचा रस्ता सुधारल्याशिवाय गति नाहीं!......"

कुणब्याची–आमच्या मळ्यांतल्या वाटेकऱ्याची–एक तरणीताठी पोर माझ्याकडे कांहीं तरी गाऱ्हाणं घेऊन आली. माहेरची समळ्यांची

माणिक पण इनामदारीण झाल्यापासून जगरूढीप्रमाणें सासरीं माणिकची मी रुक्मिणी झालें होतें. टोपण नांवंही बरींच झालीं होतीं. दादासाहेब आणि सासूबाई मला ' सूनबाई ' म्हणत, तर केव्हां रुक्मिणी, नाहीं तर रुक्मिणीचं रखमा असं भारदस्तही नांव देत. तिकडून नुसतं ' अहो ' च असं केव्हां तरी म्हणायचं होई. बाकी वाड्यांतल्या सगळ्या लहान थोरांची, नोकर चाकरांची मी आपली वहिनीसाहेब झालें होतें. आणि मला माझ्या माणिक या माहेरच्या नांवाइतकंच वहिनीसाहेब म्हटलं म्हणजे आवडे. अगोदरच मी माझ्याचसंबंधानें कसल्या तरी विचारांत होतें—तेवढ्यांत कुणब्याची हरिणी ' वहिनीसाहेब, अहो वहिनीसाहेब ' अशी मोठमोठ्यानें ओरडत आली. तिच्या गाऱ्हाण्याकडे लक्ष जायच्या अगोदर मी आज स्वतःच्याच विचारात गुरफटलें. हरिणी समोर बसली होती तरी मी विचार करीतच होतें.

मी इनामदारीण! मी गोरगरीबांची, आमच्या वाड्यातल्या चाकरनोकरांची वहिनीसाहेब—मायमाऊली—बहीण धनीण! मला उद्देशून ' वहिनीसाहेब ' म्हणून उच्चारलेला शब्द माझ्या कानांत घुसला म्हणजे मनाला बरें वाटतें, जिवाला मोठेपणाची जाणीव येते आणि जराशी कुठें धन्यता वाटते न वाटते, इतक्यांत भुकेल्यांच्या दीन आरोळ्या, थंडी पावसानें कुडकुडणाऱ्यांच्या आणि भिजणाऱ्याच्या खडखडणाऱ्या दांतखिळ्या, प्राण आणि अब्रू वांचविण्यासाठीं कळवळून उच्चारल्या गेलेल्या करुण किंकाळ्या कानांवर येऊन जीव जागा होतो. आपल्या माथ्यावर दीनदुबळ्यांच्या जीवितार्चे, अब्रूचें संरक्षण करून त्यांचा दुवा घेण्याची जबाबदारी आहे हें लक्षांत येतें. सुदैवानें कीं दुर्दैवानें हें कांहीं मला सांगतां येत नाहीं, पण या जगांत मला मोठेपणा प्राप्त झाला होता आणि त्याबरोबरची जबाबदारीही माझ्या शिरावर येऊन पडली होती. मला त्यामुळें बरंही वाटत होतं आणि वाईटही वाटत होतं. जबाबदारीशिवाय मोठेपणा कुणालाच मिळत नसतो हें मला पहिल्यापासून माहीत होतं. इतकंच नव्हे तर तें माहीत होतं म्हणूनच मी अगदीं हट्टाहट्टानें जबाबदारीकरितांच मोठेपणा मिळविला होता! मी इच्छा धरली, माझ्या आईबापांपाशीं लाडकेपणानें धुसपुसलें. ते प्रसन्न झाले म्हणून म्हणा कीं प्रत्यक्ष देवाचीच इच्छा तशी फिरली म्हणून

म्हणा, मी एका मधल्या स्थितींतील आईबापांच्या पोटीं आलेली मुलगी खरी पण माझ्या पुष्कळशा रूपाच्या आणि कांहींशा शिक्षणाच्या जोरावर मी श्रीमंत–इनामदार–वहिनीसाहेब बरीक झालें. मोठेपणा आला, जबाबदारी आली. पहिल्या पहिल्यांदा मनुष्यस्वभावानुसार माझ्या लक्षांत नुसता माझा मोठेपणाच राही. त्यांतच सर्वकाळ मी मग्न असें. त्यांतच रंगलेली राही! माझ्या दासदासींनीं अष्टौप्रहर माझ्यापुढें हात जोडून उभं असलं पाहिजे. थुंकी झेलायला तत्पर असलं पाहिजे. नटणं, मुरडणं, हिंडणं, फिरणं, थोरामोठ्यांतून वावरणं, खाणंपिणं, सगळ्या प्रकारचे चोचले करणं, अष्टौप्रहर लहानापासून थोरांपर्यंत सर्वांकडून आपलं एकसारखं कौतुक करून घेणं, उगीचच कण्हणं–कुथणं, पाटावरून ताटावर आणि ताटावरून पाटावर करणं, इकडची काडी तिकडे न करणं, दुसऱ्याला पांडित्य दाखविणं, उपदेश करणं, सदासर्वदा–वेळीं अवेळीं गाद्यागिरद्यांतून लोळत राहणं, हीं आणि अशींच आणखी अनेक प्रकारचीं मोठेपणाचीं सोंगढोंगं समजलीं जातात, त्याची बाधा नाहीं म्हटलं तरी सुरवातीला मला थोडीफार झालीच होती. कांहीं कांहीं न कळत माझ्याकडून होत असे. कांहीं कळून वागत असे तर कांहीं कळे, तसं वागूं नयेसं वाटे, पण मनाला मोह अनावर होऊन आणि शेवटी नाइलाजानें मी तशी वागूनही जात असे.

माझें तसें वागणें–श्रीमंतीच्या आहारीं जाऊन श्रीमंतीच्या पचनीं पडून जर मी गेलें असतें तर शेवटपर्यंत टिकलें असतें. इतकेंच काय, पण मी त्या तशा वागण्यांतच बाकीच्या लोकांप्रमाणें आनंद, सौख्य आणि आयुष्याची इतिकर्तव्यता मानली असती. अज्ञानपणीं, शाळेंतल्या चिमण्या जगांतील बरोबरीच्या बालमैत्रिणीबरोबर ‘ मी जर सुदैवानें एकाद्या श्रीमंत घराण्यांत पडलें, तर तिथल्या श्रीमंतीला सत्कार्याला लावण्यांत मी माझें शहाणपण आणि आयुष्य वेंचीन. माझ्या गरीब मैत्रिणीच्या, बंधूंच्या, मित्रांच्या उन्नतीसाठीं सढळ हातानं साह्य करून माझी श्रीमंती सार्थकीं लावीन ’ यासारख्या केलेल्या बालिश प्रतिज्ञा मी लग्नानंतर केव्हांच विसरून गेलें असतें. उंबरांतल्या किड्याप्रमाणंच माझा वाडा, त्यांतले माझे चाकर नोकर, त्यावरची माझी अप्रतिबंध आणि अमर्याद सत्ता, तेवढ्यांत मिळणारा माझा मोठेपणा–एवढंच मीं माझं सुख मानलं असतं. सोमलांतले किडे सोमलां-

तच मरतात तशी मी माझ्या त्या सांचलेल्या–कुजलेल्या–नासलेल्या ऐश्वर्यातच मीही मरेपर्यंत वावरण्यांत आनंद मानला असता! पण माझं मन मुरदाड होईना. अगोदर कुठल्याही परिस्थितींत माझं आंतलं मन सदैव जागृत असेच. तेंहीं वेळोवेळीं 'अं हं! हें खरं नव्हे हं माणिक! इथं चूक होत आहे तुझी. एवढ्याकरितां तुझा जन्म खचित नाहीं' असें मला टोंचीत असेच. त्यांतूनही मन मुरदाड झालं असतं, पण अशाच वेळीं, कुणी तरी आमच्या गरीब कुळांपैकीं कसली तक्रार घेऊन येई. कुणी उपाशी मरतो–आमच्या पोटाची सोय करा म्हणून, तर कुणी दुष्काळ पडलाय–शेत पिकत नाहीं, खण्डाची सूट घाला म्हणून माझ्याजवळ धरणं धरून बसे. कुणी अन्न मागे, तर कुणी वस्त्र मागे. कुणी तरणीताठी पोर अब्रूचा बचाव करा म्हणून पाय धरी. त्यांच्या डोळ्यांतलं पाणी पाहिलं, करुण वाणी कानांवर पडली म्हणजे कसलं काय नी कसलं काय? माझ्या डोळ्यांत पाणी येई. हृदय कळवळे, मन हळहळे! दुःखितांचं दुःख नाहींसं करतां आलं नाहीं, उपाशी पोटांना अन्न घातलं नाहीं, गरीबांना उगाचच नाडायचं–छळायचं जर सोडलं नाहीं, तर कशाला आपण फुकट मोठे तरी झालों असें वाटे. आपण उंबरांतले किडे खरे, पण त्या बाहेरची जाणीव आपल्याला आहे; ती जाणीव कायम ठेवून त्याकरितां आपल्याला सतत राहिलेंच पाहिजे हें मनांत येई–मनांत अजूनही एकसारखं येतं म्हणूनच आपल्या वरील मोठेपणाबरोबरच्या जबाबदारीची माझी जाणीव जागी असते.

पण नुसत्या जबाबदारीची जाणीव असून तरी काय उपयोग? जबाबदारी पार पाडण्याची धमक जर अंगांत नसेल–इच्छा असून, मार्ग असून, सोय असूनही जर त्याचा आपल्याला कांहीं उपयोग नसेल, तर ती स्थिति–त्या जाणिवेची ती स्थिति–माणसाला अधिक जाचक नाहीं का होणार? ती जाणीव मनाला जास्त वेदना नाहीं का देत राहणार? कुणी साधन नाहीं म्हणून रडत असतं, हताश असतं; पण मजजवळ जबाबदारी संभाळण्याचं चांगलं मोठं थोरलं साधन असून मी अगतिक आहें; श्रीमंत, इनामदार, सर्वांची वहिनीसाहेब असून, अगतिक आहें, असमर्थ आहें, दुर्बल आहें, असं आतांशा मला वाटायला लागलं आहे. कां नये तसं वाटूं? आपल्या दत्तक चिरंजीवांच्या कुठल्याही भल्याबुऱ्या गोष्टीबद्दल

चिरंजीवांना बोलण्याचें धाष्टर्य नसलेल्या, सारा वेळ देवघरांत सुस्कारे सोडीत बसलेल्या सासूबाईंची वाढती उदासीनता पाहूं लागलें, त्याबरोबरच अगदीं जनक वडील असून आणि चिरंजीवांच्या इनामदारीचं वतन संभाळण्याकरितां दिवाणगिरी संभाळूनसुद्धां शेवटीं आपल्या चिरंजीवांच्या चाळयाकडे काणा डोळा—दुर्लक्ष असं दादांचं वर्तन पाहून आणि त्यांची कृतीपेक्षां बडबडच फार ऐकूं येऊं लागली तेव्हांपासून मनाचा खंबीरपणा डळमळूं लागला. कुटाळांच्या, गांवगुंडांच्या, दुर्जनांच्या, अण्णा, गोपाळभय्या यासारख्या नालायख, नादानांच्या घोळक्यांत अहोरात्र गुरफटून जाऊन स्वारी मलाही विसरूं लागली, मलाही महाग होऊं लागली, तेव्हांपासून माझा अगतिकपणा मला टोचूं लागल्याखेरीज कसा रहाणार !

साधल्याचे सोबती सारेच असतात. सारे तिकडचेच सोबती ! तिकडच्यासारखं बोलेल तो चांगला. त्याची पोळी पिकायची. त्याची चंगळ चालावयाची. तिकडच्या विरुद्ध ब्र उच्चारणाराचीं शंभर भरलींच समजायला हरकत नाहीं. आमच्या सासूबाई अगदीं ह्या ना ? त्यांना आपल्या दत्तक चिरंजीवाकडून थोडाथोडका त्रास पोंचत होता असें नाहीं; त्या दिवसांकांठीं दहा वेळां तरी आपल्याआपल्याशीं जळफळत नव्हत्या असेंही नाहीं; पण त्याच सासूबाईंच्या देखत तिकडच्याविषयीं एवढीशी नाराजी दाखविण्याची कांहीं सोय नव्हती. दुसऱ्या तिसऱ्यांची गोष्ट कशाला ? तिकडच्या एकाद्या होला मी ना केल्याचा जरा नुसता सासूबाईंना भास झाला कीं त्या लगेच माझ्याविषयीं कुरबुरायला लागायच्या. कपाळाला आंठ्या घालायच्या. केव्हां एकादा दुसरा शब्द मला उद्देशून बोलायच्या देखील. त्या म्हणायच्या ‘ हें पहा सूनबाई, आमच्या इनामदारांच्या घराण्यांत असं नाहीं बरं कांहीं चालायचं ! तूं मोठी शिकलेली न् शहाणी जरी असलीस तरी राजाभाऊचा शब्द खालीं पडलेला, नाहीं हो मला खपायचा ! पुरुषांचा पाणउतारा बायकांनीं करायचा ही नवी रीत जगांत असली तरी तिचा प्रवेश आम्हां घरंदाजांच्या इनामदार घराण्यांत मुळींच होतां उपयोगी नाहीं. तुझं शहाणपण तुझ्यापुरतं. तुझा तोरा त्याच्यावर चालतां कामा नये ! कसा झाला तरी पंधरा हजारांचा इनामदार आहे. दहांचा पोशिंदा आहे. तुम्हांसगळ्यांचा तो धनी आहे. तेव्हां त्याचा शब्द खालीं पडलेला, त्याचा अफ-

मान झालेला मला खपायचा नाहीं.' असं नाहीं तर अशाच सारखं वेळीं प्रसंगीं त्या बोलायच्या. पहिल्या पहिल्यादां मला त्यांच्या बोलण्याचा मनस्वी राग येई. पदोपदीं उलटून बोलण्याची अनावर इच्छा होई. शब्द अगदीं ओठावर येत पण मी प्रयत्नानें आवरायला शिकूं लागलें. तसें करतांना प्रयास पडत. मनाला भारी त्रास होई. श्रीमंतींच्या फुपाट्यांत येऊन पडलें नसतें तर फार चांगलं झालं असतं असें वाटे. रडूं देखील येई. लहान वयांत ज्या वेळीं मुलींचीं लग्नं होत नी माहेरून आईबापांतून, बहीणभावांतून मुलगी पहिल्यांदाच सासरीं गेली म्हणजे तिथल्या नवखेपणामुळें परकीपणामुळें तिला जो त्रास व्हावा, ज्या प्रकारची तिची मनःस्थिति व्हावी, त्याचाच अनुभव मला येत असे. त्यांतल्या त्यांत सासूबाईंचा स्वभाव आणि त्यांची घरांतली पराधीनता मला कळूं लागल्यावर त्यांच्या कोणत्याच बोलण्याचा मला राग येईनासा झाला. त्यांचें बोलणें, तिकडच्या भल्याबुऱ्या कृतीची कड घेणें, याबद्दल मी सासूबाईंवर रागावीनाशी झालें. असें किंवा तसें बोलण्याचेंही कारण मला दिसत नसे. मी कुठल्याच बोलण्याला अनुकूल वा प्रतिकूल उत्तर दिलं नाहीं, म्हणजे त्या मोठ्यानें बोलावयाचें सोडून देत. एक मोठा सुस्कारा सोडीत. तोंडांतल्या तोंडांत किती तरी वेळ पुटपुटत राहत. तशा पुटपुटण्यापैकीं एकादे वेळीं 'हं! आतां बडबडून उपयोग काय? एवढ्याचकरतां अगोदर पहावं सवरावं लागतं. शिकून कांहीं कुणाला मोठेपणा मिळत नसतो. मोठेपणा जन्माचाच असावा लागतो! अडांतच नाहीं तर पोहऱ्यांत कुठून येणार? जसं व्हायचं असेल तसं होईल. मी तरी त्याला काय करणार? ज्याचं नशीब त्याच्याबरोबर!' असं कांहीं तरी मला ऐकायला येई. माझ्या माहेरच्या गरीबीचा, माझ्या शिक्षणाचा उद्धार सासूबाईंच्या नाहीं तर आणखी दुसऱ्या कुणाच्याही तोंडून झाला तर पहिल्यांदा जसें मला वाईट वाटे, दुःख होई, राग येई, तसें आतांशा होईना. माहेरची गरीबी असली तरी त्याला कोण काय करणार? तोंडभर बोलणारीं माणसं माझ्या माहेरची गरीबी घालवीत नाहींत ना? तर शिक्षणाबद्दल कुणी कांहीं बोलूं लागले म्हणजे त्यांचा राग येण्याऐवजीं हंसू येई. कींव येई, एक प्रकारचा अभिमानहि वाटे. 'हो, आहेच मी शिक्षित! विद्यादेवीचा वरदहस्त माझ्यावर आहे, मला कळूं लागलें,

संपत्तीची अनिवार उधळपट्टी कुठं चालली आहे, दुर्गुण, व्यसनें, दुराचार, आळस यांची अव्याहत वाढ कुठं चालली आहे, सद्गुणांचा, सत्प्रवृत्तींचा, उन्नततेचा कोंडमारा एकसारखा कुठं होत राहिला आहे, हें माझ्या जाणिक मनाला चांगलं कळूं लागलं होतं, डोळ्याला दिसूं लागलं होतं; म्हणूनच माझ्या मनाची एकसारखी तगमग होऊन राहिली होती कीं अशाच एकाद्या ठिकाणीं आपण जाऊन राहिलं पाहिजे, तिथं धडपडलं पाहिजे. तिथें सारं आयुष्य वेंचून, हालअपेष्टा, कष्ट, दुःख सहन करून, आपल्या ज्ञानाचा उपयोग करून, आपण तिथलं वातावरण शुद्ध, पवित्र केलं पाहिजे. कुजलेली घाण काढून टाकली पाहिजे. तिथल्या संपत्तीचा ओघ वाईटाकडचा वळवून चांगल्याकडे आणला पाहिजे, असें ज्या शिक्षणानं मला शिकवलं; श्रीमंत घराण्याची घरधनीन व्हायला ज्याचा थोडासा तरी मला आरंभाला आधार मिळाला, त्याला कुणीं नांवं ठेविलीं, त्याचा उठल्यासुटल्या उद्धार केला, तर ते मला कसं खपेल?' पण अजाणांनीं तसा उद्धार केला तर त्याबद्दल मला राग येऊन तरी काय उपयोग? म्हणूनच मी रागावत नसे—कोणावर—कोणांवरच—सासूबाईच्यावर, दादासाहेबांच्यावर नाहीं तर खुद्द स्वारीवरसुद्धां रागावत नसें. रागावलें कीं कार्यनाश झालाच! त्या कार्यनाशाला जपे. मनाला पुन्हां पुन्हां जागें करी. बुद्धीला पुन्हां पुन्हां बजावून ठेवी. चित्ताला वेळोवेळीं दटावी आणि त्यांतच रागाला दडपून टाकी.

माझ्या हातीं अजून घरचीं सूत्रं यायचीं होतीं. सगळयांचा विश्वास, सगळयांचं प्रेम, सर्वांची सहानुभूति मला अजून मिळवायची होती. चंदन झिजूं लागल्याशिवाय त्याच्या अंगींचा सुगंध सभोंवार पसरणार कसा? या जाणीवेनें मी माझ्या शक्त्यनुसार झिजत होतें. मनाला, बुद्धीला, चित्ताला यथाशक्ति क्षणोक्षणीं कार्यक्षम करीत होतें म्हणूनच सगळ्यांचें ऐकून घेत होतें, सगळ्यांचे सगळे प्रकार सहन करीत होतें. माझ्या शिक्षणाचा—माझ्या ज्ञानाचा उपयोग सत्कार्याला जुंपण्यासाठीं आपल्या आहारीं आणण्यांत करावयाचा, दुसऱ्यांच्या आहारीं जाण्यांत करायचा नाहीं असा संकल्पच झाला होता, त्यामुळें मला सासरीं वागण्यांत थोरांचीं बोलणीं,

अधिकाऱ्यांचा जाच, वरिष्ठांचा क्रोध, चाकरनोकरांचाही उद्दामपणा हीं सर्व सहन करावीं लागलीं तरी मी करीत असें—करीत होतें—करीत आहें.

संसारांत शिक्षणाचा असाच उपयोग माझ्यासारखीनं नको का करायला? आणि खरं सांगूं का तुम्हांला? माझ्या वागण्याचा कळत वा नकळत उपयोग होतही असे. तूप खाल्लं कीं आम्हांला रूप दिसायला पाहिजे. श्रमाशिवाय सौख्य मिळायला पाहिजे. तपश्चर्येशिवाय ऋद्धि—सिद्धि आपल्या दारीं झुलायला पाहिजेत, असें प्रत्येकाला वाटत असतं, मला देखील वाटतं. पण मी विवेकानं त्या विचारांना वळवतें. त्याप्रमाणें शरीराला, मनाला वागवतें, म्हणून सासूबाईंना, दादासाहेबांना, तसा माझ्याविषयीं पुष्कळ आदर असे—आहे. विसाव्याच्या वेळीं माझी सगळीं-जणं वाखाणणी करतात, आपापसांत प्रशंसा करतात, बाहेरचीं कुणी माणसं आलीं तर त्यांच्याजवळ सढळ शब्दांनीं वाखाणणी करायला कमी करीत नाहींत हें माझ्या अनुभवाला पुष्कळ वेळां आलं आहे.

मी चांगलं बोलतें, चांगली वागतें, चांगल्यांचा कैवार घेतें; वाईटांचा तिरस्कार न करतां युक्तिप्रयुक्तीनें आणि गोडीगुलाबीनें न दुखवेल अशा तऱ्हेनें त्यांच्यांतला वाईटपणा दाखवून देऊन चांगल्या मार्गाकडे जायला प्रोत्साहन देतें हें माझ्या माहेरीं माझ्या लहानपणापासून सगळ्यांना माहीत होतंच. तो गुण सासरीं आल्यावर तरी कसा दडपून राहणार? तो प्रसंगविशेषीं उसळी मारून वर यायचाच! इनामदारांच्या—पांचपंच-वीस माणसें वावरणारांच्या—घरात तसले प्रसंग दरघडी किती तरी निर्माण व्हायचे, एवढं तेवढं कांहीं झालं कीं फिर्याद आपली धाकट्या वहिनीसा-हेबांच्याकडे--माझ्याकडे यायची. सासूबाईंच्याकडे गेलेल्या तक्रारी—फिर्यादी सुद्धां त्यांनीं खुशाल आपल्या माझ्याकडे धाडायच्या! दास असोत कीं दासी असोत, त्यांची फिर्याद माझ्याकडे आली म्हणजे मी दोघांच्या बाजू नीट ऐकून घेई. रागाचं, दुःखाचं, क्षोभाचं मूळ कुठं आहे, चूक कुणाकडे आहे हें पाही आणि हंसतहंसत पण फिर्यादीचा योग्य निवाडा देई. संता-पून, रागावून, धुसपुसत आलेले दोनही पक्ष हंसत हंसत—खेळीमेळीनें माझ्या न्यायनिवाड्यानंतर वावरूं लागले म्हणजे सासूबाईंना संतोष झाल्याचें दिसे. दादासाहेबही किंचित् खुषींत येत, असें दिसे.

याप्रमाणें मी सासरीं आलें त्यानंतर कांहीं थोड्या दिवसांनीं नोकराचाकरांवर हुकमत चालविण्याचा ताबा मीं माझ्याकडे घेतला म्हणा कीं माझ्याकडे आला म्हणा, किती दिवस तरी मी तेवढ्यावरच संतुष्ट होतें—खुशींत होतें–जवळ जवळ आत्मतृप्तच होतें म्हणा ना! कांहीं नाहीं. खायचं, प्यायचं, ल्यायचं, नेसायचं, आखायचं मिरवायचं, गाड्यामोटारींतून हिंडायचं नी त्याच्याबरोबर नोकरचाकरांवर–दासदासींवर हुकूम सोडावयाचे, सत्ता गाजवायची, भांडणंतंडणं तोडायचीं, यापेक्षा मला दुसरीं कसलीं कामं होतीं? हंसायचं, खेळायचं, गोडगोड बोलायचं, मधुर मधुर ऐकायचं! शाळेंतल्या सोबतीणींना, वर्गबंधूंना पत्रं पाठवायचीं; तीं पत्रं लिहिण्यांत आणि त्या पत्रांचीं आलेलीं उत्तरं वाचण्यात मिळेल तेवढा वेळ घालवावयाचा. हाच माझा लग्न झाल्यानंतर कितीतरी दिवस आंखल्यारेखल्यासारखा कार्यक्रम होत असे. सासूबाईंच्या, दादासाहेबांच्या आणि तिकडच्यासुद्धां मनासारखं वागलें कीं शाबासकी मिळे. थोडं मर्जीविरुद्ध झालं कीं निरनिराळ्या प्रकारांनीं पुष्पांजली मिळे. तशा पुष्पांजलीचा सासूबाईंचा वर एक मासला दिलाच आहे मी!

मला कधींमधीं मिळणाऱ्या शाबासकीचीही किंमत मला लवकरच कळूं लागली आणि पुष्पांजलीलाही महत्त्व किती द्यायचं हें माझं मी ठरवून ठेवलं. पण हलके हलके माझ्याच ध्यानांत येऊं लागलं कीं आपलं कांहीं तरी अजून चुकतं आहे. आपल्याला आहे यांत कांहीं संतुष्ट राहाण्यासारखं नाहीं! नोकराचाकरांवर–दासदासींवर तेवढी मीं हुकमत चालविली, त्यांची खोटींनाटीं गाऱ्हाणीं ऐकलीं, तात्पुरतीं भांडणं तोडलीं म्हणजे माझ्या आयुष्याचं इतिकर्तव्य झालं कीं काय? आमची इनामदारी किती किंमतीची आहे? तिची स्थिति कशी आहे? तिच्यावर कर्ज किती आहे? कां आहे? तें फेडण्याची कशी व्यवस्था आहे? जे आपल्या इनामदारीवर अवलंबून आहेत, त्यांची अवस्था काय आहे? त्याचें आपल्याकडे किती लक्ष आहे? इनामदारीचा खराखुरा उपयोग घेतला जात आहे का? कां तें सारं, कसं तरी, कांहीं तरीच चाललं आहे? तें पहात कोण? तें मला कां कळूं नये? मी त्याकडे लक्ष कां देऊं नये? माझी त्या बाबतींत कुणी सल्लामसलत कां घेऊं नये? असे एकेक विचार माझ्या मनांत येऊं लागले. त्या कारणानें

जराशी मी असंतुष्ट राहूं लागलें. कधींमधीं त्याबद्दल तिकडे विचारण्याचा मीं धीर करी. पण मला मनासारखं उत्तर कसें मिळणार? तिकडे कुठें नीट आपल्या इनामदारीकडे लक्ष द्यायचं होत असे? तें मला नीट उत्तर मिळणार? मागील अंकावरून पुढें चाल्ू यांप्रमाणें, अगोदरच्या इनामदारांनीं जशी इनामदारी गाजविली असेल तोच कित्ता चालू इनामदार गिरविणार! निराळेपणा त्यांत करण्याची कुणाला कशाला जरूरी वाटावी? त्यापैकीं मी कांहीं विचारलं कीं अगोदर दुर्लक्ष होई, मग 'तुम्हांला बायकांना करायचं काय त्याच्याशीं? नसत्या उठाठेवी पाहिजे आहेत कशाला?' अशीं उत्तरें, जास्तच झालं तर मिळत. नंतर तर विचारण्याचं पाप केलं कीं खूप रागावायचं होई; वेळीं अंगावर धावूनसुद्धा यायचं व्हायला लागलं?

अशानें मात्र मला कसंसंच होऊं लागलं. मनाचा धीर सुटूं लागला. कल्पनेंत उभविलेले मनोरे कोसळायला सुरवात झाली! मनाला एकेक चटका बसूं लागला! रोज एक दोन गोष्टी नव्या दिसूं लागल्या. चार दोन ऐकायला येऊं लागल्या! इनामदाराच्या चालीरीति कळूं लागल्या, अंतरंग उमजूं लागलं तसा जीवाचा थरकाप होऊं लागला! भवितव्याला जीव भिऊं लागला! काय केलं म्हणजे माझ्यासारखी प्रत्येक गोष्ट होऊं लागेल आणि मनाला विरंगुळा मिळेल हेंच कळेनासं होऊं लागलं!

अलिकडे मेलीं चाकरमाणसंसुद्धा माझ्याशीं नीट वागेनाशीं झालीं होतीं. बाळक्या इतका बावळा पण माझ्याशीं उर्मटपणा करायला लागला होता तर त्याची बायको येसू आपला मुर्दाडपणा मला चांगलाच जाणवूं लागली होती. आपली खरशाल निलाजरेपणानं तिकडच्या पुढें हवी तेव्हां नी हवी तशी फलकावे मारी. तिचं हें वागणं तिकडेच जर खपे तर माझं तिथं काय चालणार? तिकडचीच तिला तसं वागायची फूस दिसल्यावर मला संताप आल्याखेरीज कसा राहील बरं? त्याच बाबतींत मी तिकडच्यावर जरा रागावलें होतें. जरा जपून बोललेंसुद्धां होतें. पण त्या सांगण्याचं केवढं तरी तारांगण केलं होतं तिकडून! डोळे काय वटारले, हात काय उगारले, जेवण काय केलं नाहीं नी डोक्यांत राख काय घातली! अगदीं नाना तऱ्हा केल्या! मी म्हणतें पायांतला पायपोस डोकीवर का घ्यायचा असतो? पण आमच्या इनामदारांच्या घरांत आपली ही रीत!

मी त्या येसूच्या विरुद्ध बोललेलं कांहीं खपलं नाहीं–खपायचं नाहीं. पण ती माझ्यादेखत कशीही वागली, तिकडच्या समोर कितीही वेळां गेली, स्वारीशीं हंसली खिदळली, तिनं माझा अगदीं पावलोपावलीं पाणउतारा केला तरी त्याबद्दल मी मात्र तिला काहीं बोलतां कामा नये!

आज तीन चार दिवस अस्सं चाललं होतं. मी तिकडच्यावर रागावलें होतें. पण माझी चौकशी मुळींच केली नाहीं. माझ्याकडे ढुंकून पाहिलं नाहीं कीं एका शब्दानं सुद्धां विचारलं नाहीं. आपण, आपली मित्रमंडळी आणि त्यांतल्या चैनी यांतच दिवस घालविणं चाललं होतं. तीन चार दिवसांनीं माझाच राग जरासा आपोआप शांत झाला. तितक्यांत माझ्या बालमैत्रिणीं-चींही कांहीं पत्रं आलीं. मनाला, विचाराला निराळा व्यवसाय मिळाला. त्या निमित्तानें तिकडे कांहीं बोलायचं मी ठरविलं. नावडते विषय बाजूला सारून बोलायला हरकत काय? म्हणून आलेलीं मैत्रिणींचीं पत्रें तिकडे वाचून दाखविण्याकरितां आणि त्यावर दोघांनीं विचारविनिमय करण्या-करितां म्हणून बाळक्याला मी बाहेर सदरेवर बोलवायला पाठविलं. येण्याची अगदीं उत्कंठेनं वाट पाहात बसलें. पण येणं तर झालं नाहींच, उलट मित्रपरिवाराला घेऊन कुठं बाहेर जातांना बाळक्यावरच वस्सकन ओरडायचं झालं! तें ओरडणं आंत मीं बसलें होतें तिथं मला ऐकायला आलं! माझ्या बोलावण्याला तो स्पष्ट नकारच होता. त्या नकाराचा घाव काळजा-वर बसला. तशीच जागच्याजागीं बसून राहिलें. हातांतलीं पत्रें तशींच गळून खालीं पडलीं. उठून स्वतः बाहेर जाण्याची आणि भेटण्याची इच्छा मला झाली नाहीं. अलीकडे माझं वर्चस्व वाड्यांत स्थापण्याकरितां, माझ्या शिक्षणाचं चीज करण्याकरितां मी शिकस्तीनें धडपडूं लागलें होतें. माझ्या मैत्रिणी पत्रांतून—'इनामदारीण–बाईसाहेब नुसतीच झाली आहेस. पण श्रीमंतीण होऊन अजून केलं आहेस काय! करते आहेस काय?' अशा टोंचीत बोंचीत होत्या. आजच्याही पत्रांत तसंच होतं. मी तींच पत्रें वाचीत होतें. त्यावरच विचार करीत होतें. त्यांतच मन व्यग्र झालें होतें—'कसली मी बाईसाहेब—श्रीमंत वहिनीसाहेब,' असल्या विचारांत मन कुठल्या कुठं वहावलं होतं; तें इतकं कीं, किती तरी वेळ रडत गाऱ्हाणीं घेऊन येऊन हरिणी समोर बसली होती हेंदेखील मी विसरलें होतें. हरिणी

समोर असून मला कांहीं दिसत नव्हतें. पण शेवटीं माझें लक्ष समोर पडलेल्या मैत्रिणींच्या पत्रावरून आणि माझ्या स्वतःच्या मनःस्थितीवरून ही उडालें व हरिणीनें "वहिनीसाहेब, गरीबाचं गाऱ्हाणं तुम्हींही ऐकत नाहीं ! तुम्हींही लक्ष देत नाहीं. तुमची मर्जी! माझंच कमनशीब समजतें ! वाटलं होतं तुम्हीं गरीबाचं गाऱ्हाणं ऐकाल–लक्ष द्याल–जवळ घ्याल–अब्रू वांचवाल—दयेची भीक घालाल–पण तुम्हांलाही नाहीं करुणा येत! नाहीं बुद्धि होत! हरीची इच्छा! जातें मी! वहिनीसाहेब, क्षमा करा! मी पुन्हां आपल्यापुढें गाऱ्हाणीं गायला कधींही येणार नाहीं—" असल्या करुण शब्दांनीं मला भानावर आणलें. हरिणीच्या वाणीनं आणि शब्दांनीं माझ्या हृदयाची कालवाकालव झाली. माझे विचार, दुःख तत्क्षणीं बाजूला लोटलें. हरिणीचं गाऱ्हाणं ऐकायला मी तयार झालें. गरीबांचीं गाऱ्हाणीं प्रथम ऐकणं हें माझं ब्रीद होतें. हरिणीला धीर देत मी लगेच म्हटलें, " हरिणी, काय आहे तुझी कागाळी? सांग काय ती?—"

---

# प्रकरण तिसरें

## हरिणीची टाप!

हरिणीचें गाऱ्हाणें मी ऐकायला तयार झालें. पण ती जास्त आणि स्पष्ट असं कांहींच सांगेना. नुसतं मोघमच बडबडत होती. ती स्पष्ट कांहीं सांगेना व मला मोघम कांहीं कळेना. मी तिला सांगण्याविषयीं आग्रह करूं लागलें तशी ती जास्तच रडूं लागली आणि एकेक शब्द बोलायचा कमीच करूं लागली. त्यांतून ती कांहीं सांगण्याच्या तयारींत होतांशी दिसली. इतक्यांत मध्येंच येसू कशालाशी तिथं आली आणि कांहीं तरी शोधायच्या निमित्तानं तिथल्या तिथंच घुटमळूं लागली. माझं ओझरतं लक्ष तिच्याकडे गेलं. ती हरिणीकडे चांगली रोंखून पहात होती असं मला दिसलं. कदाचित् हरिणीनंही तिच्याकडे पाहिलं असावं. आणि म्हणूनच ती जें कांहीं सांगण्यासाठीं आली होती, तें तिनं सांगण्याचं टाळलं असावं. तिनं तिथं असावं

असें मलाही वाटलं नाहीं. पण तिच्या लोचटपणाला सीमा नव्हती. एरव्ही ती लवकर सुद्धां गेली असती. पण खरंच जर मीं तिला सांगितलं असतं तर गेली असती कीं नाहीं, निदान सहजासहजीं तरी गेली असती कीं नाहीं, याची मला शंकाच पडली, म्हणून मी तिला कांहींच बोललें नाहीं. ती हरिणीकडे अगदीं चमत्कारिक नजरेनंच पहात होती. तिचा–तिचा संबंध काय ? तिच्याविषयीं तिरस्कार, मत्सर, उपहास, राग, द्वेष कीं हेटाळणी येसूच्या मनांत असावी हें कळणें शक्य नव्हतें. तसं तिचं तोंडच मुळचं अगोदर चमत्कारिक होतं, त्यांत हरिणीकडे पहातांना तिनं असं कांहीं आपलं तोंड बनवलं होतं, कीं तुम्ही त्यावर बसवाल ती कल्पना बसत होती ! हरिणी मला काय सांगते तें येसूला ऐकायचं होतं म्हणून ती घुटमळत होती तर त्याच कारणानं हरिणी बोलती बंद झाली होती. नुसती रडतच राहिली. माझी मात्र नुसती कुचंबणा होऊं लागली ! हरिणीचं गाऱ्हाणंच जर मला समजलं नाहीं, फिर्यादच कळली नाहीं, तर मी स्वत: कितीही शहाणी असलें तरी तिची समजूत काय घालणार माझं कपाळ ? तिचं गाऱ्हाणं, तिची फिर्याद कुणावर ? कुणाच्या विरुद्ध ? हें तिनं स्पष्ट सांगितल्याखेरीज मला कळणार कसं ?

तिच्या त्या नुसत्या रडण्यानें आणि घुम्मेपणानें मी अगदीं वैतागायच्या, संतापायच्या बेताला आलें. पण त्या गरीबावर संतापू तरी कशी ? तिचा नवरा तिला घरीं कांहीं त्रास देतो आहे कीं सासू छळते आहे, सासरा नांदू देत नाहीं कीं आईबाप तिला नांदवू देत नाहींत, का शेजारीपाजारी तिच्या उण्यावर उठताहेत ? काय झालं आहे तरी हरिणीला ? कसलं तिला दु:ख होत आहे ? ती कां रडते आहे ? पण हरिणी बोलल्याशिवाय मला तें समजणार कसं ? मी तिला समजावूं कशी ?

हरिणी कांहीं सांगेना तरी तिच्याबद्दल माझंच मन तिच्यासंबंधानें निरनिराळे भाराभर प्रश्न करून मला भंडावून सोडूं लागलं. ती आपला घुम्मेपणा सोडीना; तशी थोड्या वेळानें जराशी कंटाळूनच येसू तिथून निघून गेली. जातांना ती माझ्या पाठीशीं होती. जातां जातां माझ्याकडे पाहून आणि मला उद्देशून तिनं कांहीं चाळे केले किं काय ? कांहीं हात नाचवले कीं काय ? नकळे ! पण तसं तिनं कांहीं तरी केलं असावं असा मला

संशय मात्र आला. अलीकडे येसूसंबंधानं मला असंच होऊं लागलं होतं. तिची वागणूकही तशीच होत असे, माझा संशयही दुणावत असे. मी तिच्यासंबंधानें दिवसेंदिवस चिडखोर, संतापी, द्वेषी बनत चाललें होतें आणि तीही तशीच माझ्याविषयीं बेफिकीर, निर्भय आणि उर्मट बनत चालली होती! घरांतली—स्वयंपाकघरांतलीं—आणि वरचीं कामं करायला राहिलेली एक यःकश्चित् बाई, पण तिचाच दिमाख दिवसेंदिवस माझ्या डोळ्यादेखत दिसूं लागला होता! मला वें एक दरघडी बोंचणारं—टोचणारं—सलणारं शल्यच झालं होतं, हें आतां आतांशा माझ्या ध्यानांत यायला लागलं होतं. हें मलाच एकटीला घरांत दिसत होतं का? सासूबाईंना दिसत नव्हतं का? दादासाहेबांच्या ध्यानांत येत नव्हतं का? तिकडे कळत नव्हतं का? हं! न कळायला काय झालं? सारं कांहीं तिकडे कळत होतं पण तिथंच तर सारं घोडं पेंड खात होतं ना? येसूला तिकडचीच फूस मिळत होती कीं नाहीं? मग ती कां न शेफारेल? केव्हां तिच्या रूपाचंच वर्णन करायचं; तर केव्हां तिची उगीच वाटेल तशी थट्टामस्करीच करायची. कधीं अगदीं माझ्या देखत येसूचा पदर धरून म्हणावयाचं, "असलं हें जाडं भरडं आणि हलकं लुगडं असलं तरी येसूला 'जातीच्या सुन्दरांना कांहींही शोभतें!' तसं शोभतें आहे. येसूला एकदां चांगलंसं लुगडं आणून दिलं पाहिजे." तसेंच एखादे वेळीं उगीचच तिच्या देखत मला म्हणायचं कीं, 'येसूला वाटेल तसं बोलत जाऊं नका हं. आणि हवं तितकं गुरासारखं कामही पण सांगत जाऊं नका! किती झालं तरी ती माणूस आहे. अलीकडे अगोदर कामाधंद्याला माणसं मिळत नाहींत आपल्यासारख्यांना, त्यांतून येसूबाईसारखी बाई तर कधींच मिळायची नाहीं. गरीब बिचारी! परिस्थितीनं तिला दुसऱ्याच्या घरीं काबाडकष्ट करावे लागत आहेत. म्हणून काय तिचा सूड घ्यायचा? आपणही तिचा जीव जाणूनच वागविलं पाहिजे. येसू, तूं पण आपली जरा प्रकृति संभाळूनच कामं करीत जा बरं!'

हें असं स्वारीनंच म्हटल्यावर येसूला कां नाहीं हें वाटणार! कां नाहीं ती माझ्याशीं सुद्धां तोऱ्यानं नी वरचढपणानें वागणार! हें असं तिकडूनच म्हणायचं होई असं नाहीं. तर असं बोललेलं तिकडे आवडतं, हें पाहून सासूबाई आणि दादासाहेब देखील जेवणाच्या वेळीं सगळ्यांच्या देखत

तिकडे बरं वाटावं म्हणून तसंच कांहीं तरी येसूला उद्देशून वरचेवर म्हणत असत! जस कांहीं मला येसूची स्थिति कळत नव्हती. मीच काय ती तिच्याशीं निर्दयपणानं वागण्याचा चंग बांधला होता. आणि म्हणूनच सगळ्यांनीं मिळून तिच्या जपणुकीचा मक्ता घेतला होता. असं आमच्या घरीं येसूचं–यःकश्चित् एका बाईचं—प्रस्थ चांगलंच माजत चाललं होतं.

एकदां हिच्याबद्दलच मी तिकडे थोडंसं कांहीं बोलायला गेलें तेव्हां तिकडून माझ्या काळजाला निर्दयपणानं जखम केली. मग त्या येसूबद्दल मी किती जरी सहानुभूति ठेवायची म्हटलं तरी राहणार कशी?

तिनें जातांना हरिणीकडे उपहासानंच पाहिलं. जरासं तोंड वेंगाडलं, मानेला हिसका दिल्यासारखं केलं नी ती तिथून निघून गेली.

पुन्हां मीं हरिणीला आग्रह केला. "तुला दुसऱ्याच्या देखत बोलायचं नव्हतं का? संकोच का वाटत होता? कांहीं गुपित–नाजूक–न सांगण्या-सारखं का आहे? आतां अगदीं मोकळ्या मनानं सांग. इथं माझ्या-शिवाय दुसरं कुणीच नाहीं. हवं तर तें दार लोटून कडी लावून ये."

मीं म्हटलं पण हरिणी जागची उठली नाहीं. तिनें आपले डोळे दोन्ही हातांनीं पुसले. नाक शिंकरलें, पदर सांवरला, इकडे तिकडे पाहिलं, माझ्याकडे जरा धीरानं वर मान करून पाहिलं. कांहीं सांगायचं देखील तिच्या मनांत आलं. शब्द ओठावर आले. ओठ हलले. पण आणखी काय झालं कुणास ठाऊक! ओठावर आलेले शब्द परत तिच्या पोटांत गेले. हुंदकाच तेवढा बाहेर पडला. डोळे पाण्यानें भरले. तिनें खालीं मान घातली. डोळ्याला पदर लावला!

हरिणीच्या या वागण्याचं मला चांगलंच गूढ पडलं. उगीचच नाना शंका मनाला शिवूं लागल्या. माझंच हृदय भलत्या सलत्या विचारा–विचा-रानीं उगीचच धडधडूं लागलं. हरिणी बिचारी आमच्या मळ्यांतल्या एका गरीब कामकरी शेतकऱ्याची सून. तिच्या माझ्यांत सगळ्या तऱ्हेनं किती तरी–आकाश जमीन इतकं–अंतर! ती माझ्यापुढें, माझ्या पायाजवळ, न्यायनिवाड्यासाठीं, अभय मागण्यासाठीं आलेली! पण आतां मला राहवेना. आमच्यांतलं अंतर मी क्षणभर विसरून गेलें. वाटलं कीं चटूदिशीं उठावं आणि हरिणीला जाऊन घट्ट पोटाशीं धरावी, तिचे अश्रु

आपल्या हातांनीं पुसून काढावेत, तिला हवं तें आश्वासन द्यावं, अभय द्यावं, पाठीशीं घालावं. गरीबांना पाठीशीं घालून, अभय देऊन, सुखांत ठेवण्यासाठींच ना आम्हीं इनामदारीचं सौख्य उपभोगायचं? मी हरिणीला जीवाभावानं कां बरं कवटाळूं नये? मी उठायचं मनांत आणलं खरं पण उठवलं मात्र नाहीं. कसं काय झालं होतं कोण जाणे! माझीं सगळीं गात्रं अगदीं शिथिल झालीं होतीं. मला जागचं उठवेनाच मुळीं!

ज्याअर्थी हरिणी इतरांप्रमाणें घडाघड आपलीं गाऱ्हाणीं सांगत नाहीं, त्याअर्थी नेहमींप्रमाणें, दुसऱ्यासारख्या दररोजच्याच तिच्या रडकथा नाहींत; तिच्या गाऱ्हाण्यांत, फिर्यादींत कांहीं तरी रहस्य आहे–गूढ आहे, असं उघडच झालें. त्याच कारणानं माझं अंतःकरण मला न कळतच तिच्याकडं ओढ घेऊं लागलें. हरिणी तर कांहीं सांगत नाहीं. ती घाबरलेली आहे. बावरलेली आहे. तिच्या पाठीमागें तिची शिकार करण्यासाठीं एकादा दुष्ट, नष्ट, खाष्ट, द्राष्ट व्याध तर लागला नसेल? ही कल्पना माझ्या डोक्यांत उत्पन्न झाली मात्र! अन् एकदम विजेचा झटका अंगांत येऊन गेल्यासारखं झालं! गरीब बिचारी हरिणी! तिची शिकार—तिची पारध! तिच्या भरल्या घरांत तिला कोण त्रास देणार? तिचा पति, सासू, दीर, सासरा या सर्व संरक्षकांच्या कृपाछत्राखालीं ती खुशाल, निर्वेध, निश्चिंतपणें आनंदांत नांदत असतां, तिची पारध करण्यास कोणता नरपशू धाडस करील? गरीबांचा जन्म वाईट म्हणतात, तो याचसाठीं वाटतं?

किती तरी विचित्र कल्पना माझ्या डोक्यांत किती थोड्या वेळांत वावटळीसारख्या येऊन निघून गेल्या. मी अगदीं सुन्न होऊन गेलें. आकाश काळ्या काळ्या ढगांनीं एकदम व्याप्त व्हावें, वारा थोडा वेळ त्याच वेळीं अगदीं बंद पडावा, सगळे लोक, पशुपक्षी एकाएकी आणि उगीचच्या उगीचच हवालदील होऊन जावेत तशीच माझी गत त्या वेळेला झाली.

आतां मला पुन्हां हरिणीची हकीकत सुद्धां विचारण्याचा धीर होईना. हरिणीनें आपले डोळे पुसले. हुंदका आवरला. ती आपल्या पायाच्या नखांकडे दृष्टि स्थिर करीत जड शब्दांनीं कांहींतरी सांगायला लागली—"वहिनीसाहेब, काय सांगावं? कसं सांगावं तुम्हांला? सांगतांना माझी जीभ लुली पडते बघा! सांगायकरतां धांवत धांवत तुमच्याजवळ आलें

पण कसं सांगूं तुम्हांला ? आजवर तुमच्याजवळ मस्त गाऱ्हाणीं आणलीं असतील. पण त्याची तऱ्हा न्यारी आणि आजच्या गाऱ्हाण्याची तऱ्हा न्यारी आहे बघा ! कुलाशिलाच्या बायकांनीं बोलूं नयेत असे शब्द वहिनी-साहेब, आपल्यासमोर मी कशी काढूं ? वाटतं, तसलं बोलणं म्हणजे तुमचा अपमान आहे. बायकांचा अपमान आहे तो वहिनीसाहेब, आम्हीं गरीब झालों, नाचारी असलों, आम्हांला पोटाला पोटभर खायाला मिळत नसलं म्हणून काय, आम्हांला जीव नसतो का ? अब्रू नसते का ? देवाची, धर्माची, जनाची, मनाची भीति लाज, नसते का बरं, तुम्हींच सांगा ? आम्हां गरिबांची अब्रू काय वेशीवर टांगलेली असते का शील बाजारांत मांडलेलं असतं हो ! वहिनीसाहेब, तुम्हीं मला आईबहिणीच्या जागीं आहांत ! शीलाच्या मोलानं आणि अब्रूच्या तोलानं कुणी जर आम्हांला आमचं पोट तोलायला सांगितलं, तर आम्हांला काय वाटेल बरं ? तशी भीति जर आम्हांला कुणी घातली, दहशत दाखविली तर आम्हीं सुखासमाधानानं नांदावं कसं ? वहिनीसाहेब,—"

ती जराशी बोलतांना थांबली—

तिचा प्रत्येक शब्द माझ्या काळजाचा ठाव घेत होता. मला कळत नव्हतं पण माझ्या काळजाला त्या शब्दाच्या आघातानें वेदना मात्र होत होत्या. मला निराळे विचार सुचायच्याअगोदरच हरिणी पुढें बोलूं लागली.

" वहिनीसाहेब, मला माझ्या घरांत माझ्या नवऱ्याजवळ बोलतां येईना, सासूजवळ सांगतां येईना कीं दिरासासऱ्याजवळ तोंड उघडण्याची छाती होईना. त्यांच्याजवळ, आईबापाजवळ आणि वहिनीसाहेब तुमच्याजवळ तरी मी कसं सांगूं ? काय सांगूं ? कोणत्या शब्दानं सांगूं ! सांगूं कशी ? आणि माझ्या सांगण्याचा अर्थ आपण सरळच घ्याल याचा मनाला भरंवसा कुठं आहे ? रानामाळांत मोकळ्या मनानं, खुल्या दिलानं, सरळ चालीनं चालणाऱ्या आम्हीं शेतकऱ्यांच्या लेकीसुना, आम्हांला माहीत सुद्धां नसतं कीं जग आमच्याकडे वांकड्या नजरेनं पाहात असेल. आम्हांला धड शरीर झांकायपुरतं देखील धडोतं मिळत नाहीं, तर नटायमुरडायला, सगळं अंग झांकायला पांघरूण कुठून मिळणार ? रानामाळांत काम करीत असतांना आमच्या शरीराचं, कां धड्डताचंसुद्धां आम्हांला भान नसतं. त्या

आम्हांला चवचाल चाली कुठल्या आठवणार ? रंगढंग कुठले सुचणार ? त्याच आम्हांकडे कुणी वाईट नजरेनं न्याहाळलं, वाईट हाकेनं हटकलं, वांकड्या डोळ्यानं दटावलं. तर आमचं जिणं कसं जायचं हो ? त्यांतून–"

त्यांतून ?–आणखी हरिणी आतां पुढें काय सांगणार आहे ? ही काय काय सांगते, कुणाबद्दल सांगते, हे कांहीं कळेना, तरी तिच्या सांगण्याचा रोख माझ्या ध्यानांत आल्याशिवाय कसा राहणार ? तिच्या बोलण्याचा माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला !

आतां हरिणी सांगत असतां अगदीं निर्भय झाली होती. धीटपणानें अस्खलित बोलत सुटली होती, अशी अडाणी–अल्पवयी–शिक्षण मुळींच नसलेली- रानामाळांतून काळ कंठणारी–अजाण हरिणी इतकं बोलते कशी, माझ्या काळजाचा ठाव घेते कशी याबद्दल मला आचंबाच वाटूं लागला ! हरिणी आतां निर्भयपणानें बोलत सुटली होती तर तिच्या शब्दाशब्दानं माझं हृदय भीतीचं घर होऊं लागलं होतं. काळीज धडधडूं लागलं होतं. तिचं काळीज माझ्यांत आलं कीं काय असं मुद्धां मनांत येऊं लागलं.

ती हरिणी आहे खरी ! पहिल्यांदा तिचे कावरेबावरे डोळे भित्रे दिसले खरे ! पण आतां तिची भीति पार कोठच्याकोठें पळाली होती. डोळ्यांत निर्भयता निःशंकपणानें स्थापित झाली होती. ती हरिणी असली तरी पारध्यांनीं पसरलेल्या जाळ्यांतून निसटून, जाळें तोडून कदाचित् मागें लागलेल्या पारध्याच्या छातीवर आपली टाप लगावून मोकळी झाली असावी. पण आपण पुन्हां त्या जाळ्यांत अडकूं नये म्हणून मदतीसाठीं, थाऱ्यासाठीं, निवाऱ्यासाठीं, आसऱ्यासाठीं, आपल्याकडे आली असावी, अशी कल्पना व्हायला कुठलाच अडथळा उरला नव्हता. तिच्या सांगण्याचा स्पष्ट ओघ आणि अर्थ तोच होता !

पण त्याच वेळीं मला असाही विचार पडला कीं ती ही हकिकत मला काय म्हणून सांगायला आली ? रानामाळांत वावरणारी ही, शेतांतल्यांच खोपटांतून नांदणूक करणारी ही, आणि मी—इनामदारांच्या गढींत—ज्या गढीला अजूनही चारी बाजूंनीं मोडके तोडके कां होईना विशाल बुरूज आहेत, पडके झडके कां होईना उंच उंच भव्य तट आहेत, जुने पाने कां होईना दरवाज्यानंतर दरवाजे असे चार–सहा आहेत, चौकांतल्या

चौकांत—आंतल्या आंत—मध्य घरांतल्या मध्य घरांत—अगदीं बालेकिल्ल्यां-तल्या बालेकिल्ल्यांत वावरणारी मी—मी हिच्या पारध्याचं पारिपत्य कसं करणार? हिला संकटमुक्त कशी करणार? भीतिमुक्त कशी करणार? माझ्यापासून हेंच तिला पाहिजे आहे. त्याकरितांच तर ती माझ्याकडे आली आहे. जें तिला आपल्या नवऱ्याजवळ, सासूजवळ, सासऱ्याजवळ, दिराजवळ, फार काय पण आईबापाजवळ मुद्धां सांगतां आलं नाहीं, तें ती माझ्याजवळ बिचारी सांगायला आली! साता कोटांत कोंडलेल्या माझ्यासारख्या दुबळ्या जिवानें उघड्या माळरानात वावरणाऱ्या हरिणीच संकट कसं हरण करायचं? आणि मी पुष्कळ करतें म्हटलें तरी त्याचा उपयोग काय? अगोदर असं थोडसं वाटलं खरं, पण लगेच मनांत असेंही आलं कीं, 'कां बरं, या हरिणीचा संकटांतून बचाव मला कां करतां येणार नाहीं? बंदोबस्तांच्या भरभक्कम पेट्यांतील सोन्यामोत्यांच्या अलंकारा-प्रमाणें जरी माझ्या गढींत मी असलें, तरी स्वारीला हरिणीची हकीकत सांगून स्वारीकडून नाहीं का बंदोबस्त करतां यायचा? हरिणी जशी आपल्या घरांतल्या माणसांजवळ सांगायला लाजली, भ्याली, त्याप्रमाणेंच ती स्वारीला भिणारच, लाजणारच! तेव्हां तिकडच्यासमोर ती धीटपणानें कशी उभी राहील? मी तिकडे सांगावं अशी तिची इच्छा असली पाहिजे.'

या कल्पनेनं मला बरं वाटलं. तिकडून हरिणीचं दुःख नाहींसं करा-यला लावीन असा मला भरंवसाही वाटूं लागला. एवढंही का तिकडून माझं ऐकणं होणार नाहीं?

हरिणी मध्यें थांबली होती ती आणखी पुढें बोलूं लागली, "वहिनी-साहेब, मी थोरल्या वहिनीसाहेबांच्याकडे जाणार होतें; पण आतां त्यांच्याकडून काय उपयोग होणार? त्यांचं वाड्यांत ऐकणार कोण? त्या ऐकून घेतील पण त्यांच्याहातून माझं संकट निवारण व्हायचं नाहीं हें मला—सगळ्यांनाच—माहीत झालं आहे. म्हणून तुमच्याकडे आलें. येथें येईपर्यंत मला निराळं वाटत होतं; पण तुमच्यासमोर आल्यावर मला निराळंच वाटूं लागलं. तुमच्या पवित्र जिवाला माझ्याकरितां कशाला दुखवूं? खचित, माझ्या सांगण्या-पासून तुम्हांला अतिशय त्रास झाल्याशिवाय राहणार नाहीं. माझं दुःख तुम्हांला सांगून तुम्हांला त्रास देण्यापेक्षां माझं मींच तें सोसलं तर त्यांत

काय वाईट! वहिनीसाहेब, नाहीं नाहींच सांगत तुम्हांला. माझं मीच भोगीन. पण वहिनीसाहेब, अगदीं काकुळतीला येऊन तुमच्याजवळ अगोदरच हात जोडून सांगून ठेवतें कीं, माझ्यासंबंधानें पुढेंमागें तुमच्या कानावर जर कांहीं भलतं सलतं ऐकायला आलं, तर मला दोषी धरूं नका? हरिणीच वाईट म्हणून हरिणीला शिव्याशाप देऊं नका. एवढंच तुमच्याजवळ अगदीं पदर पसरून मागणं मागतें. वहिनीसाहेब, जातें मी आतां!"

इतकें म्हणून हरिणी जायला उठलीच! मी चांगलीच बुचकळ्यांत पडलें. ही पहिल्यांदा मला कांहीं सांगायला म्हणून आली काय? आणि आतां मला कांहीं न सांगतांच अशी जाते काय? ती जायला निघाली, पण मला तिला जाऊं देऊं नये असं वाटलं. तिला अडविण्याकरितां मी तिला म्हणत होतें, "थांब, हरिणी तशीच जाऊं नकोस. मला सांगितल्याशिवाय—"

एक पाय उंबऱ्याच्या बाहेर, एक पाय आंत तसाच ठेवून, हरिणीनें फक्त मागें मान वळविली. 'परतूं कीं पुढें जाऊं' असा क्षणमात्र तिच्या मनांत विचार आला असेल. माझ्याकडे तिनें पाहिलं. माझ्या डोळ्यांत तिला काय दिसलं कुणास ठाऊक, पण पुढें निघालेल्या हरिणीचा झोंक मागें वळला.

दुसऱ्या दारानें त्याच वेळीं येसू पुन्हां आली. हरिणीनें तिच्याकडे पाहिलें. मी येसूला अशी मधेंच आलेली पाहिलं तेव्हां मला तिचा जरासा रागच आला. किंचित् खेकसण्याच्या आवाजांत मी तिला विचारलें—

"कां ग, कां आली आहेस? तुझं कांहीं काम आहे का? काय आहे? इथं येण्याखेरीज दुसरीं तुला कामंच नाहींत वाटतं!—कां आलीस?"

"थोरल्या वहिनीसाहेबानीं हांका मारायला धाडलं म्हणून आलें हो! माझ्यावर कां उगीच रागावतां? तुमचं अजून न्हायचं व्हायचंय्—जेवणीं रोजच्यापेक्षां जरा लवकर आहेत वाटतं—पाहुण्या मंडळींना जेवण करून लवकर गाडी गांठायला जायचंय् म्हणे—म्हणून मी तरी आलें; नाहीं तर मला तरी काय करायचं होतं म्हणा—तुमच्या हुकुमाशिवाय तुमच्या जागेंत मी कशाला आलें असतें?"

असंच आणखी कांहीं तरी बरंच तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत येसू आली आणि गेली! माझ्या मनांत तितक्यांतल्या तितक्यांत आणखी किती तरी गोष्टी येऊन गेल्या. उशीर बराच झाला होता. न्हायचंही आठ-

वलं. आमच्या इथलीं जेवणं आणि इतक्या लवकर? जगांतल्या आठव्या आश्चर्याप्रमाणेंच तें मला वाटलं. पाहुणेमंडळी जाणार आणि त्यांच्याकरितां आमच्या घरीं गडबड? हेंही नवलांपैकींच एक नवल होतें.

पुन्हां हरिणीकडे माझें लक्ष गेलें. तिला परत बोलावून तिची गाऱ्हाणीं ऐकायला वेळ कुठं होता? दुपारीं शांत वेळीं तिला बोलवावं, तिची सगळीं गाऱ्हाणीं नीटपणें ऐकावींत आणि आपल्याहातून होईल तितकं मनापासून तिला सहाय्य करावं, असा माझा निश्चय झाला होता म्हणून तिच्याकडे लक्ष जातांच मी तिला म्हटलें—

"हरिणी, तूं दुपारीं ये. मी तुला हवं तें साह्य करीन आणि तुझ्या दुःखाचा परिहार करीन. माझं अगदीं वचन तुला. पण मला तुझी कहाणी ऐकायची आहे बरं का? मी तुला आधार दिला आहे. मी तुला पाठीशीं घातली आहे. माझ्या हरिणीला कोण आतां त्रास देतें तेंच मी पाहणार आहे. मुळींच भिऊं नकोस हं!—"

हरिणी माझ्या बोलण्यानं हंसली. अगदीं चमत्कारिक हंसली. तिच्या हंसण्यानं मला कसंसंच झालें. मी तिच्याकडे टक लावून पाहिलें. ती परतली नाहीं; उंबऱ्याच्या बाहेर पाय टाकतां टाकतांच ती मला उद्देशून म्हणाली, "वहिनीसाहेब, देव तुम्हांला सुखात ठेवूं द्या! मी वेडी, खुळी, अडाणी म्हणून विचार न करतां तुमच्याकडे आलें. पण आतां अगदीं मनाचा पक्का निश्चय करून टाकला आहे कीं तुमच्यापुढें कांहीं म्हणतां कांहीं एक सांगायचं नाहीं? तुम्हीं आग्रह करूं नका! मी सांगणार नाहीं!"

"कां पण? कां सांगणार नाहींस तूं! मला तुझ्याकरितां कांहींच करतां येणार नाहीं अशी का तुझी वेडी समजूत—"

"छेः छेः वहिनीसाहेब!—" हरिणी जातां जातां मध्येंच थांबून मला म्हणाली, "कशाला आग्रह करतां मला? दातांचीं गाऱ्हाणीं ओठाजवळ सांगितल्याचा परिणाम कधीं चांगला का व्हायचा असतो?—"

हरिणी इतकें म्हणून झटकलीच!

कां कोण जाणे! तिचें शेवटचें वाक्य ऐकून मनाला एकदम चर्रर झालें! अगदीं हरिणीची टापच माझ्या वक्षःस्थळावर बसलीसें मला वाटलें.

---

# प्रकरण चवथें

## वतन वहिवाटदार

कारिणीच्या टापेचा घाव वक्षःस्थलावर घेऊन मी तशीच उठलें त्यावर त्या वेळीं फारसा विचार करायला वेळच नव्हता. मैत्रिणींचीं आलेलीं पत्रें कांहीं वाचलीं होतीं तर कांहीं वाचायचीं—फोडायचीं सुद्धां राहिलीं होतीं! पण तीं मग तशींच ठेवून दिलीं. न्हाणीं-धुणीं, जेवणीं-खाणीं झाल्या-शिवाय त्या पत्रांकडे पहावयाला मला वेळच मिळणार नव्हता.

माझ्या न्हाण्याची तयारी बाईनं करून ठेवलीच होती. मी न्हाणीघराकडे गेल्यावर बाई बरोबर आली. रोजच्यासारखं न्हाण्यांत देखील आज माझं चित्त नव्हतं. कशी तरी घाईघाईनं न्हालें. ओलेतं बदललं. कुंकू लावलं, देवघरांत गेलें. देवाला नमस्कार केला. हळद—कुंकू, फुलं—तुळशी देवाला वाहून स्वयंपाकघराकडे वळलें. जेवणघराकडे डोकावून पाहिलं. बाळक्या पाटपाणी—पत्रावळी करीत होता. येसूनें मीठ, चटणी वाढायलाही आरंभ केला होता. ती आंत स्वयंपाक्याला आणि बाहेर बाळक्याला—आपल्या नवऱ्यालाही—मधून मधून कांहीं कांहीं हुकूम फर्मावीत होती. सासूबाई मागील चौकांतल्या तुळशीवृंदावनाभोंवतीं हातांत जपाची माळ घेऊन फेऱ्या घालीत होत्या. बाहेर—अगदीं बाहेरच्या बैठकींतून बऱ्याच माण-सांच्या हंसण्याचा आणि ओरडण्याचा मिश्र ध्वनि स्वयंपाकघरापर्यंत—जेवण-घरापर्यंत घुसत होता. दादासाहेब अगदीं नियमित चालणाऱ्या घड्याळा-प्रमाणें, आपली वेळ होतांच, अंगांतली काळी किटलेली पेटी काढून ठेवून पाय धुऊन पाटावर आले—हो, आज बरेच पाट जेवणघरांत मांडले होते. एरव्ही तिकडच्याशिवाय दुसऱ्या कोणाही भोजनभाऊला पाट नसे कीं ताट नसे. बसायला जमीन आणि जेवायला पत्रावळ—आमटीला द्रोण, चार—चार पांच—पांच माणसांत एक कळकट तांब्या आणि दोघातिघांत मिळून एकेक पितळेची नाहीं पर तांब्याची जाड पंचपात्री. कुणाला कान तुटकाच काळवंडलेला कपसुद्धां पाणी प्यायला ठेवलेला असायचा! आम्हां इनामदाराघरचं दररोजचं वैभव असे तें! नाहीं म्हणायला तिकडे तेवढा

बसायला, टेकायला नी ताटालाही पाट असायचा. तांब्याभांडं जवळ असा-
यचं. तसाच सर्व प्रकार आजही होताच. रोजच्यापेक्षां नवा थाट म्हणजे
बाकीच्यांना बसायला पाट होते. दादासाहेब आपल्या ठरल्या जागेवर
ठेवलेल्या पाटावर येऊन दाखल झाले होते. बाकीची मंडळी येईपर्यंत
बाळक्याला नाहीं तर येसूला आपलं पाणी प्यायचं भांडं विसळून आणा-
यला सांगणें, पत्रावळ भिजलेल्या फडक्यानें पुसायला सांगणें वगैरे दादा-
साहेबांचें नित्य कार्य चालू होतें. जसजशी जेवायची वेळ जवळ येई तस-
तशी दादासाहेबांची जास्तच धांदल होऊन जाई. याच्यावर रागाव, त्याच्या-
वर तोंड टाक, त्याच्यावर गुरगुर कर, असं एकसारखं त्यांचं नेहमींच
चाले; पण जेवणाच्या वेळीं अधिक चाले. दादासाहेबांच्या तिरसट, वस्स-
कन् कुणावरही अंगावर खेंकसणाऱ्या स्वभावामुळें चाकर नोकर त्यांना भीत.
पण भीत म्हणण्यापेक्षां त्यांचा तिरस्कार, हेटाळणीच करीत. पाठीमागें तर
यथास्थित निंदा आणि कुचेष्टा करीत म्हटलं तरी चालेल. खरं पाहिलं तर
दादासाहेबांना—मी आपली त्यांना दादासाहेब म्हणतें—वाड्यांतलीं इतर
सगळीं लहान थोर माणसं नुसतं दादाच म्हणतात. खुद्द तिकडून सुद्धां दादाच
म्हणायचं असतं. अगदीं जनक वडील ते, शिवाय आतां इनाम वतनाचं
जतन करायला, व्यवस्था पाह्यला, हिशेबठिशेब ठेवायला म्हणून मुद्दाम
येऊन राहिलेले. सर्वांत वयानें वडील, मानानें आणि अधिकारानें मोठे खरे
आणि त्या दृष्टीनें वाड्यांतल्या सगळ्यांकडून त्यांना योग्य तो मान द्यायची
तयारीहि असे. पण दादांची वागण्याची तऱ्हाच निराळी. सगळ्यांशीं
सारखा करडेपणा—एकसारखंच गुरगुरणं—कावणं—रागावणं ! सगळा
आव—सगळी घमेंड—सगळा मोठेपणा काय तो स्वतःचा ! ज्याच्या
त्याच्यापुढं आणि जेव्हां तेव्हां आपला मोठेपणा ! कुणी बाहेरचा माणूस
आला आणि जरासा दादांच्यापुढें बसून उगीच वेळ घालविण्या-
करितां सहज कुठें त्यानें ‘ कां ? कसं काय दादासाहेब ? ’ अशी
नुसती औपचारिक पूसतपास करण्याची खोटी कीं, दादासाहेबांनीं आपलें
त्याच्यापुढें प्रवचन आरंभलंच ! ‘ मी इथला इस्टेट मॅनेजर आहें. माझ्या
मुलाला मी आपल्या कर्तबगारीनं या इस्टेटीवर आणला. अनेक उलाढाल्या

करून, कारवाया रचून, थोरल्या वहिनीसाहेब इनामदारांच्या मांडीवर राजाभाऊला मीं बसवला आहे. इस्टेटीवरचं कर्ज मी माझ्या कर्तबगारीनं फेडीत आणलं असून वतनाची व्यवस्था मी चोख ठेविली आहे. मुलाची मुकत्यार कारकीर्द होईपर्यंत मला या इस्टेटीवर लक्ष ठेवणं भाग आहे. मला या वाड्यांत कुणीही चांगलं म्हणत नाहीं, हें मला माहीत आहे. पण मी कुणाची पर्वा करीत नाहीं. मला कुणी स्नेही सोबती नाहींत. मलाही त्यांची आवश्यकता नाहीं. स्नेही म्हणवून इनामदाराला फुकट जेवून बुडवायलाच लोक येणार कीं नाहीं ? माझा मुलगा- आतां इनामदार -श्रीमंत माझं ऐकतो,मला मानतो. माझ्यावर त्याचा पूर्ण विश्वास आहे. माझ्याखेरीज इनामदारांचं खरं कल्याण करणारा या वाड्यांत दुसरा कोणी नाहीं. सारे चोर आहेत. लुच्चे आहेत. लुटारू आहेत. लफंगे आहेत. सारे इनामदारांना लुबाडायला बसले आहेत. थोरल्या वहिनीसाहेब इनामदारांचा पहिल्यापासून माझ्यावर विश्वास ! त्यांनींच मला जवळ केलं. वाड्यांत आणून ठेवलं. इनामवतनाची व्यवस्था माझ्याकडे त्यांनींच सोंपविली आणि शेवटीं माझा मुलगा सुद्धां मांडीवर घेतला. असा माझ्यावर लोभ आहे त्याचा. त्यांत अंतर नाहीं आणि अंतर पडायचं नाहीं. आतां राजाभाऊकडे लोक येतात--राहतात, हॅ हॅ हॅ हॅ करतात आणि त्यालाच बुडवतात हें मला मुळींच पसंत नाहीं. पण मी त्यांच्याशीं आताशा थोडासा जपून, त्यांचा कल पाहून, मर्जी राखून वागत असतों. हो त्यांचे ते मालक आहेत, इनामदार आहेत. स्वभावही पण जरा हा आहे. तेव्हां त्यांच्याकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करावं लागतं ! बोलायच्या परीनं आणि तऱ्हेनं बोलतों. आतां जरा जरा त्याचे ते कर्तेसवरते झाले आहेत, तेव्हां सांगायचं काम आमचं, ऐकायचं त्यांचं ! मात्र कांहीं असलं तरी माझं कांहीं उणं पडत नाहीं. मी आपलं यथास्थित चालवीत असतों. चिरंजीवांचीही त्याला हरकत नसते. मला दुसरं तिसरं कांहीं समजत नाहीं. पण हिशेबठिशेबांत माझा हातखंडा आहे. मी पूर्वी एका बँकेचा मॅनेजर होतों ना ? तिथली गोष्ट तुम्हांला सांगतों. पुढें ती बँक लिक्विडेशनमध्यें गेली. त्या भानगडींत बँकेच्या जबाबदार मंडळींपैकीं बऱ्याच जणांना सरकारांचा पाहुणाचार पत्करावा लागला. परंतु मी मात्र सहीसलामत त्यांतून सुटलों. कोर्टांत माझे हिशेब चोख ठरले ना ! असं

आहे माझं ! मी आहें म्हणून ही इनामदारांची इस्टेट शाबूत आहे. आहे त्या स्थितींत आहे; चांगली होण्याचा संभव आहे. आपल्या हातांत आहे तोंपर्यंत आपण नीटनेटकं करावं. मुखत्यार कारकीर्द झाल्यावर कुणी सांगावं काय होईल ? भीतिच आहे, कारण राजाभाऊ जरा लहरी आणि हे आहेत !'

याप्रमाणें ठराविक ठशाचें व्याख्यान दादा पुष्कळांना ऐकवीत. बोलायला लागले म्हणजे ऐकणाराची इच्छा–अनिच्छा ते मुळींच पाहात नसत. त्याची काय कुचंबणा होत आहे, त्याचा जीव किती गुदमरला आहे हें ते मुळींच लक्षांत घेत नसत. आपल्या बडेजावीचा आणि इतरांच्या निंदाकुचाळीचा ते एकसारखा भडिमार करीत असत. त्यांच्या व्याख्यानाची प्लेट अगदीं ठरलेली. एकदां सुरू झाली कीं ती शेवटपर्यंत चालायची. दादांना आपल्या टांकाचा अभिमान म्हणून वाड्यांत त्यांना लोकांनीं कुचेष्टेनं दादा टांकधरे असं नांव दिलं होतं ! मी पहिल्यांदा सासरीं आलें त्यावेळीं वाड्यांतलं सगळ्यांचं सारं गौडबंगाल मला मुळींच कळत नव्हतं. मी दादांना पहिल्यापहिल्यानें नुसते दिवाणजीच समजत असें. त्यामुळें नित्याच्या संवयीप्रमाणें त्यांच्या तोंडावर एक तऱ्हेनें आणि पाठ वळली कीं निराळ्या प्रकारानें असं वाड्यांतल्या लोकाना वागतांना पाहून मला विशेष चमत्कार वाटत नसे. चाकर–नोकरांत लहान–मोठेपणामुळें वगैरे असे प्रकार चालावयाचेच असे मनांत येऊन जाई इतकेंच. पण पुढें ते माझे खरेखुरे श्वशुर आहेत हें कळल्यावर, नोकरचाकरांनीं त्यांची चेष्टा--उपहास केला तर मला खपेनासें झालें होतें. मी त्यांना आमचे दिवाणजी म्हणून वागवायचें कीं श्वशुर म्हणून त्यांची अव्याहत प्रतिष्ठा राखावयाची, हेंच मला समजेनासें झालें होतें. त्यामुळें वागतांना माझी पुष्कळ वेळां तारांबळ उडे. गंमती होत. त्रास होई. हंसूंही येई. पुढें पुढें अनुभवानें मला कळून चुकलं कीं दादांचा स्वभावच तसा आहे. तशीच वागणूक त्यांची आहे. नोकरचाकर त्यांच्याशीं तसंच वागत, देखल्या देवा दंडवत करीत, फारसे थाऱ्यालाच उभे राहण्याच्या कुणी भानगडींत पडत नसत. अगदीं जनक वडील असूनसुद्धां, तिकडून देखील आतांशा आतांशा जितक्यास तितकाच मान दिला जाई. सासूबाईच्या तोंडांतूनही मी कांहीं कांही वेळेला दादांच्या संबंधानें 'दादा आहेत चांगले. पूर्वी ते आमच्या

उपयोगी पडले आहेत. अजूनही ते उपयोगी पडतात, झटतात. त्यांची शिस्त वाखाणण्यासारखी आहे. हिशेबाला पण जागरूक असतात. हें खरं, पण आतांशा त्यांचं प्रस्थ फारच माजलं आहे. त्यांना भलतीच घमेंड झाली आहे. शिस्तीच्या नावाखालीं आणि हिशेबीपणाच्या तोऱ्याखालीं ते सगळ्यांनाच आपले सब्बसे बारा टक्के वागवूं लागले आहेत. जिथं खर्चाला काट मारायला पाहिजे तिथं मारतात आणि नको तिथंही मारतात! आपली तेवढी चैन चालवितात. कांहीं उणं पडूं देत नाहींत. अलीकडे मी मालकीण असून मलाच चोरासारखं वागण्याची पाळी येऊं लागली आहे. माझ्या देवाधर्माच्या खर्चाकडे देखील दादांची वक्रदृष्टि वळून त्यावर काट बसूं लागला आहे! चांगलं चांगलं म्हणतां म्हणतां दादा अगदीं आमच्या डोक्यावरच बसूं लागले आहेत. आमचंच आम्हाला खर्च करायची चोरी व्हायला लागली आहे!' हेंच काय पण असं पुष्कळसं पुष्कळदां बोलतांना ऐकलं होतं. कित्येकदां तर सासूबाई माझ्याजवळसुद्धा दादासाहेबांच्याबद्दल हें बोलत असत!

पहिले कांहीं दिवस वाड्यांत या टोकापासून त्या टोकापर्यंत यच्चयावत् लहानापासून थोरांपर्यंत नोकरापासून मालकापर्यंत सर्वांवरच दादांनीं चांगलीच छाप टेवून दिली होती. भयंकर दरारा बसवून दिला होता म्हणे! दादांच्या शब्दाशिवाय इकडची काडी तिकडे हलेल कुठली? अशी कित्येक दिवसपर्यंत दादांनीं आपली अस्मानी-सुलतानी गाजविली होती. पण तो काळ फार वेळ टिकला नाहीं. टिकणेंच शक्य नव्हतं! त्यांच्या दराऱ्याला, त्यांच्या शब्दाला, त्यांच्या मानाला, त्यांच्या अरेरावीला, त्यांच्या सार्वत्रिक धाकाला हलके हलके उतरती कळा लागली. मला वाटतं, माझ्या लग्नानंतरच दादांच्या सत्तेला उतरती कळा लागली. तरीसुद्धां पुष्कळजण दादांना भीत, वचकत. सासूबाई त्यांना चांगलाच मान देत. ज्या त्या गोष्टींत त्यांना विचारीत, सल्ला घेत, त्यांना पुढाकार देत. तिकडून तर समक्ष चांगलंच भ्यायचं होई, मानसन्मान मिळे. समोर आल्यावर अगदीं खालीं मान घालायचं होई असं सुद्धां मी केव्हा केव्हां पाहिलं होत. पण दादांनीं आपल्या गुणांनीं--गुणापेक्षां दुर्गुणांनींच म्हटल तर जास्त शोभेल, नव्हे, खरं म्हटल्यासारखं होईल—अलीकडे वाड्यांत आपल्या बाबतींत पारडं फिरवून घेतलं.

वाड्यांत दादांचा खरा दरारा म्हणजे तिकडे दत्तक होऊन वाड्यांत यायचं त्यावेळीं; तिकडे पुण्यास शिक्षणाकरितां म्हणून बोर्डिंगांत ठेवण्यांत आलं त्या वेळीं; आणि नंतरही कांहीं दिवस चांगलाच होता. वाड्यांतले म्हातारे नोकर आणि बाकी कांहीं मंडळी त्यावेळच्चीं दादाच्चीं वर्णनं नी गंमती काय काय तरी सांगतात. पण सूर्य जसा एकदां माथ्यावर येऊन पुढें सरकला कीं त्याचं कर्तृत्व हलके हलके कमीच व्हायला लागतं; तसंच दादांच्या संबंधांतही झालं होतं. त्यांच्यांतली कर्तबगारी जी काय असेल ती केव्हांच संपून गेली होती. अर्धांग झाल्यानें त्याना शरीरानेंही सोडलंच होतं. आतां जी काय शक्ति होती ती सगळी तोंडांत, ज्याच्या त्याच्यावर गुरगुरण्यांत आणि सर्वांवर तोंड टाकण्यांत! कितीही नाहीं म्हटलं, अगदीं कडकडीत सोंवळ्याचा कितीही त्यानीं आव आणला किंवा आपल्या इतर मुलांना आमच्या घरीं येऊं न देण्याचा, आपल्याकडे ठेवून न घेण्याचा केवढाही दादांनीं बहाणा केला, तरी अंतस्थ—आमच्याकडील खऱ्याखऱ्या हिताचं त्यांचं लक्ष उडून तें आतां आपल्या घराकडे, बाकीच्या मुलाबाळांकडे, लेकी-सुनांकडे वळलें होतें. त्याचें कल्याण आमच्या इस्टेटींतून आयतं कसं करतां येईल या धडपडींत त्यांचा काल व्यतीत होऊं लागला होता. मग त्यांचा पहिला दरारा कुठून राहणार? एकाचं कोटकल्याण झालं तसं बाकीच्यां-चंहि व्हावं ही स्वाभाविकच पित्याची इच्छा असणार! पण ती ज्याचं कोटकल्याण झालं आहे, त्याच्याकडून त्याच्याच इतकं झालं पाहिजे, त्यानेंच तें केलें पाहिजे, असं म्हणून कसं चालणार? आणि असंच कांहीं तरी अलीकडे दादांचें चाललेलं होतं. केव्हां तरी मधूनच सफाईनें त्याबद्दल दादा आणि स्वारी अशी अगदीं दोघेचे दोघे असतांना बोलणें होई. सासू-बाईच्या समोर यांतील मात्र कांहींच कधीं निघत नसे. त्यांच्याजवळ कसं निघणार? उलट अशीच केव्हां तरी गम्मत होई कीं सासूबाईनींच दादांच्या इतर मुलांविषयीं त्यांच्याजवळ चौकशी करावी. त्यांना आणि त्यांच्या मातु-श्रींना चार दिवस आपल्याकडे आणण्याचेंही सुचवावें. पण त्यावेळीं दादा-साहेबांनीं सोंवळेपणा परमावधीला पोंचवून त्याबद्दल अनिच्छाच दर्शवावी!

आतांशा सासूबाई समोर आल्या कीं मुद्दाम उठून उभं राहायचं, त्यांच्या आवडत्या गोष्टी बोलावयाला सुरवात करावयाची, त्यांना बरं

वाटेल असं बोलायचं हें जसं दादांचं चाललं होतं तसाच प्रकार खुद्द चिरंजीवाशीं वागण्यांतही दादांनीं आरंभला होता. तिकडून येणं झालं कीं दादा बसल्या जागेवरून उठायचे, मोठ्या मर्यादेनं उभे राहायचे, आर्जवीपणानं गालांतल्या गालांत हंसायचे. अगदीं लवून एकाद्या अति नम्र नोकराच्या नात्यानें नमस्कार करायचे. पित्यानें चिरंजीवाशीं असं वर्तन केल्याचं मला तरी खपत नसे. मुलगा संपत्तिमान् झाला म्हणून वडिलांनीं एकाद्या हलक्या नोकराप्रमाणें थुंकीला हात पुढं करूं लागायचं, असा 'अतिलवेपणा' करायला लागायचं म्हणजे काय ?

पण तशा वागण्याची क्षिति दादांना वाटत नव्हती, वाड्यांतील लहानथोर माणसं त्यांच्याबद्दल कांहीं ना कांहीं कुजबुजतसुद्धां असत.

आज दादा जेवायला बसायला आले त्या वेळीं आमच्याकडे दोन दिवस येऊन राहिलेल्या पाहुण्यांपैकीं एक पाहुणा त्यांच्या तावडींत सांपडला होता. त्यावर ते आपलं ठराविक व्याख्यान ठाशीत होते.

दादा पाटावर येऊन बसले. त्यांची ती जागा अगदीं ठरलेली. त्यांच्या खालीं एक दोन जागा मोकळ्या पडल्या. त्याखालीं दादांचें व्याख्यान ऐकणारा पाहुणा बसला. आणखी दोन पाहुणे तिकडे बोलण्याच्या नादांत गुंतलेच होते अजून. त्यांचींहि पानें खालीं मांडण्यांत आलींच होतीं. तिकडचे ठराविक कायमचेच पंक्तिपठाण—अण्णा आणि गोपाळभय्या—वगैरे होतेच. त्यांना पाट असले तरी चालत, नसले तरी चालत. सगळ्यांना पाट असले तर हे आपले पाट मुद्दाम काढून टाकायचे. इतर कुणालाही नसतील त्या वेळीं आपण हटकून पाट घेऊन आपलें सर्वांपेक्षां विशेष वैशिष्ट्य दाखवावयाचें. दादा त्या मंडळींच्या कधीं फारसे—नव्हे मुळींच—वाटेला जात नसत. कारण ती मंडळी तिकडच्या गळ्यांतली ताईत, त्यांना बोलून मुळींच चालायचं नाहीं, हें दादांना पक्कं कळून चुकलं होतं.

ती मंडळी समोरच्या बाजूला येऊन बसली. येसूनें तिकडच्या पाटताटाजवळ, तिकडच्याच करतां स्वतंत्र केलेल्या अन्नाचीं सर्व भांडीं आणून ठेवलीं. तिकडचं अगदीं सगळं सगळं निराळं असायचं. भात, भाजी, पोळी, वरण, आणखी काय निराळ्या जिन्नसा केल्या असतील त्या, तूप, हें सर्व अगदीं निराळं असायचं ! बाकीच्या पंक्तीचं सारं निराळं ! हें अगदीं

पहिल्यापासून असे. खुद्द जनक वडील, सासूबाई, यांना सुद्धां तिकडे जें असेल तें नाहीं. इतर पंक्तीच्या लोकांना जें, तेंच त्यांना. माझं सुद्धां निराळं असे. त्याबद्दल कधीं मला बरें वाटे, कधीं अतिशय चमत्कारिक वाटे. पण त्या बाबतींत मी कुणाजवळ, काय आणि कशी बोलणार? मोठ्या घरचं तें एक प्रकारचं सुख वाटणारं दुःखच असं म्हटलं तरी चालेल.

सगळी मंडळी पाटावर येऊन बसण्यापूर्वी तिकडे मी एकदा डोकावून पाहिलं होतं. दादांच्या खालीं दोन पानं रिकामी होतीं, त्याची कल्पना मला मुळींच आली नाहीं. पैकीं एक दादांचे ज्येष्ठ चिरंजीव आले आहेत, असं कुणी तरी म्हटल्याचें मी ऐकलं होतं म्हणून, त्याचं एक पान असेल अशी थोडीशी कल्पना झाली. पण त्या राहिलेल्या एका पानाबद्दल मात्र कांहींच उलगडा झाला नाहीं. सर्व माणसं पाटावर येऊन बसलीं. सगळं वाढप झालं म्हणजे पंक्तीला तूप वाढायचं एवढेंच माझ्याकडे काम असायचं.

रोजच्या रिवाजाप्रमाणें आगेमागें करीत सगळी माणसें शेवटीं पाटावर बसलीं. बाळक्या आणि येसू यांनीं भराभर वाढायला सुरवात केली. तिकडे पाटावर येऊन बसायचं झालं तशी दादांनीं उभं राहण्याची आणि आपल्या-बरोबर पंक्तीवरच्या सगळयांना– अगदीं पाहुण्यांनासुद्धां–उभं राहून तिक-डचं स्वागत करायला लावण्याची कवाईत करावयाला लावली. तें पाह्यचं आतांशा माझ्या अंगवळणीं पडत चाललं असलं तरी बाहेरच्या पाहुण्यांना असल्या किळसवाण्या प्रकाराबद्दल काय वाटत असेल, अंतःकरणांत दुःख होत नसेल काय? असें मनांत अजूनहि आल्याशिवाय राहात नसे. सग-ळींच माणसं काय दादासारखीं, अण्णासारखीं, गोपाळभय्यासारखीं असूं शकतात? आम्हां इनामदारांच्या–श्रीमंतांच्या घरीं–जेवायला येणारे सगळेच स्वाभिमानशून्य असतील का? त्यांच्या त्यांच्या घरीं कदाचित् मिष्टान्न मिळत नसेल, दूधभात मिळत नसेल, तूपरोटी मिळत नसेल, लाडू जिलब्या दृष्टीस पडत नसतील, अगदीं कण्या भाकरीच लोक आपापल्या घरीं खात असतील खरें; पण आपल्या पंक्तीला बसवून, आपण एक, त्यांनीं दुसरें, असें करण्यांत श्रीमंतांना कोणता मोठेपणा मिळत असतो? ते असं कां करतात? ते वागतात तशी त्यांची इच्छा असते कीं, आपसुखेंच त्यांची नोकरचाकर माणसंच त्यांना तसं वागावयाला लावतात असें पहिल्यांदा

मला वाटे. पण अनुभवांनें त्याबद्दलचा माझा सर्व गैरसमज दूर झाला. श्रीमंताचाच काय तेवढा जीव ! इतरांचे काय जीव नव्हेत ?

पण असं मला वाटत असलं तरी त्या वाटण्याचा कांहींच उपयोग नव्हता ! मनांत येई आणि जाई ! असं मात्र वाटे कीं, माझ्या माहेरच्या पैकीं मायेच्या माणसांनीं आमच्याकडे राहायला येऊं नये आणि त्यांचे असे सुखसोहळे होऊंहि नयेत ! आणि खरंच माझ्या माहेरचं तसं कुणी फारसं येत नसे—अजून तरी कुणी आलं नव्हतं! माझ्या हातीं ज्यावेळीं घराची मालकी येईल, त्या वेळीं हे सगळे वेडेचार मी एकदम बंद करीन; सगळ्यांना सारखं वागवीन, असं मी वेळोवेळीं मनाशीं कितीदा तरी ठरवीत असें !

जगांत लोकांना हें कसं सहन होत असेल ? अशीं मुरदाड माणसं असतील का ? असे खुळे प्रश्न मनांत येत नसत. कसे येतील ? अण्णासारखीं, गोपाळभय्यासारखीं, इतकंच काय, पण दादासाहेबांसारखीं माणसं नित्यशः तो प्रकार खपवून घेतात. त्यांत त्यांना कांहीं वाटत नाहीं. उलट होत असतं तेंच योग्य, इतका फरक असायचाच, त्यांत कांहीं वावगं नाहीं ! अशाच पक्क्या समजानं ते वागत असतांना मी रोज रोज पहात होतें ना !

पानांवर येऊन बसल्यावर जरी वाढणारीं माणसं वाढीत होतीं, तरी जातिस्वभावाप्रमाणें दादासाहेबांची स्वारी जलदी करण्याविषयीं नोकरांना हुकुमावर हुकूम फर्मावूंच लागली. “ बाळक्या, हें आण. त्या पानांवर अमुक वाढ. येसू, जरा झपझप हं. बाळक्या, तुझ्या बायकोच्या अंगांत जी चपळाई आणि जें शहाणपण आहे, त्याचा मागमूसही तुझ्यांत नाहीं. तुझ्यापेक्षां तीच शतपटीनें चपल आहे ! ” अशी त्यांची कांहींना कांहीं टकळी एकसारखी चालू झाली.

शेवटीं मला उद्देशून दादांनीं, “ हं, रखमा, चला. एकदां तूप वाढून जा बरं ! ” असं फर्मावलं.

मी बाहेर गेलें. तिकडे पानांवर स्वतंत्र भांड्यांतलं तूप वाढलं. दुसरं भांडं घेऊन पंक्तींत वाढूं लागलें. दादा— दुसरे दादांचे ज्येष्ठ चिरंजीव बाबूराव—तिसरं पान—मी जरा वर पाहिलें—अगदीं चर्रर्र झालं ! चकित झालें ! घाबरलें ! डोळ्यापुढें हिरव्या टिकल्या चमकल्या ? तुपाचं भांडं पडायचंच पण कसं कीं कोण जाणे मी सांवरलें ! त्या तिसऱ्या पाटावर—

# प्रकरण पांचवें

## श्रीमंतींतील शल्यें !

बसला होता तो मनोहर होता ! मनोहर आणि माझ्या घरीं ? आला कसा तो ? कुणाबरोबर आला ? राहिला कसा तो ? त्याला कुणी रहा म्हटलं कीं तो आपण होऊन राहिला ? त्याला जेवायला कुणी आग्रह केला ? मनोहर—गरीब बिचारा मनोहर ? कशाला आमच्या घरीं आला आहे ? माझ्या श्रीमंतीचें वैभव पहायला कीं श्रीमंतींतले गरीब-श्रीमंतांतले पंक्ति-प्रपंच पहायला आणि त्यांतल्या नरकयातना अनुभवायला ?

मी पंक्तींत एकदाचं कसंबसं वाढलं आणि कशी तरी अगोदर आंत गेलें. वाढतांना मी मनोहरला पाहून जशी एकदम चपापलें, घाबरलें, भ्यालें तशी स्थिति मनोहराची झाली कीं नाहीं हें मला कळलें नाहीं. जेवतांना तो वर तरी पहात होता कीं नाहीं कोण जाणे. निदान त्यानें माझ्याकडे तरी त्यावेळीं पाहिलं नाहीं इतकं खचित ? पण मी म्हणतें त्यानें मजकडे पाहिलं नाहीं तें एकपरी चांगलंच झालं. नाहीं तर दोघांची आणखी काय गत झाली असती, त्याची कल्पनाच होती ना ! मी आंत आलें. पुन्हां वाढायला जायला मला कसा काय धीर होईल हें मला कळेना ! जाण्याची पाळी न येईल तर बरें. येसूलाच आज वाढायला सांगावं, आपलं डोकं दुखतंय असं सांगून, जेवण होऊन मण्डळी बाहेर बैठकीवर जाईपर्यंत आपलं आपल्या जागेंत जाऊनच बसावं, असं तितक्यांतल्या तितक्यांत कितीदां तरी मनांत येऊन गेलं. मनांत आलं पण सांगायचं सुचेना कीं पाय जागचे हालेनात !

पंक्तीवर ठराविक सांच्याच्या इतरेजनांच्या गप्पा चाललेल्याच होत्या. हंसणींखिदळणीं सुरूंच होतीं. बाबूराव विशेष कांहीं बोलत नव्हते. दादाच कांहीं तरी त्यांना उद्देशून बोलत असल्याचें त्यांच्या एकाद्या शब्दावरून आंत ऐकायला येत होतें. मनोहरला मात्र कुणी कांहीं विचारल्याचें, नाहीं तर त्यानें कुणाशीं कांहीं बोलल्याचें मुळींच ऐकायला आलें नाहीं. शेजा-

रच्या जाळीच्या खिडकींतून बाहेर विशेषतः मनोहराकडे डोकावून पहा-ण्याचा मोह मला आवरला नाहीं. मी अगदीं मान वळवून, उंच करून, किंचित् टांचा देखील उचलून जाळींतून बाहेर पाहिलें. मनोहराची मान खालींच होती. बाबूराव त्याच्याकडे वळून हलकेच कांहींसें बोलण्याचा प्रयत्न करीत होते. मनोहर नुसत्या हुंकाराशिवाय प्रत्युत्तरादाखल बोलत नसावासें वाटतें. कारण शब्द मुळींच बाहेर पडत नव्हते कीं बाबूरावांच्या बोलण्याला उत्तर द्यायला तो मान देखील फारशी वळवीत नव्हता !

मनोहराचे शब्द जसे मला ऐकायला आले नाहींत; तसेंच त्याच्या चेहऱ्यावर कोणकोणत्या विकाराविकारांची लढाई चालली होती हेंहि ओळ-खायला येत नव्हतें. त्यानें मानच वर केल्याचें दिसत नव्हतें, तर समोरच्या पानांकडे, शेजारच्या पानांकडे, तिकडच्या पानाकडे आणि आपल्या पाना-कडे पाहून पंक्तिप्रपंचाच्या कल्पनांकल्पनांचें द्वंद्व त्याच्या ठिकाणीं सुरू झालें असेल कीं नाहीं हें मला कसें ओळखणार ?

त्या प्रसंगानें माझ्या मनांत बरीक त्या प्रकारचें द्वंद्व सुरू झालें हें कांहीं खोटें नाहीं. आजपर्यंत अगदीं घरांतल्या घरांत, आल्यागेल्यांत, नोकर-चाकरांत, सासूबाई, दादा आणि तिकडे यांच्यांत तसा भेद नेहमीं दिसे; पण त्यावेळीं तितकं माझं लक्ष त्याकडे जात नसे हें जितकं खरं तितकंच गेलंच तर ती एक एकेकाची आवडनिवड असेल म्हणून तसं होत असेल, असं मी मनाचं निराकरण करून घेई हेंही खरं. पण आज मात्र तसं नव्हतं. मनोहरासारखा माहेरचा माझा बाळमित्र माझ्या घरीं जेवायला आला त्या वेळीं सहाजिकच पंक्तिप्रपंचाचं शल्य मला कळलं, बोचलं, दुःख देऊं लागलं. त्यानें मला विचार करायला भाग पाडलं.

मनोहर माझ्या माहेरचा. त्याचं घर आणि माझं माहेरचं घर अगदीं शेजारींशेजारीं. मी, तो, त्याची बहिण शकू, अशीं लहानपणीं एका वयाचीं—एका मताचीं. किती तरी आम्हीं एके जागीं खेळलेलों--भांड-लेलों आणि एक झालेलों. त्यांच्या घरीं मी आणि माझ्या घरीं तीं भांवडें किती वेळां तरी दिवसच्या दिवस काय पण कित्येकदां रात्रींसुद्धां राहिलों सवरलेलों ! मी माझ्या विशेष रूपामुळें दोहीं घरीं सगळ्यांची सारखीच लाडकी होतें तर मनोहर उपजत हुषारीमुळें दोही घरीं सगळ्यांचा

चांगलाच आवडता होता. शकुंतला गुणांनीं चांगली. पण रूपानें सुमार खरी पण तेवढ्यावरून तिला कुणी हिडीसफिडीस बरीक करीत नसे हं! ती देखील सगळ्यांना हवीशीच वाटे. मला तर ती भारीच आवडे. त्यांच्या घरीं कांहीं एवढं तेवढं खायचं केलं कीं मला हटकून बोलावणं यायचंच! माझ्याशिवाय मनोहराला आणि शकूला मुळीं चैनच पडायचं नाहीं. तर आमच्या घरीं आईनं कांहीं केलं तर मी त्यांना आर्जवून बोलवायचीच-त्यांच्याखेरीज मी मुळीं खायलाच कधीं घ्यायची नाहीं. असा आमच्या वागण्यासवरण्यांत अगदीं लहानपणापासून एकोपा होता, भेदभाव मुळीं माहीतच नव्हता. सारख्या स्थितींतल्या आणि कुलशिलाच्या घराण्यांतून भेदभावाचं भूत नाचायला अवकाश कुठून असणार?

तोच भेदभाव आतां मोठेपणीं–आम्हाला चांगलं कळूं सवरूं लागल्या. वर दिसूं लागला. देखतां डोळा होत असतांना आम्हांला तो मुकाट्यानं मूग गिळून बसावं लागलं. आंतल्या आंत सहन करून घ्यावं लागलं!

आतांचा पंक्तिप्रपंच पाहिला नी लहानपण एकदम आठवलं! ती निर्मळ सरळ, भेदरहित अंतःकरणं, ते अव्याजमनोहर आमचे खेळ, आमचीं अल्पकाळ टिकणारीं अहेतुक भांडणं, आमचीं आईबापांनीं केलेलीं कौतुकं, आणि आमचीं मिटवलेलीं गोड भांडणं–सारीं सारीं एकदम डोळ्यापुढें उभीं राहिलीं. क्षणकाल त्या लहानपणाच्या सुखस्वप्नांत मी रंगून–दंग होऊन सभोंवतालच्या जगाला विसरून गेलें, पण तें माझं सुखस्वप्न फार वेळ टिकलं नाहीं. बाहेर पंक्तीवर कांहींतरी प्रकार झाला. बाळक्याच्या हातून कायसंसं चुकलं. घाबरटपणानें पाहुण्यांच्या पानांत वाढतांना हाता-तलं भांडंच पडलं वाटतं. नरसिंह-अवतार दादा त्याच्यावर एकदम ओर-डलं! "गाढवा! हातापायांतला जीव गेला आहे का तुझ्या अगदीं! कधीं जेवतो खातोस का? कां बारा वर्षांच्या दुष्काळांत उपाशी राहिला आहेस? इनामदारांच्या घरचं–फुकटचं–हवं तितकं आणि हवं तसं थाब-डंच्या थाबडं खात असतोस ना? बैल–रेड्यासारखा चरत असतोस कीं! आणि हातांत एवढा जीव नाहीं? तें कांहीं नाहीं. या लेकाला चांगला दोन महिने उपास घातला पाहिजे आणि जनावरासारखा कामाला जुंपला पाहिजे. त्याशिवाय हे लेकाचे उर्मट लोक वठणीवर यायचे नाहींत!"

दादांचा असा गडगडाट ऐकला. माझें सुखस्वप्न त्या क्षणीं विलयाला गेलं. मनाला सांवरलं. काय झालं म्हणून भानावर येऊन शेजारच्या जाळीच्या खिडकींतून पाहिलं, तर बाळक्या थरथर कांपत, पाहुण्यांच्या पानांत पडलेलं भाजीचं भांडं उचलून घेत आहे. दादांच्या तोंडाचा पट्टा एकसारखा चालला आहे. डोळे मोठे आणि लालबुंद करून ते त्यांच्याकडे खाऊं कां गिळूं अशा अर्थानें पाहात आहेत; सगळींच माणसं, हातांतला घास हातांत, तोंडातला तोंडांत—चावायचा किंवा गिळायचाही जशाचा तसाच राहून झालेल्या प्रकाराकडे पाहात आहेत; ज्या पाहुण्यांच्या पानांत भांडं पडलं होतं, त्या पाहुण्यांच्या अंगावर साहजिकच त्यांच्याच पानांतील अन्नाचे कण व पातळ पदार्थांचे शिंतोड उडाले होते, ते डाव्या हाताचीं बोटें, पाणी प्यायच्या प्याल्यांतल्या पाण्यांत बुचकळून हलकेच अन्नाचे कण उडवीत, व पातळ रसाचे थेंब टिपीत "जाऊं द्या हो! यांत कांहीं विशेष नाहीं. हें असं चालायचंच! जा, रे. घाबरूं नकोस, जा तूं! विशेष कांहीं झालंही नाहीं आणि त्यानं मुद्दाम—जाणूनबुजून हें केलंही नाहीं. चला चालूं द्या. जाऊं द्या त्याला" असें ते म्हणत होते. अण्णा व गोपाळभय्या, एकदां दादांकडे तर एकदां तिकडच्या तोंडाकडे आणि पुन्हां बाळक्याकडे पाहात दादांच्या बोलण्याला दुजोरा देत होते. अजून तिकडून बोलायचं बरीक होत नव्हतं! बाबूरावांनीं बाळक्याला दोन शेलके शब्द ऐकवलेच. त्या प्रसंगांत मनोहराची किती केविलवाणी स्थिति झाली होती. आतांपर्यंत तो खालींच बघत होता. पण पंक्तींत घडलेल्या गडबडीनें त्यानें साहजिक वर पाहिलें. सगळीं माणसं बाळक्याला त्या गरीबाला-त्या पोटार्थी जीवाला तडातडा बोलत आहेत हें ऐकून मनोहराला मुळींच बरं वाटत नव्हतं! बाळक्याची चूक होती, नव्हती असं नाहीं पण त्याबद्दल त्याला बोलायचं किती? स्वारी अजून बोलत नव्हती पण काय बोलेल आणि काय नाहीं, याचा नेमच नव्हता! मनोहरानें ओझरतें तिकडे वळून सुद्धां पाहिलें असें मला वाटलें! श्रीमंतांच्या मनांत आलें तर त्या गरीबाला त्याच्या त्या क्षुल्लक अपराधाबद्दल कोणती कडक शिक्षा फर्मावण्यांत येईल? असें मनोहराच्या मनांत आलं असेल का? त्याच्या आलें असेल कीं नाहीं कोण जाणें! पण माझ्या मात्र तें मनांत आलं. पण आलं व

गेलं, इतकंच ! मनांत यायला आणि येसू समोर पंक्तींत वाढतांना दिसायला एकच गांठ पडली. बाळक्याला हद्दपारी तर मिळणार नाहीं असा विचार आला होता त्याला, तिला पहातांच ताबडतोड तिलांजली मिळाली !

मनोहराचें जेवणावरचें लक्ष उडालेलें दिसत होतें. तो मधूनच अगदीं उठून जाण्यासाठीं चुळबुळत असावा असें देखील मला वाटलें. बाबूराव बाळक्याला बोलले खरे, पण तें मनोहराला आवडलें नाहीं. बाबूराव बोलायच्या जोरांत असतां मनोहर त्याकडे अशा कांहीं चमत्कारिक रीतीनें पाहात होता कीं, त्या पाहाण्याचा स्पष्ट अर्थच असा कीं, 'बाबूरावाला, असं उण्याला भर घालायला सांगितलं आहे कुणी ? बाबूराव झाला तरी साधल्याचाच सोबती आहे !'

बाळक्या आंत आला. पंक्तीवरचें वातावरण निवळल्यासारखें झालें. पूर्ववत् जेवणीं, पंक्तीवरील गप्पा, हंसणीं, खिदळणीं सुरू झालीं. पंक्तीवरील गप्पांचे विषय बदलत होते. सामाजिक धार्मिक, शिक्षणविषयक, ग्रामपचायतीचे, ग्रामसंघटनेचे, खेड्यांच्या सुधारणेचे, रोगराईचे, तर गरीबांच्या उद्धाराचे, असे अनेक परींचे विषय आलेल्या पाहुण्यांमधून निघत. आपसांत तेच बोलत आणि वर्तमानपत्रांतील प्रचलित चर्चेविषयीं आपण चर्चा करीत. अशा वेळीं आमच्यापैकीं फारसें कुणी बोलतच नसे. कोण बोलणार ? घरीं मोठेपणा म्हणून पुष्कळ मासिकें, वर्तमानपत्रें, नियतकालिकें येत असत. पण तीं वाचणार कोण ? त्या वाचनाची आवड कुणाला ? बाहेरचा कोण येईल जाईल तोच वाची. क्वचित् एकादें पत्र किंवा मासिक जातांना काखोटीला घेऊन चालता देखील होई ! त्याची दाद कोणाला कशी असणार ? कित्येक वर्तमानपत्रें आणि मासिकें वरील वेष्टन काढल्याशिवाय तशींच्या तशींच असत—कोण फोडणार ? कोण वाचणार ? आवड कोणाला त्याची ? वाचनाची आवश्यकता काय आम्हां श्रीमंतांना ! मी पुस्तक—वर्तमानपत्र–मासिक घेतलंलं जिथं फारसं कुणाला खपायचं नाहीं; तिथं आणखी काय पाहिजे ? कधीं कधीं मीच कांहीं वाचलं व मला तें अतिशय आवडलं म्हणजे मोठ्या हौसेनं, उत्कंठेनं, तिकडे वाचायचा आग्रह करावा. लहर असेल तर माझ्या समजुतीकरितां मी दिलेलं पुस्तक हातांत घेऊन वाचण्याचा बहाणा करावा. जेमतेम दोन चार ओळीवरून

नजर फिरवावी, कीं लगेच कांहीं तरी निमित्त काढून हातचं पुस्तक दूर करावं, जांभया द्याव्या, " कोऽण करतो इतका वाचनाचा व्याप ? आणि समजतं आहे काय त्यांत आम्हांला ? शिवाय वाचून करायचं आहे काय ? कुठें आम्हांला नोकरी चाकरी मिळवायला जायचं आहे ? बस्स झालं ! काय वाचायचं तें तुम्हींच वाचा. तुम्हीं वाचलं म्हणजे आम्हीं वाचल्याप्रमाणंच झालं. ! " असें म्हणावें. असें जिथं स्वत:चेंच असे, तिथें दुसऱ्याविषयीं चौकशीहि करण्याचें कारण नाहीं. तेव्हां जेवणावर तसले विषय निघाले तर आमच्यापैकीं कोणती मंडळी त्यांत भाग काय घेणार ? त्या वेळीं मनोहरानें देखील पाहुण्यांच्या त्या बोलण्यांत कोणताही भाग—घेतां येण्यासारखा असूनही—घेतला नाहीं. त्याचें चित्तच मुळीं थारी नव्हतें हेंच खरें !

तो जेवण केल्यावर जाणार कीं राहणार ? तो आला आहे कशाला ? आमच्या इथें कांहीं उद्देशानें आला आहे का ? माझी भेट घेईल कीं भेट घेतल्याशिवाय तसाच जाईल ? माझी भेट घ्यायची त्याच्या मनात असली तरी तो विचारणार कोणाला ? कोण त्याला तशी परवानगी देणार ? श्रीमंताच्या घरीं मुलगी पडली म्हणजे आईबापांनासुद्धां गांठीभेटीला महाग होते, मग शेजाऱ्यापाजाऱ्याबद्दल बोलायलाच नको !

माझं मन त्याची भेट घ्यायला, त्याच्याशीं चार शब्द बोलायला, माहेरकडची विचारपूस करायला कसं उत्कंठित झालं होतं. माहेरचा माझा मनोहराचा पुष्कळ संबंध असेल; पण तें नातें श्रीमंतांना काय होय ? मीं विचारूं कशी ? त्याला बोलावूं कशी ? भेटायचं आहे म्हणून सांगूं कुणाजवळ आणि कशी ? येसूजवळ सांगावं का ?—अं हं ! त्याचा कांहीं उपयोग व्हायचा नाहीं. ती कशी त्याला जाऊन सांगणार ? बाळक्याला सांगितलं तर ? पण बाळक्या या वेळीं तरी ऐकायचा नाहीं. त्याचीच नुकती कंबक्ती उडाली आहे ! मनोहर माझ्या घरीं येऊन, मी त्याच्याशीं बोललें नाहीं तर त्याला काय वाटेल ? माझ्याविषयीं त्याची काय कल्पना होईल ? तो माहेरीं जाऊन माझ्याविषयीं काय सांगेल ? त्याच्याशीं बोलणं माझं कर्तव्य नाहीं का ? त्याच्या बहिणीची—शकूची—माझ्या बालमैत्रिणीची चौकशी मला त्याच्याजवळ करायला नको का ? स्वत:ला कुणाकडून तरी आंत बोलावून मनोहराला मला भेटायचं आहे, असं सांगून स्वतःकडूनच मनोहराला भेटा-

यची परवानगी मिळवली तर ? पण तसं तरी कुठलं व्हायला ? चार दिवस झाले. स्वारीचा माझ्यावर उगीचच घुस्सा झाला आहे. किती निरोप बाळक्याबरोबर पाठविले, तरी उभाउभी देखील आंत यायचं होत नाहीं. तर मनोहराबद्दल मी स्वतः सांगूं कशी आणि विचारूं कशी ?

मला मोठं कोडं पडलं. मन बेचैन झालं. आजचा दिवसच भारी खस्याळ असला पाहिजे. दिवसभर एकावर एक सारखे आघातावर आघात होत होते. सोसूं तरी कुठवर ? रानांवनांतून जात असतां चोहींकडून आग पेटत जावी, ती दिसूं लागावी, हलके हलके ती जवळ जवळ येत असल्याचं दिसावं, आपल्याला अल्पावकाशात ती आग येऊन लगटणार, अशी साधारण भीति वाटायला लागावी. त्यांतून निसटायला—सुखाचा मार्ग सांपडायला कुठेंच कांहीं आसरा दिसू नये आणि मन गांगरून, घाबरून, गोंधळून जावं, तशीच गत माझी होऊं लागल्याचा मला भास होऊं लागला.

येसूच्या उर्मट वागणुकीचं शल्य डोळ्यांत सारखं खुपत होतं. हरिणीच्या टापेचा तडाखा नुकताच काळजाला दणका देऊन गेला होता. मनोहराला पंक्तींत अकस्मात् पाहून आनंद आणि आश्चर्य यांच्या मिश्र सुखाचा अनुभव मिळण्याच्या कल्पनेपूर्वीच पंक्तीप्रपंचाचें पिशाच्च पंक्तींतच नाचत असलेलें पाहून माझं हळवं मन मलूल होऊन गेलं होतं. आतां त्या सर्वांवर कळस म्हणूनच कीं काय मनोहर माझ्या घरांत येऊन तो माझ्याशीं बोलल्याबसल्याशिवाय आणि मी त्याच्याशीं बोलल्या संवरल्याशिवाय तसाच जाऊन होणार होता ! श्रीमंतींतल्या केवढाल्याही सुखापेक्षां हीं दुःखंच मनाला एकसारखीं छळीत होतीं !

इकडे तिकडे होत आहे तोंच पंगत उठली देखील. मागल्या चौकांत सारींजणं हात धुवायला गेलीं. स्वारी नियमाप्रमाणें हात धुवायला मोरीवर गेली. बाळक्या खांद्यावर टावेल टाकून धांवपळ करीत हातांत तांब्या घेऊन हातावर पाणी घालायला गेला. येसूला काय वाटलं कीं, ती हातावर पाणी घालायला निघाली होती. पण तिकडून बाळक्यालाच हांक मारणं झालं होतं म्हणून तिचा नाइलाज झाला. माझ्याही मनांत त्याच वेळीं स्वारीला जाऊन भेटावं आणि मनोहराबद्दल सांगावं असं आलं आणि मी तिकडे निघालें. बाळक्या हातावर पाणी घालीत होता. येसू मागें वळून

वळून पहात परत स्वयंपाकघराकडे येत होती तोंच स्वारीनें बाळक्याला म्हटलेलं मीं ऐकलं, " काय लेका नेभळा आहेस रे ? अशानं तुझी बायको तरी तुझ्या ताब्यांत राहील का ? बायकांना जरबेंत ठेवायला अंगांत जरा रग लागते—ती नसेल तर बायका हांहां म्हणतां डोक्यावर बसतील ना ?—"

हें मी ऐकलं. येसूनं पण मागें वळून चांगलं कान भरून ऐकल. तिला त्याचं काय वाटलं असेल ? म्हणून पाहिलं तों ती मेली तें ऐकून हंसतच होती, तिला वाईट मुळींच वाटलं नाहीं. मला बरीक चर्रर झालं ! "बाय. कांना जरबेंत ठेवायचं ! नाहीं तर त्या डोक्यावर बसतील ? " तें म्हणणं बाळक्याला होतं कीं मला ? मला जरबेंत ठेवायचं का चार दिवस प्रयत्न चालले आहेत ? पण मी तिकडे जरबेंत आणखी राह्यचं म्हणजे तरी काय ? आज कुठं नाहीं मी जरबेंत ? लग्न होऊन इथं आलें नी माझ्या शिक्ष- णाची शोभा सरली, मनाची हौस हरली, मनाचा मोकळेपणा मावळला- स्वतःची अगदीं छाया बनलें. तिकडे जें बरं तें माझं बरं. तिकडची जी आवड ती माझी आवड. स्वारीला ज्याची नावड, तें माझं वावडं—अशी मी वागायला लागलें होतें. मग मी आणखी ती कशी जरब बाळगा- यची ? कांहींच कळेना ! लेकी बोले सुने लागे, या न्यायानें बाळक्याला उद्देशून बोलणं झालं तें मी मलाच लावून घेतलं—पुढें निघालें होतें ती तशीच मागें परतलें. मी मागें परतलें. पाय मागें वळले. पण डोळ्यांत दबलेल्या अश्रूंना मात्र मला मागें वळवितां आलं नाहीं. ते माझ्या दाबाला न जुमानतां डोळ्याच्या बाहेर आले ! कुणाच्या लक्षांत येऊं नये म्हणून मी चट्दिशीं पदरानें आपले डोळे पुसले. चूळ भरण्याच्या निमित्तानं पाणी घेऊन, चूळ भरून, डोळ्याला लावलं. तोंडावरून, केसांवरून हात फिर- विला आणि माझं सासूबाईच्या जवळ पान मांडलं होत तिकडे निघालें. जायला आणखी थोडा वेळ लागला असता तर सासूबाई मला बोलायला येसूला धाडीतच होत्या.

पानावर जाऊन बसलें. जेवायला सुरवात झाली. पण कांहीं केल्या जेवणावर लक्ष लागेना. हात तोंडाकडे घांस आणायला दिरंगाई करूं लागले. तोंडांत घोळणारा घांस घशाखालीं उतरायला कां कूं करू लागला. बाह्यतःच मी जेवायला बसलें होतें. मी मनोहरासमोर जाऊनही त्यांनं ओळ-

खलें नसेल ? कसं ओळखणार ? त्याला काय कल्पना मी या घरीं येऊन पडलें आहे म्हणून ? माझ्या लग्नाच्या वेळीं तो होता कुठें इथें ? शिक्षणाच्या सोयीच्या नादानं कलकत्ता, कानपूरकडे कुठेंतरी भटकत होता ! माझ्या लग्नाची त्याला दादही नव्हती. तो तिकडून केव्हां आला आहे ? आपल्या घरीं तरी गेला होता का ? घरीं माझ्याबद्दल त्याला काय कळलं असेल ? फार फार तर ' शेजारची माणिक श्रीमंत घराण्यांत पडली आहे—' असं कांहीं तरी त्याला कळलं असेल. पण अमुकच ठिकाणीं म्हणून त्याला कुणी सांगितलं नसेल आणि त्यानं तितक्या ह्यानं मग विचारलंही नसेल. पण छेः ! त्याला ह्या घरीं मला दिलं आहे असं नक्की कळलं असलं पाहिजे. शकू त्याला सांगितल्याखेरीज कशी राहील ? तो नसला तरी ती नव्हती का माझ्या लग्नांत. त्यानं तिला विचारलं असेल. तिनं सारी कथा त्याला ऐकविली असेल. त्याला तें ऐकून अत्यन्त आनंद झाला असेल. त्या आनंदाच्या भरांत मला भेटायला—माझं अभिनंदन करायला—माझं कौतुक करायला आणि माझ्या शहाणपणाचा आणि माझ्या हक्काच्या संपत्तीचा गोरगरीबांना, दीन दुबळ्यांना, अंधपंगूंना, गरीब पण होतकरू हुषार अशा मध्यम स्थितींतल्या आणि कनिष्ठ स्थितींतल्या विद्यार्थी–विद्यार्थिनींना, शेतकऱ्यांच्या कामकऱ्यांच्या मुलांमुलींना, अर्धपोटीं राहणाऱ्या जीवांना उपयोग करून देऊन त्या सर्वांचा दुवा घे असं मला सांगायला म्हणून मनोहर निघाला असेल. पण—

पण माझ्या गढीवर पाय ठेवतांच, दरवाजामागून दरवाजे ओलांडतांच, आमच्या वाड्यांत चौफेर नजर टाकून एकंदर अवस्था पाहतांच आणि स्वतःचं गोरगरीबांशीं वागणं—त्याच्याशीं वागणं पाहातांच त्याची सर्व कल्पना बदलली असेल. त्याची आत्यंतिक निराशा झाली असेल. अशा स्थितींत माझी ओळख काढणं देखील त्याला गैर वाटलं असेल. हो, असंच असेल. नाइलाज म्हणून, व्यवहार म्हणून, तो कुणाच्या तरी सांगीवरून जेवायला खायला राहिला असेल, पण त्यानं चुकून वर पाहिलं नाहीं, कीं मला ओळखीची जाणीव दिली नाहीं ! हें झालं आहे कीं तें ? हें घडलं आहे कीं तें ? कांहींच कळेना ! माझ्या मनांतल्या मनांत हेंच विचार-

चक्र जोरानें फिरत होतें. माझ्या जेवणाकडे सहज सासूबाईचं लक्ष गेलं. येसू माझ्यापुढं वाढण्याकरितां जिन्नस घेऊन उभी होती. माझ्या हवं नको म्हणण्याची वाट पहात होती. " अग हें ग काय? जेवणावर तुझं लक्ष कां नाहीं? बरं का वाटत नाहीं तुला आज? खाववत नसेल तर घेऊं नकोस आतां कांहीं–पण हें काय? बरं वाटत नसलं तर सांगायला नको का?"

सासूबाईचे हे शब्द माझ्या कानीं पडले. मी खडबडून जागी झालें. वर येसूकडे पाहिलें. माझी जरा तारांबळच उडाली. येसूला 'नको कांहीं मला' असं हातांनींच खुणविलं. 'बरंच वाटत नाहीं. नकोच जेवायला' असं पुटपुटत मी पानावरून उठलेंच!

हात धुवून तशीच माडीवर गेलें. सहज खिडकीबाहेर डोकावून पाहिलं. दूर खालीं–अगदीं शेवटच्या दरवाजाच्या बाहेर रस्त्याला बाबूराव आणि मनोहर जात असतांना मला दिसले. दोघेही गांवाला जात असल्यागतच दिसले. बाबूरावांच्या बरोबर मनोहर आला होता? तो त्यांच्याबरोबरच गेला. बाबूराव त्याला पोंचवायला गेले कीं त्याच्याबरोबरच गेले?

असे प्रश्न माझें खुळें मन मला करूं लागलें. ते दोघे गेले तिकडे किती तरी वेळ तशीच मी पाहात उभी होतें. मनोहर–पंक्तीप्रपंच–तो घरीं येऊन त्याच्याशीं बोलतां आलें नाहीं–पंक्तीवरचा प्रकार–स्वारीचं बाळ-क्याला बोलणें–हरिणीची कहाणी–सकाळपासून या घडलेल्या गोष्टी सारख्या मनांत आळीपाळीनें येत होत्या. विचारांच्या भोंवऱ्यांत सांपडल्यासारखं झालं होतं! बाहेर पडायला मार्ग सांपडत नव्हता–जीव कसा गुदमरल्या-सारखा झाला होता!

मी खिडकींतून दृष्टि काढली. सहज मागें पाहिलं तों समोरच्या मोठ्या आरशांत माझंच प्रतिबिंब मला दिसल. त्याबरोबरच कोपऱ्यांतल्या टेबलावर वाचतां वाचतां तसेंच उघडें राहिलेलं पुस्तक–वाऱ्यानें त्याचीं पानें उडतांना दिसलीं–दोन कल्पना भुर्रकन् चिमणीसारख्या येऊन गेल्या– 'गडे माणिक, इनामदारांच्या घरांत–त्यांच्यावर तुझी छाप जर बसली नाहीं, तर तुझं सौंदर्य आणि शहाणपण फुकटच नाहीं का?'—

# अण्णाचें अंतरस्थ-



## प्रकरण सहावें

### रिकामी कटकट

जेवण होण्यापूर्वीच इनामदारांची गढी पाहुण्यांना दाखविण्याचें काम आटोपलें होतें. गढीचें ऐतिहासिक महत्त्व काय ? ती किती शतकापूर्वी बांधली असेल ? कुणी बांधली आहे ? बांधली तेव्हां ही कशी दिसत असेल ? तिचें महत्त्व त्यावेळीं काय असेल ? या गढीच्या सभोंवतीं कित्येक लढाया झाल्या असतील ! इनामदारांच्या पूर्वजांपर्की कितीकांनीं लढाया जिंकल्या असतील ! कुणी लढाईंत कामाला आले होते काय ? इनामदारांचा मूळ पुरुष कोण ? तो केव्हां उदयास आला ? कोणाच्या पंदरीं होता ? इनामदारीची सनद या घराण्याला कोणाकडून, कोणत्या काळांत आणि कां मिळाली ? मुसलमानी बादशहाकडून कीं मराठी साम्राज्यसंस्थापकांकडून ? पेशव्यांचें पाठीराखेपण या इनामदार घराण्याकडन

कांहीं झालें आहे काय ? पूर्वींचे दिले गेलेले हक्क आजच्या राजवटींतही चालू आहेत कीं कालमानानुसार त्या हक्कांची कांहीं छाटाछाट झाली आहे ?–वगैरे प्रश्न आलेले पाहुणे गढी पाहतां पाहतां मोठ्या उत्सुकतेनें, उत्कंठेनें आणि कळकळीनें मधून मधून पण एकसारखे आमच्या राजाभाऊ इनामदारांना विचारीत असत. राजाभाऊ इनामदार आहेत–या गढीचे मालक आहेत—ही वास्तुच जर त्यांच्या भोगवट्याला आहे, तर हिच्यासंबंधींची इत्थंभूत माहिती श्रीमंत राजाभाऊंना असलीच पाहिजे–अशी पाहुणे मजकूरांची पक्की खात्री झालेली होती, असें त्यांच्या विचारण्याच्या झोंकावरून दिसत होतें. त्या विचारण्याच्या भरांत पाहुणेमहाशय दंग असल्यामुळें प्रश्नांचीं उत्तरं देणाऱ्या श्रीमंत राजाभाऊंची आणि त्यांच्याबरोबर त्यांच्या आम्हां सोबत्यांचीही काय तारांबळ उडत आहे याकडे पाहुण्यांचें लक्ष होतें कुठें ? राजाभाऊ तर ऐकल्या न ऐकल्यासारखें करीत आणि पुढें चालूं लागत ! गढीसंबंधानें आणि इनामदारीच्या हक्काच्या मूळ माहितीसंबंधानें पाहुण्यांचा विचारण्याचा हेतु वावगा तर मुळींच नव्हता ! उलट या गढीच्या आणि इनामदारीच्या मागें कांहीं उज्ज्वल इतिहास असलाच पाहिजे तो कळावा व आपल्या आनंदांत आणखी सात्विक भर पडावी असाच चांगला हेतु असला पाहिजे, असेल, नव्हे होताही. पण आम्हां कोणासच पूर्व माहिती तशी कांहीं ठाऊक नसल्यामुळें पाहुणे भलते सलते प्रश्न न विचारतील तर बरें, असें निदान मला तरी वाटूं लागलें. राजाभाऊ प्रश्नांचीं उत्तरें मुद्दामच देण्याची चुकवाचुकवी करताहेत कीं ते ते प्रश्नच ऐकत नाहींत, हें मधूनच त्यांच्याकडे पाहून सहज अजमावण्याचा मी प्रयत्न केला. त्यांनीं माझ्याकडे पाहिलें–बोलणें झालच नाहीं कांहीं; पण त्यांच्या पहाण्यावरून आणि चेहऱ्यावरील विकारांवरून मात्र असें खास कोणालाही वाटलें असतें कीं ‘ पाहुण्याची काय ही रिकामी कटकट आहे ? आपली मुकाट्यानें गढी पाहिली–चांगलं म्हटलं सोडून दिलं त्या ह्या भलत्याच उठाठेवी यांना सांगितल्या आहेत कोणी ? गढीचा आणि आमच्या इनामदारीचा पूर्वइतिहास घेऊन यांना काय करायचा आहे ? बरं, त्यांना पुष्कळ हवा असला आणि आम्हांला, जर तो माहित नसला तर आम्हीं तरी तो त्यांना द्यायचा कुठला ? गढी

दाखवायला आणलें ही जणूं कांहीं आम्हीं चूकच केली म्हणायची! ही गढी आहे, ती आमची आहे, आम्हीं तिचे आतां मालक आहोंत, येवढी माहिती काय या रिकामटेकड्यांना पुरेशी होत नाहीं?—'

हे असे राजाभाऊंच्या मनांत विचार आले असावेत असें मला वाटलें. माझ्या तर ते मनांत आलेच आले. अहो, कां नाहीं येणार? आम्हीं त्यांचे इतके जिगरदोस्त ना? पण आम्हीं कुठें त्यांच्या गढीचा आणि इनामदारीचा पूर्व इतिहास समजावून घेतला होता? कारण काय त्याचें? आमच्यासारखीच राजाभाऊंचीही अवस्था होती. मग ते झाले तरी पाहुण्यांच्या फाजील चौकशीची हौस भागविणार कसे? गढी दाखवावयाला नेतांना पाहुणे असें कांहीं आचरटासारखें विचारीत सुटतील ही कल्पनाच आम्हां कोणाला नसल्यामुळें पाहुण्यांनीं राजाभाऊंना पहिलाच प्रश्न केला तेव्हां त्या प्रश्नाचें उत्तर देतानांच राजाभाऊंची थोडीशी गडबड झाली.

" काय हो इनामदारसाहेब, ही इनामदारी तुमच्याकडे कशी आली?"

" कशी आली? अहो, मी दत्तक आलों ना या घराण्यांत!"

" तसें नव्हे! मीं आपल्याबद्दल विचारलें नाहीं. हें इनाम प्रथम कुणी मिळविलें आहे असा माझ्या प्रश्नाचा अर्थ होता—"

" हं हं! असं होय–त्याचं असं आहे—" राजाभाऊ एवढं म्हणाले आणि गोंधळले! मी जवळच होतों. मी पुढें सरसावलों–राजाभाऊंना साह्य करणं माझं कामच होतं. " काय रे अण्णा–आमच्या या घराण्याच्या मूळ पुरुष–पहा–त्याचं नांव—"

" आपल्या दप्तरीं कागदोपत्रीं आहे ना!—आपल्या दादासाहेबांना माहीत आहे तें!" मीं राजाभाऊंना व पाहुण्यांना एकदमच माहिती दिली. आमची हातचलाखी पाहुण्यांच्या ध्यानीं आली कीं नाहीं तें समजलें नाहीं, परंतु तो प्रश्न त्यांनीं पुन्हां विचारला नाहीं इतकें मात्र खरें. आम्हीं दादासाहेबांचा हवाला दिला होता तेव्हां कदाचित् दादासाहेबांना विचारण्याचें त्यांनीं ठरविलें असेल कीं काय, कोण जाणें!

पुढें पाहुणे मध्येंच कांहीं विचारीत तेव्हां राजाभाऊंनीं प्रथम माझ्याकडे पहावें आणि लगेच जीभ चावीत चावीत बोलावें—तें आमच्या कागदोपत्रीं आहे–आमच्या दादासाहेबांना तें माहिती आहे–हें माझें एक वाक्य

राजाभाऊंच्या चांगलेंच त्या वळीं उपयोगी पडलें. माझी मी, त्या समय-सूचकतेकरितां लगेच शाबासकी घेतलीच! पण 'असावा तर ऐन वेळीं सांवरून धरणारा अण्णासारखा सोबती असावा. अण्णा आहे हें आपल्याला एक भूषण आहे,' असें म्हणून राजाभाऊंनीं आपण होऊन शाबासकी दिली पाहिजे—तशी शाबासकी त्यांच्याकडून आपण मिळविणार असें मनाशीं त्याच वेळीं मी ठरवूनही टाकलें!

बाकी आमचे राजाभाऊ तसे धूर्त! माझें एक सूत्रवाक्य त्यांना घोरपडीसारखें चिकटून राहायला मिळालें. त्या एका आधारावर त्यांनीं पाहुण्यांना तसेंच अखेरपर्यंत झुलविलेंही असतें. परंतु पाहुण्यांच्या एकंदरींत रागरंगावरून आणि प्रश्न विचारण्याच्या तऱ्हेवरून, राजाभाऊंना विश्वास येईना—त्यांनीं मला हलकेंच खुणावून जवळ बोलावलें—पाहुण्यांना गढी पाहण्याच्या भरांत जरा पुढें जाऊं दिलें आणि मग मला म्हटलें, "अण्ण्या, लेका, पाहुण्यांचें हें रे काय लचांड आहे? लेकाचे वाटेल तें विचारीत आहेत—आपल्याला नाहीं त्यांना उत्तरें देतां येत—तूंच हो त्यांच्या तोंडाशीं, आणि काय उत्तरें द्यायचीं तीं तूंच दे—नाहीं तर रिकामी कटकट पाहिजे आहे कशाला? इथूनच आपले परतूं या कसे?" असें म्हणून राजाभाऊंनीं माझा हात धरला आणि ते खरेंच मागें परतले. पण तोंपर्यंत पाहुणे मजकूर गढीच्या एका बाजूच्या बुरुजावर जाऊन दाखल झाले—त्यांनीं एकदां चौफेर आपली नजर फिरविली—बुरुजावरून बाहेरच्या बाजूला वांकून पाहिलें—आंत सर्व गढीचें निरीक्षण केलें. वरून सभोंवतालचा जितका प्रांत दृष्टीच्या टापूंत येत होता तेथवर नजर फेंकण्याचा त्या पाहुण्यांनीं प्रयत्न केला. ती वेळ उन्हाची—पायाखालची जमीन तापूं लागली होती. अंगाला उन्हाचा चटका बसूं लागला होता. घामसुद्धां निथळण्यास सुरवात होत होती पण गढी पाहण्याच्या भरांत पाहुण्यांना त्या कशाचीही बाधा होतेशी वाटलें नाहीं! गढीचें निरीक्षण करीत असतांना त्या पाहुण्यांचा चेहरा एक प्रकारें खुलून दिसत होता.

आम्हीं अजून मागेंच होतों. आणखी हे बृहस्पति काय काय विचारणार आहेत याबद्दल राजाभाऊंना आणि मला जरा कोडेंच पडलें. पण कोडें पडून गत्यंतर नव्हतें. त्यांच्याजवळ जायलाच पाहिजे होतें. आम्हीं

पाहुण्यांच्याजवळ गेलों. जवळ जायचाच अवकाश, त्यांनीं राजाभाऊंच्या खांद्यावर आपला एक हात ठेवला; त्यांच्याकडे आपादमस्तक एकदां स्थिर दृष्टीनें निरखून पाहिलें; खांकरून घसा साफ केला व गळ्याभोंवतीं गुंडाळलेलें उपरणें सांवरून नीटनेटकें केलें. गढी पाहून त्या महाशयांना काय स्फूर्ति झाली कोण जाणें त्यांनीं एकदम बोलायलाच आरंभ केला.

"इनामदारसाहेब, या गढीसंबंधानें आणि तुमच्या मूळ इनामदारासंबंधानें माहिती सांगा अगर नका सांगूं—तुमच्या पूर्वजांची प्रौढी मिरवा अगर नका मिरवूं. तुम्हीं सांगितलं नाहीं तरी ही गढी आपला गत इतिहास मला मूक शब्दांनीं सांगत आहे. गढीच्या या कोसळत्या भिंती, जीर्ण—पडके—फुटके बुरूज, यांनीं एके काळीं आपल्या धन्याच्या सहाय्यानें तुमच्या पूर्वजांच्या सहाय्यानें केवढे पराक्रम केले असतील! स्वकीयांचें संरक्षण करण्याकरितां जिवावर उदार होऊन या गढीच्या भोंवतीं कंबरा कसून चढाई करणाऱ्या शत्रूंची कशी दाणादाण उडविली असेल! शत्रूंचा निःपात करण्यासाठीं या गढींत जागजागीं नेकीनें झुंजणाऱ्या किती शूर वीरांचें रक्त सांडलें असेल! जेथें जेथें आज तुमच्या हयातींत निवडुंगांचे डंगच्या डंग माजलेले दिसत आहेत, त्या जागीं पूर्वींच्या—गढीच्या वैभवाच्या—काळीं शूर शिपाई आपल्या संगिनी सरसावून आणि तरवारी पाजळून हुशारपणानें बसले असतील! तो कोपऱ्यांतला जुनाट प्रचंड पिंपळ आज वठत आला असला तरी त्यानें पूर्वकाळींचं गढीचं आणि गढीच्या धन्याचं वैभव पाहिलं असेल! बाहेरच्या नाल्यांतून, खंदकांतून शत्रूंच्या रक्ताचे पूर वाहिले असतील! जे कोणी त्यावेळीं गढीच्या आश्रयाला आले असतील, स्वतःच्या छातीवर शत्रूंच्या बंदुकांच्या गोळया आणि गोफणगुंडे ज्या कोणाकरितां या गढीनें मोठ्या ऐटीनं सहन करून घेतल्या असतील, गढीच्या आणि आप्तस्वकीयांच्या बचावाकरितां ज्या कोणी आपले प्राण खर्ची घातले असतील—त्या सर्वांची साक्ष म्हणजे आजच्या परिस्थितींतील ही गढी आहे. तिचा भोगवटा घेणारें आपलें घराणें! इनामदारसाहेब, तुमच्याविषयीं आम्हांला आदर कां वाटणार नाहीं? ही गढी आपण आणि आपल्याच प्रमाणें इनामदारीला चिकटून राहणारी त्या वेळच्या नेकजातांची आजची प्रजा, या सर्वांबद्दल आम्हांला केव्हांही आदरच वाटला पाहिजे.—"

पाहुणे थोडा वेळ सहज थांबले. मी पाहुण्यांकडे तटस्थपणें पहात होतों. श्रीमंत राजाभाऊंचा गडबडगुंडाच उडाला होता. पहिल्यांदा ते पाहुण्यांकडे आ करून पाहूं लागले. पण त्यांच्या भाषेची काय घोडदौड चालू झाली. याचा उलगडा होईल असें जेव्हां त्यांना वाटेनासें झालें, तेव्हां इकडे तिकडे टिवल्या बावल्याच करण्याची त्यांना इच्छा होऊं लागली !

एक पाहुणे बोलत होते–दुसरे पाहुणे बोलणाऱ्या पाहुण्याकडे आणि आमच्याकडे फेरपाळीनें पहात होते. ते बोलत नव्हते–म्हणजे एकाच वेळीं दोघांना बोलतांच येणें अशक्य होतें म्हणूनच दुसरे स्वस्थ होते–नाहीं तर तेही पहिल्याप्रमाणेंच बोलले असते–कारण मी पहात होतों, गढी पाहण्याचा परिणाम त्यांच्यावरही खूपच झाला होता. पहिल्या पाहुण्यांनीं बोलायला संधि दिली असती तर ते बोलूंही लागले असते. बोलताना ते फक्त आवंढा गिळण्यापुरतेंच थांबले म्हणून त्यांचाच काय पण श्रीमंत राजाभाऊंचा देखील नाइलाज झाला. राजाभाऊ त्यांचें बोलणें तितकेंच थांबवून दुसरीकडे घेऊन चलणार होते पण तितक्यांत पाहुण्यांनीं पुढें सुरवात केलीच–,"राजाभाऊ, तुम्ही कांहीं म्हणा पण असं एकादं ऐतिहासिक स्थळ पाहिलं, त्याचा विचार मनांत आला, त्याचा इतिहास डोळयापुढं येऊं लागला कीं मन उचंबळून येतें ! भिरभिरल्यासारखं होतं व त्यासंबंधानें किती बोलावं आणि किती नाहीं याला सुमारच राहात नाहीं. महाराष्ट्रांत,हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं असल्या कितीतरी गढ्या पहाण्याचा आम्हांला योग आला आहे. त्या त्या गढ्यांचे पूर्वइतिहासही ऐकायला मिळाले आहत! बहुतेक गढ्यांचीं स्वरूपं आजच्या या तुमच्या गढीसारखींच भयाण, भेसूर, पडीक, उदास अशींच दिसलीं ! पूर्वकाळच्या वैभवानें आनंद मानावा कां सांप्रतच्या त्यांच्या भयाण उदास दर्शनानें उदास व्हावं हेंच कळत नाहीं आणि मग मन बेचैन झाल्याशिवाय रहात नाहीं ! पूर्वी या गढीचं वैभव काय असेल ? काय थाट असेल ? किती माणसांचा गजबजाट यावर चालत असेल ? हिच्यांत कोणतं नवचैतन्य त्या वेळीं खेळत असेल ? त्या वेळची गढी- त्यावेळचे लोक—त्या वेळचं आश्चर्य— "

"हं ! तें सारें काळाबरोबर नाहींसं झालं ! करायचं काय त्याला" पाहुणे पुन्हां थोडे थांबतांच मी संधि साधली व त्यांनीं आपलें भाषण संपवावें म्हणन

मध्येंच म्हटलें. " त्याचं असं आहे पाहुणे, चालू काळाला महाराष्ट्रांतल्या काय किंवा कुठल्या काय कोणत्या गडाची–किल्याची–गढीची त्या वेळची स्थिति राहिली आहे? आपलं राज्य गेलं, त्याबरोबर सारंच गेलं! ज्या ठिकाणीं पांचपांचशें माणसं वावरायचीं, त्या ठिकाणीं आमच्या राजाभाऊंना आपल्या दहापांच माणसांच्या कुटुंबासह रहावं लागतं आहे. तिथलं तें पूर्वीचं चैतन्य, पूर्वीचा गजबजाट आणि पूर्वीचं वैभव गढीवर दिसणार कसं? बरं, गढी पडली आहे, म्हणून ती आतां दुरुस्त का करतां येणार आहे? आणि करून तरी उपयोग काय? शत्रूशीं गढी लढवायची आहे थोडीच? आतां हें ऐश्वर्याचं अवशिष्ट फक्त दाखवायलाच राहिलं आहे. नाहीं तर तुम्हींच सांगा, काय या अवाढव्याचा उपयोग आहे हो?"

" कां बरं? अण्णासाहेब, असं कां म्हणतां?" आतांपर्यंत स्तब्ध होते त्या पाहुण्यांनीं माझ्या प्रश्नाला उत्तर द्यायची संधि साधली. वास्तविक सर्व बोलणेंच बंद व्हावें–बंद पाडावें या उद्देशानें मी बोललों होतों. पण माझा तो प्रयत्न अनाठायीं होता हें दुसऱ्या पाहुण्यांनीं माझ्या प्रश्नाला उत्तर द्यायला पुढें सरसावून, तात्काळच माझ्या प्रत्ययाला आणून दिलें.

" हां, अण्णासाहेब, तुमचें हें म्हणणें कबूल आहे. या गढ्यांची पूर्वावस्था आतां त्याना प्राप्त करून देतां येणार नाहीं आणि त्या खटाटोपाचा उपयोगही नाहीं. गढ्या सज्ज करून कांहीं आतां लढवावयाच्या नाहींत! आणि समजा, लढाई करण्याची पाळी आली तर लढायांना या गढ्या अगदीं निरुपयोगी आहेत. आतां लढायांची तऱ्हा निराळी झाली आहे. लढाईचें स्वरूप पालटलं आहे! लढायांच्या साधनसामुग्रींत, पद्धतींत जमीन अस्मानाइतकं अंतर पडलं आहे! तेव्हा—"

" होय ना? खरं ना हें? मग मी तर तेंच म्हणतों आहे तुम्हांला—"

" कबूल! अहो, तें कबूलच आहे मला. पण तें कबूल करूनहि मला पुढें असं म्हणायचं आहे कीं, पूर्वीचं स्वरूप या गढीला येणार नसलं, त्या दृष्टीनं याचा कांहीं उपयोग नसला तर आजच्या काळाला साजेसं, उपयुक्त होणारं स्वरूप, अशा गढ्यांना देतां येणार नाहीं किंवा देऊं नये असं थोडंच आहे? या गढीचा आजचा भेसूरपणा, उदासीनपणा, पडीकपणा, घाणेरडेपणा काढून टाकूं नये, असं थोडंच आहे?"

"सगळं खरं, पण इतका व्याप करून करायचं आहे काय?" मध्येंच राजाभाऊंना विचारण्याची हुक्की आली.

"असं विचारा राजभाऊ तुम्हीं!" दुसऱ्या पाहुण्यांना बोलायला अधिक जोर आला. "मी सांगतों आपल्याला. राजाभाऊ, आपण श्रीमंत आहांत, तडफेचे तरुण आहात, तुमच्या सत्तेची ही एवढी अफाट जागा आहे. ज्या गांवांत आपण राहतां आहांत तो सबंध गांव तुमच्या इनामी हक्काचा आहे, तो आपल्या या गढीच्या सभोवतीं असणारा हजार पांचशें उंबरठा आहे, तो आपल्याच इनाम जमिनींतून राबून, काबाडकष्ट करून जगतो आहे व आपल्यालाही सुस्थितींत ठेवतो आहे हें खरें ना?—"

"हजार कां, चांगला बाराशें उंबरठा आहे आमच्या गांवाचा!" असें म्हणून मजकडे वळून राजाभाऊंनीं मला विचारलें, "होय ना रे अण्या?"

असेल अशा अर्थी मी नुसतीच मान डोलविली.

"अस्तु! मी तेंच म्हणतों. जो हा तुमचा गांव असं तुम्ही म्हणतां, त्या गांवाच्या सुखसोयीकरितां, कल्याणाकरितां, उन्नतीकरितां, शिक्षणाकरितां किती तरी गोष्टी तुम्हांला या गढीवर करतां येतील असं मला वाटतें—"

"आपल्या इनाम जमिनी उत्तम दर्जाच्या असतील?" पहिल्या पाहुण्यानें मध्येंच विचारलें.

"अर्थात्!" राजाभाऊंनीं लगेच ठांसून उत्तर दिलें. आपल्या जमिनींचा कोणाला अभिमान असणार नाहीं?

"बरं मग?" मीं पाहुण्यांना उगाच खोंचून विचारलें.

"आपल्या सर्व जमिनी कसल्या जात असतील? सर्व जमिनी लागवडींत येत असतील?" दुसऱ्या पाहुण्यांनीं आणखी विचारलें.

"छेः! सगळ्यांची कुठली लागवड होणार? सध्यांचा कालमान कसा आहे माहीत नाहीं का तुम्हांला?" मीं उत्तर दिलें.

"कां बरं? सर्व जमिनी कां कसल्या जात नाहींत?"

"अहो, आतां पहिले दिवस राहिले नाहींत! अलिकडे मुंबई बोकाळली आहे ना? शेतकऱ्याचा मुलगा गुढघ्याएवढा झाला कीं उठतो आणि मुंबईची वाट धरतो ना? जमिनी पुष्कळ आहेत, चांगल्या आहेत पण त्या कसायला माणूस जाग्यावर मिळतं कुठें? म्हणूनच म्हटलं काल-

मान आहे हा!" पाहुण्यांच्या बोलण्याचा रोख ओळखून त्यांना निरुत्तर करण्याकरितां मी जोरानें बोललों. माझें जोराचें बोलणें राजाभाऊंना आवडलें. त्यांचा हात माझ्या पाठीवर होता तो त्यांनीं सम्मतीदर्शक तसाच दाबला त्यावरूनच मी तें ओळखलें.

" हल्लींचें इनामी उत्पन्न काय आहे म्हणालांत राजाभाऊ? पंधरा हजारांचें नाहीं?" पहिला पाहुणा पुढेंही विचारायला धजलाच.

" आमचं उत्पन्न पंधरा हजारांचें–हो–पण नक्की आमच्या दादांना माहिती आहे. हिशेब ते पाहतात ना?" श्रीमंतांनीं आपलें अज्ञान लपविण्याचा वृथा प्रयत्न केला. मला राजाभाऊंच्या या कृतीचें हसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं.

" मला वाटतं आपल्या गांवांतून पोटासाठीं लोक जर बाहेर गेले नाहींत—त्यांनीं आपल्या सर्व जमिनी जर लागवडीला आणल्या तर कालमानानुसार किमान दहापांच हजारांनीं उत्पन्न वाढल्याखेरीज राहणार नाहीं!" आतां दुसऱ्या पाहुण्यांना बोलावेंसें वाटलें.

" यांत काय शंका आहे!" मी म्हटलें. " तसं राजाभाऊंचें उत्पन्न म्हणजे सोन्याची खाण आहे खाण! आहांत कुठं तुम्हीं?"

" पण मग असं असून लोक शेती सोडून कां जातात? सोन्याच्या खाणीचा भरपूर उपयोग कां होत नाहीं?"

" तुम्ही म्हणतां हें खरं आहे पाहुणे!" राजाभाऊसाहेबांना जसं कांहीं मनापासून तें म्हणणें पटलें! " असं होतं खरं. पण कां होतं हें मात्र कळत नाहीं. आमच दादासाहेबसुद्धां नेहमीं असंच म्हणतात. शेतीचं उत्पन्न वाढविण्याचे प्रयत्न दादासाहेब आज पुष्कळ वर्षे करीत आहेत पण अजून त्यांच्या प्रयत्नाला यश येत नाहीं!"

राजाभाऊ बोलले. पाहुण्यांनीं ऐकलें. त्यावर ते कांहीं बोलले नाहींत. नुसते हंसले मात्र! मला त्या हंसण्याचा अर्थ कळला नाहीं. मी तिकडे दुर्लक्षच केलें.

थोडा वेळ तसाच गेला. आम्हीं बुरुजावरून चालूं लागलों. " आतां आणखी या गढींत काय काय पाहण्यासारखें आहे" मजकडे वळून एका पाहुण्यांनीं पृच्छा केली.

" अण्णा, यांना जखणीची विहीर आहे ती दाखवूं या ना रे?"

" जखिणीची विहीर? म्हणजे काय?" दुसऱ्या पाहुण्यांनीं मोठ्या आश्चर्यानें विचारलें.

" त्या दक्षिणेच्या बाजूला एक मोठी विहीर आहे. खूप खोल आहे—बारा बाजल्याचं सुंभ सोडलं तरी पाण्याचा ठाव लागत नाहीं! तिच्या तळाशीं पूर्वजांनीं पुष्कळ संपत्ती टाकली आहे म्हणतात. तरवारी, बंदुका देखील स्वराज्य गेलं तेव्हां त्या विहीरींत टाकल्या आहेत असं सांगतात. विहीर फार भीतिदायक आहे. आमचे राजाभाऊ केव्हां केव्हां त्यांत छातीठोकपणानें पोहायला जातात. मालक आहेत ते—त्यांना काहीं बाधा होत नाहीं. पण इतर कोणाची जाण्याची प्राज्ञा नाहीं. त्या विहिरींत पूर्वीं कोणा बाईनं जीव दिला असून ती जखीण होऊन राहिली आहे.! ती कोणाला तिकडे फिरकूंच देत नाहीं. वेळीं अवेळीं जायची सोयच नाहीं." विहीरीकडे जातां जातां पाहुण्यांना मी विहीरीची दंतकथा सांगितली.

" तसाच तो पिंपळ आहे ना?—" माझी दंतकथा सांगून होतांच राजाभाऊंनीं दुसरी दंतकथा सांगायला सुरुवात केली " त्यावर एक मुंजा आहे. तोही तसाच जहाल आहे. भलत्या वेळीं तिकडे जायचं कुणीं धाडस केलं कीं वळलीच त्याची गठडी! मी मात्र जातों वाटेल तेव्हां तिकडे! मला कांहीं करीतही नाहीं आणि मला भीतिही वाटत नाहीं!"

पाहुण्यांनीं विहीर पाहिली. पिंपळाकडेही दृष्टि टाकली. माझ्या किंवा राजाभाऊंच्या दंतकथांतील भयंकरपणा त्यांना कितपत पटला, हें कांहीं अजमावतां आलें नाहीं. त्यांनीं ते प्रकार ऐकण्याची विशेष उत्सुकताही दाखविली नाहीं. तशी ती दाखविली असती, तर राजाभाऊंच्याजवळ आणि माझ्याजवळ तसला सांठा फार होता. चार दोन तास तरी तसल्या गोष्टींनीं आम्हीं पाहुण्यांना गुंगविलें असतें. पण आम्हांला माहिती होत्या त्या गोष्टी विचारावयाच्याच नाहींत असा जणं काय पाहुण्यांनीं निश्चय केला होता! मग आम्हीं तरी काय करणार?

गढींतील आम्हांला दाखविण्यासारखीं ठिकाणं वाटत होतीं तीं आम्हीं दाखविलीं. बराच वेळ झाला होता. पाहुण्यांचीं अजून स्नानं वगैरे व्हायचीं होतीं. गढी बहुतेक पाहून झालीच. आतां दाखविण्यासारखं कांहीं

राहिलंच नाहीं ' असें सांगून परत जाण्याची सूचना मलाच मंडळींना करावी लागली.

आम्हीं परत फिरलों. पाहुण्यांचें आवेशाचें बोलणें संपलें म्हणून आम्हांला हायसं वाटलं. पण पाहुण्यांच्या चेहऱ्यावर त्यांच्या त्या बोलण्याचा, विकाराचा, आवेशाचा परिणाम अजून दृग्गोचर होत होताच ! मध्येंच आम्हीं थोडें पुढें आणि पाहुणे जरा मागें राहिले त्यावेळीं गंभीरपणानें ते दोघेच आपापसांत काहीं तरी कुजबुजत होते! गढीविषयीं आणि राजाभाऊंविषयींच ते बोलत असणार दुसरें काय ?

गढीच्या पहिल्या दरवाजाच्या बाहेरचेंच मोडकळीला आलेलें रामाचें देऊळ आम्हीं न दाखवितांच पाहुण्यांनीं पाहिलें. देवळाची अशी स्थिति कां ? देऊळ कुणाचें आहे ? असें विचारतांच, " इनामदारांचेंच आहे. तें पूर्वी चांगल्या स्थितींत होतें. परवांपर्यंत तिथें कथा, कीर्तनें, पुराणं होत असत, उत्सव होत असे, ब्राह्मणभोजनही होत असतं, तो सर्व खर्च इनामदारांचाच असे. हलके हलके सारें बंद झालं ते झालंच ! खर्च झेपेना ? शिवाय नसतं देवाचं स्तोम कशाला पाहिजे? भोजन घालून ऐदी ब्राह्मण फुकट कशाला पाहिजेत म्हणून दादासाहेबांनीं आपल्या कारकीर्दीत राजाभाऊंच्या कल्याणाकरितां म्हणून तें खातेंच अजिबात कमी करून टाकलें." अशी माहिती मोठ्या प्रौढीनें राजाभाऊंच्या तर्फेनें मींच पाहुण्यांना करून दिली !

नव्या काळांत जुन्या देवळांना आणि धर्माला विचारतो कोण ? आणि फुकट खर्च करतो कोण ?

तेथून आम्हीं गढीच्या दुसऱ्या दरवाजांत आलों. त्या दरवाजांत नगारखान्यासारखा वर भाग होता, तिकडे पाहुण्यांची सहज दृष्टी गेली. ' हे मोठमोठाले, तांबड्या, हिरव्या, निळ्या कागदांनीं मढविलेले बेगडेनें नटविलेले, कांबीचे चौकोनी चबुतरे कसले ? ते असे फाटके तुटके कां ! काय आहे हें ? ' असें विचारण्याचा मोह एका पाहुण्यांना आवरला नाहीं. त्यानें विचारलेंच. मी बोलणार तों राजाभाऊच त्याबद्दल बोलले " हे ना ? हे आपले मोहरमांतले ताबूत ! आमचा ताबूत असतो. मोहरमांत आमच्या ताबूताचा पहिला मान असतो. खूप उंच करितों आम्हीं !

सभोंवतालच्या पांचपन्नास गांवांत आमच्या ताबूताइतका उंच ताबूत कुठेंच नसतो. दर मोहरमांत आम्हांला त्याकरितां बराच खर्च करावा लागतो. आहे पहिल्यापासून तें चाललं आहे, चालविलं आहे आम्हीं. शिवाय मला त्याची स्वत:ला हौस आहे. गंमत असते त्यांत! मोहरमांत आमचा ताबूत पहायला आसपासच्या खेड्यांतून किती माणसं जमतात म्हणतां? काय गर्दी होते—त्याकरितां आम्हांला तें करावें लागतें!—"

राजाभाऊंनीं आपल्या उंच ताबूताचं पाहुण्याजवळ यथासांग उंची वर्णन केलें. तोंपर्यंत शेवटच्या दरवाजांतून वाड्यांत आलों. राजाभाऊंच्या तोंडून ताबुताचें वर्णन संपायला, आम्हीं वाड्यांत बैठकींत यायला आणि पाहुण्यांनीं दीर्घ श्वास सोडायला एकच गांठ पडली! त्यांनीं दीर्घ श्वास कां सोडला होता कोण जाणें! मला वाटलें गढी फिरून दमल्यामुळेंच त्यांना श्वास सोडण्याची पाळी आली होती. म्हणून आम्हीं त्याबद्दल 'कां? फिरून इतके दमलांत?' यापेक्षां अधिक चौकशीच केली नाहीं!

बैठकींत आमची गडबड ऐकतांच बाळक्या बाहेर आला. त्याला पाहुण्यांना आंघोळीला पाणी काढण्याबद्दल फर्मान सोडलें. कपडे काढीत असतां पहिले पाहुणे म्हणाले—

"खरेंच गढी पाहून झाल्यावरही वाटतंच आहे, या विषयींची ऐतिहासिक माहिती कळायला पाहिजे होती म्हणून—"

"आपण इतिहाससंशोधक आहांत का? आपल्याला या गढींत कांहीं तसं संशोधनात्मक कार्य करतां येईल अशी आपली कल्पना झाली आहे का?" केवळ टवाळीच्या हेतूनें व स्वरानें मी उलट विचारलें.

"छे: छे! तसं कांहीं नाहीं! पण आपलं—"

"मग काय? या गढीवर आणि तिच्यावर एकादी सुरस स्वकपोलकल्पित भावनाप्रधान कादंबरी लिहावयाची आहे वाटतं?" पुन्हां मीं चेष्टाच केली. माझ्या चेष्टेचा प्रकार राजाभाऊंच्या मात्र ध्यानांत आला नाहीं. आपल्या गढीवर आणि कादंबरी लिहिली जाणार एवढी कल्पना त्यांच्या डोक्यांत शिरली मात्र, लगेच ते समोर आले आणि म्हणाले, "काय हो पाहुणे तुम्ही कादंबरी सुद्धां लिहूं शकतां? वर्तमानपत्रबित्र काढतां कीं काय एकादं? आमच्या गढीवर एकादी कादंबरी लिहावयाची असेल तर

खुशाल लिहा. जुने कागदपत्र मी आपल्याला आमच्या दादासाहेबांच्या-कडून मुद्दाम देववीन! आमच्या इथंच रहा. कागदपत्र वाचा. दादा-साहेब दाखवतील ते. सारे कागदपत्र दादासाहेब फार व्यवस्थित ठेवीत असतात! कसं काय लिहितां तुम्ही कोण जाणे! आपल्याला त्याची कांहीं कल्पनाच येत नाहीं! नाहीं रे अण्णा? काय हो पाहुणे, आमच्या गढीच्या जुन्या इतिहासावर तुम्हीं कादंबरी लिहिणार का?—"

पाहुण्यांनीं माझी चेष्टा लक्षांत घेतली नाहीं पण राजाभाऊंच्या बोल-ण्याचा उपयोग मात्र गंभीरपणानें करून घेतला. पहिले पाहुणे म्हणाले, "राजाभाऊसाहेब, तुमच्या गढीच्या पूर्व इतिहासावर आणि तुमच्या पूर्वजावर तर कादंबरी लिहितां येईलच पण जर तुमच्या गढीचें स्वरूप तुम्हीं बदललें, गढीची साफसफाई केलीत, तुमच्या शेतकरी लोकांच्या मुलां-करितां इथं शाळा काढल्यात, आरोग्याकरितां औषधोपचाराची व्यवस्था केलीत, व्यायामाकरितां तजवीज केलीत, तुमच्या शेतकऱ्यांच्या प्रत्येक सोयी इथं तयार ठेवल्यात—बाहेर पोटाकरितां जाणारा शेतकरी, तुम्हीं हरतऱ्हेनें इथेंच गुंतवून ठेवलात—त्याचीं सुखदुःखं पाहिलींत—त्याच्या नडी ओळखल्यात, त्याच्या कर्जाची सोय केलीत—त्याला उत्साह दिलात—त्याचे पाठीराखे झालांत—शेतकऱ्यांना समृद्ध करण्याची तुम्हीं कर्तबगारी केलीत—तर अशा तुमच्या नव्या स्वरूपांतल्या गढीवर आणि गढीला नवं रूप देणाऱ्या तुम्हांवरही नवी कादंबरीही लिहितां येणार नाहीं का? तुम्ही ताजे तरुण आहात—तुमच्या हातीं संपत्ति आहे—शेतींत राबणाऱ्या लोकांचें कल्याण करणें तुमच्या हातीं आहे तें तुम्हीं करा म्हणजे—"

"हो, थांबा!" राजाभाऊंना काय वाटलं कोणास ठाऊक, पाहु ण्यांना त्यांनीं मध्येंच थांबविलें. राजाभाऊंना आज चांगलीच वाचा फुटली होती. पाहुण्यांना थांबवून ते म्हणाले "हें आतां तुम्हीं बोलला कीं नाहीं, असेच अलिकडे मधून मधून आमच्याकडे कांहीं कांहीं प्रचारक म्हणून येतात आणि तुमच्यासारखंच असं पुष्कळसं बडबडतात. आम्हीं आमच्या-कडे त्यांना ठेवून घेतों, जेवायला घालतों आणि त्यांची असली कसली तरी बडबडही वर ऐकून घेतों. पण त्याचा बोध मात्र आम्हांला कांहींच होत नाहीं!"

असें म्हणून माझ्याकडे आणि आपल्या पाहुणेद्वयांकडे पाहून श्रीमंत राजाभाऊ आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें एकदां खूप मोठ्यानें हंसले! त्यांचें हंसणें आमच्या संवयीचें होतें पण अनोळखी माणसांना अशा वेळचें त्यांचें हंसणें उपरोधिक, हेटाळणीचें, कुचेष्टेचें वाटावयाचें व त्याची चांग लीच ओशाळगत व्हावयाची! या वेळचें राजाभाऊंचें हंसणें तशांतलेंच होतें. हंसून राजाभाऊंनीं पाहुण्यांची चांगलीच टर उडविली—त्यांच्या सर्व पांडित्यावर चांगलेंच पाणी ओतलें म्हणून मला जरा आनंदच झाला. पण पाहुण्यांच्या लक्षांत राजाभाऊंच्या हंसण्याचा अर्थ आलाच नाहीं. कारण, मीं पाहिलें त्यावळीं पाहुणे ओशाळलेले किंवा दुसऱ्या एकाद्या-सारखे चिडलेलेही मला दिसले नाहींत.

राजाभाऊंचें हंसू थांबलें. त्यांनीं पाहुण्यांच्या खांद्याला एकदां हलवलें. मलाही एका हातानें जवळ ओढलें आणि म्हटलें " बरं काहो, आणखी एक तुम्हांला गंमत सांगतों—प्रचारक येऊन सांगतात किंवा तुम्हीं आज सांगितलंत तसेंच आमच्या घरीं आमच्या श्रीमंत सौभाग्यवती बाईसाहेब आमच्याजवळ नेहमीं कांहींना कांहीं तरी बडबड करीतच असतात! लोकांना शिकवलं पाहिजे—शेतकऱ्यांना संभाळलें पाहिजे—हें करूं या—तें करूं या—त्या पुणें—साताऱ्याकडच्या आहेत-जरा शिकलेल्या आहेत—आम-च्यापेक्षां जास्त शिकलेल्या आहेत म्हणाना! त्यांची हीच रिकामी कटकट आमच्यामागें असते. आतां बोला आहे कीं नाहीं गंमत! खुद्द आमच्या घरांत सौभाग्यवतीकडून आम्हांला—"

पाहुण्यांचा चेहरा खुलून आला. 'मग?' अशी सुरवातसुद्धां त्यांनीं केली-इतक्यांत 'आंघोळीला पाणी काढलं आहे' असं सांगायला बाळक्या आला. आम्हांला खरपूस भूक लागली होती व पाहुण्यांच्या व्याख्यानाचाही कंटाळा आला होता. बाळक्याला पाहिलें आणि मी घाईच केली. 'हं उठा पाहुणे स्नानाला. आतां जेवणानंतर याच्यापुढें सावकाश बोलूं!' असें म्हणून तो विषय मीं तिथें तितकाच थांबविला.

———

# प्रकरण सातवें

## चांदणीकडे—

पाटावर येऊन बसेपर्यंत पाहुण्यांची पुटपुट हळुहळू तर थोडी मोठ्यानें चाळूंच होती. पण त्यानंतर स्वाभाविक त्यांचा विषय बदलला. पहिला विषय बंद झाला. राजाभाऊंना नसती कटकट हवी होती कधीं? त्यांची ती व्याख्यानबाजी बंद झाल्यानें राजाभाऊंना बरेंच वाटलें असलें पाहिजे. निदान आम्हीं–मी व गोपाळभय्यानें—संकेतानें पाहून 'सुटलों एकदाचे' या अर्थाची मुद्रा केली, त्याला त्याच अर्थाचें राजाभाऊंकडूनही उत्तर आलें त्यावरून सिद्धच झालें !

पाहुणे येतात ते येतात आणि जातां जातां घरमालकालाच कांहीं उपदेशाच्या गोष्टी पाजून जातात. खरें म्हणाल तर पहिल्यापासून असल्या उपऱ्या येणाऱ्या पाहुण्यांची आणि त्यांच्या त्या उपदेशाची मला तर अत्यंत चीड आलेली आहे. यायचे, राजाभाऊंच्याच इथें रहावयाचे, त्यांचेंच जेवाखायचें, त्यांच्याचकडून यथास्थित आदर–सत्कार करून घ्यायचा आणि शेवटीं 'तेरे उप्पर मेरा पाव' या म्हणीप्रमाणें राजाभाऊंवरच आपल्या पघळ उपदेशानें वरचष्मा ठेवण्याची धडपड करायची! येणाऱ्या प्रत्येकाची नजर आपली श्रीमंत इनामदारांच्या संपत्तीवर! एक प्रचारक येतो, राहतो, जेवतो, बडबड करतो, गयावया करतो आणि कसल्या तरी फंडाला, कुठल्या तरी देशकार्याला भरपूर पैशाची मागणी करतो! देणगी द्या म्हणतो-भिक्षा घाला म्हणतो! बक्षीस म्हणून–उत्तेजन म्हणून कांहीं द्या; पण द्या. हा प्रत्येकाचा महामंत्र! कोणी देशाच्या कर्तव्याकरितां तुमचें हें कर्तव्य आहे आणि तुम्हीं तें केलेंच पाहिजे असें सक्तीनें सांगतात, धाकदपटशा दाखवितात! जशी कांहीं इनामदाराची संपत्ति वाटेल त्यानें लुबाडावी अशी सार्वजनिक रस्त्यावरच टाकली आहे. अशा सर्व लोकांपासून राजाभाऊंना सावध करावयाचें, दूर ठेवायचें पहिल्यापासून माझ्याकडेच काम! तें मी आणि गोपाळभय्या अगदीं इमानेंइतबारें बजावीत

असतों. निदान तसा बहाणा तरी करीत असतों. हो, तसें केल्याशिवाय आमचें प्रस्थ टिकाऊ कसें व्हावें ? आमची चैनचमन्, आमच्या हौसा–मौजा कशा चालाव्या ? जे आमच्या आड येण्याचा संभव नाहीं, त्यांच्या वाटेस जाण्याचें, त्यांच्याबद्दल विचार करण्याचें आम्हांला काय कारण? राजाभाऊ आम्हांला मानतात, आमचें ऐकतात, आमच्या छंदानें चालतात यांतलें रहस्य तरी काय ? आम्हीं त्यांना आवडेल असें बोलतों, पचेल असें सांगतों, रुचेल असें वागतों. त्यांचे एकनिष्ठ हितचिंतक काय ते उभ्या जगांत आम्हींच ! असा डांगोरा वेळीं अवेळीं आमचा आम्हींच हस्तें–परहस्तें पिटीत असतों. आपण दूर जायचें नाहीं, दुसऱ्याला जवळ येऊं द्यायचें नाहीं, भलत्याचा हात शिरकूं द्यायचा नाहीं, हेंच आमचें वागण्याचें धोरण आणि चालण्यांतला हेतु ! दुसरें काय ?

साऱ्या सांगण्यांतलें तथ्य इतकेंच कीं पाहुणे वाटेल तितके बडबडले तरी त्याच्या बोलण्याचा परिणाम–पाहुण्यांना अपेक्षित असलेला परिणाम–आम्हीं–मी व गोपाळभय्यानें मिळून–नाना तऱ्हा करून, आचावचा बोलून, राजाभाऊंच्या मनावर कांहींच न होईल असें केलें व तें नेहमींप्रमाणें आमचें करणें यशस्वीही झालें.

जेवायला बसल्यावरच पाहुण्यांचा विषय कृष्णार्पण झाला होता. जेऊन उठून आम्हीं बैठकींत आल्यावर त्या विषयाला चांगलीच मूठमाती मिळाली होती ! जेवणानंतर लगेच पाहुणे जाण्याच्या तयारीला लागणार होते. त्याकरितां आज जेवणाची तयारी लवकर व्हावी असें फर्मान जारीही झालें होतें. पण कांहीं झालें तरी इनामदारांच्या घरचें जेवण तें ! कसें आणि कां असेना ? अगदीं दररोजचें जरी असलें तरी तें काय लवकर होणार आहे ? लवकर झालें तर इनामदारांच्या घरचें जेवण तें कसलें ? पाहुण्यांच्या पोटांत दोन घास पडायला उशीर झाला. बोलण्याच्या भरांत व इनामदारांच्या नित्याच्या चालींत उशीर झाला; त्याला कोणाचाच इलाज नव्हता ! त्यांतून अवेळीं जेवण झाल्यानें पाहुणे नळंगले. त्यांनीं पानतंबाखू करतांनाच बैठकीवर पाय पसरले–उशाला तक्के ओढले व ते जांभया देऊं लागले. त्यांच्या अंगाला आळोखेपिळोखे पडूं लागले–राजाभाऊंनीं नेहमींच्या वहिवाटीस अनुसरून वामकुक्षीकरितां बाजूच्याच बैठकीवर अंग

टाकलें. दादासाहेबांनींही आपल्या कचेरींतील बैठकीवर आपली आवडती पांढरी घोंगडी पसरून जेवणानंतरची सुरसुरी घालविण्याची तयारी केली. तोटकी विडी आणि काड्याची पेटी बेतानें हातांत घेऊन समारंभानें, युक्तीनें, धीमेपणानें विडीपानाचा समारंभ त्यांनीं उरकला—त्यांनीं श्रीमंतीचा हक्क उपभोगायला आरंभ केला.

आम्हीं—मी व गोपाळभय्या—एकादा पत्त्याचा डाव टाकावा किंवा नवीनच आणविलेल्या कॅरम बोर्डवर बसावें म्हणून विचार करीत होतों. पाहुणे आमच्यांत सामील झाले असते तर आम्हीं नेटानें खेळायला बसलोंही असतों. परंतु कोणाकडूनच आम्हांला प्रोत्साहन किंवा साथ न मिळाल्यानें आम्हांला खेळाचा बेत रद्द करून इतरांप्रमाणें आळसटपणानें जागच्या जागींच लोळावें लागलें.

'जसें आजवर अनेक देशभक्तांना, प्रचारकांना परत लावलें, कोणाची राजाभाऊंकडे डाळ शिजूं दिली नाहीं, तशीच वासलात पाहुण्यांची लावून, मार्गी लावलें उद्यां म्हणजे मोकळे झालों' असे विचार पडल्या पडल्याच मनांत येऊं लागले होते. ते सहज होईल असेंही वाटत होतें. पण त्याच वेळीं अशाही कल्पना येऊं लागल्या होत्या कीं, 'आपण बाहेरचा बंदोबस्त कितीही केला तरी त्याचा उपयोग काय? राजाभाऊंच्या घरातच तसल्या तऱ्हेचें पिल्लूं शिरलें आहे. त्याची धडपड तशीच चालूं आहे. त्याचा बंदोबस्त कसा करितां येणार? राजाभाऊंच्या अर्धांगीला—वहिनीसाहेबांना—हे असले चाळे हवे आहेत—त्या त्यांच्या चाळ्यांचा बीमोड कसा करायचा? राजाभाऊ अजून तसे कांहीं अर्धांगीच्या सर्वस्वी आधीन गेले नाहींत खरें, पण केव्हां जातील याचा नेम कोणीं सांगावा? पाण्याच्या बारीक झिरपणीनें प्रचंड खडकाला देखील कंगोरा पडतो राजाभाऊ आपल्या अर्धांगीच्या ओंजळीनें पाणी पिऊं लागले कीं आम्हांला आमचें चंबूगबाळें घेऊन त्याच क्षणीं वाड्याच्या बाहेर निघावें लागेल. तो त्यांचा प्रभाव चालूं द्यायचा नाहीं, पण तो कसा? तेंच तर अशुद्ध आणि अवघड आहे!' हें असें मनांत येऊन मन खट्टू होण्याच्या बेतांत येत होतें तोंच आम्हांला आमचा पराक्रमही आठवत होता! बहात्तर खोडी घोडें असतें तर त्र्याहात्तर खोडी माणूस असतें! घोड्यावर बसून त्याला कह्यांत ठेवणें

आणि राजाभाऊंसारख्या इनामदाराच्या मैत्रींत राहून त्यांना आपल्या हुकमतींत राखणें सारखेंच! जोंपर्यंत आपल्याला राजाभाऊंच्याच सहवासांत राहवयाचें आहे, तोंपर्यंत आपल्याला तितकं सावध राहिलंच पाहिजे, पडेल तो पराक्रम केलाच पाहिजे, हा बाप, ही बायको, ती आई म्हणून आपल्या आड येईल तर त्यांची गय कशी करतां येईल? आडवें आलें तर तें कापून काढलेंच पाहिजे! या न्यायानें आम्ही वागत आहोंतच. बिचारे दादासाहेब गुरगुरतात—डोळे फिरवतात—वसकन् ओरडण्याचा आविर्भाव करतात—पण तें दुरूनच! जवळून नाहीं. ते असले तरी त्यांचे दांत पाडल्यासारखेच आहेत. शिवाय त्यांना आपल्या दुसऱ्या मुलांचें कल्याण राजाभाऊंच्याच इस्टेटींतून करावयाचें असल्यामुळें, त्यांनाही तितकें जपून वागावें लागतें. ते समजून वागतातच. जशी आम्हांला त्यांची भीति वाटते तशी आमची त्यांना—आम्हीं राजाभाऊंचे स्नेही असल्यामुळें आणि राजाभाऊंना कानमंत्र देऊन केव्हां बिथरवूं याचा त्यांना नेम लागत नसल्यामुळें—भीति आहेच. थोरल्या इनामदार बाईसाहेबांच्या बाबतींत कसलीच भीति राहिली नाहीं. दादासाहेबांनीं आणि त्याहीपेक्षां राजाभाऊंनीं अलिकडे त्यांना अजीबातच सांधींत टाकून दिलें आहे. एखाद्या लुच्चा कोल्ह्याच्या चालीनें आणि नजरेनें, बाबूराव—राजाभाऊंचा सख्खा भाऊ—येतो, न्याहाळतो, टेहळतो—शेपटी आपटण्याचा आव आणतो पण त्याची अजून तरी आम्ही मात्रा चालूं दिलेली नाहीं. तो आपल्याबरोबर आजच्या मनोहरासारख्या कच्चा दिलाचीं पोरसवदा पोरं कांहीं हेतूनें आणतो, पण आम्हीं त्यांना हातावर पाणी पडण्याइतका वेळही थांबूं देत नाहीं. इतका पराक्रम आज आमच्यांत जागता आहेच! इतकं झालं तरी वहिनीसाहेबांची दहशत वाटल्याशिवाय कांहीं रहात नाहीं. त्यांची बाधा आपल्याला होऊं नये म्हणून बाळक्याला पकडला आहे. तो आहे म्हणून येसू आहे. येसू आतांशा वहिनीसाहेबांना चेपूं शकते—तिच्याबद्दल त्यांना अस्वस्थता तरी वाटूं लागलीच आहे; रानहरणीचा वेध, येसूचं नांदणं नाहींच अखेरपर्यंत लागलं तर, नुकताच राजाभाऊंच्या मनाला लावून ठेवला आहे—मी माझ्याकडून राजाभाऊंच्या सभोंवतीं अनेक मोहाचीं, सुखाचीं, ऐषआरामाचीं जाळीं अगदीं नाजुकसाजूक पसरून ठेविलीं

आहेत! प्रत्येकाची चटक त्यांच्या जीवाला लावून ठेविली आहे. प्रत्येक जातीच्या सुखाचं मधाचं बोट अर्धवट अर्धवट असं चाखवलं आहे आणि त्यांतच गुंतविलं आहे तें का उगीच? राजाभाऊ जोंपर्यंत आपण पसरलेल्या जाळयांतून निसटले नाहींत. त्यांना निसटतां आलें नाहीं, निसटण्याची त्यांना इच्छा झाली नाहीं, तोंपर्यंत आपले! निसटले कीं मग निसटले. मग आपले नव्हेत! वहिनीसाहेबाच्या लक्षांत अजून हें आल असेल किंवा नसेल, लक्षांत आलें असलें तरी त्याकरितां त्या उद्योगाला अजून लागल्या असतील किंवा नसतील. लागल्या नसल्या तर हरकत नाहीं पण लागल्या असल्या तर मात्र पंचाईत! पंचाईत झाली तरी आपल्याला सावध राहूनच त्याच्यांतून मार्ग काढला पाहिजे! त्यांचा प्रयत्न यशस्वी झाला कीं आमच्या पोटाची–सुखाची–चैनीची इतिश्री झालीच! आपल्या स्वार्थावर उघड्या डोळयांनीं कोण गदा आणूं देणार? कितीही अशुद्ध आणि अवघड असो, वहिनीसाहेबांच्या भलत्या लुडबुडीला यश येऊं देतांच कामा नये–त्यांच्या प्रयत्नांच्या आड आणायला आपल्या हातीं येसू आहे, हरिणी आहे, साऱ्या हिंदुस्थानाचा चैनीकरितां प्रवास आहे. पुण्यामुंबईकडील घोड्याच्या शर्यतीचें सुख आहे. काश्मीरच्या नंदनवनांत,कारवारच्या सौंदर्यांत,गोव्याच्या गाणारणींत राजाभाऊंना हिंडवायचं आहे! तिकडचीं सुखें त्यांच्या मागें लावायचीं आहेत, मग राजाभाऊ आमच्यांतून जातील कुठें? त्यांची काय छाती आहे? सध्यां गोव्याच्या एका गाणाऱ्या चांदणीनेंच, आपल्या गाण्यानें, नाचण्यानें, हावभावांनीं, अभिनयानें, डोळयाच्या नाचानें राजाभाऊंना अर्धामेला करून टाकलें आहे! चांदणी माझ्या हातांतलं जहरी शस्त्र आहे! तें माझ्या हातीं आहे आणि त्याचा प्रभाव राजाभाऊंवर चालत आहे तोंवर आपल्याला कशाची कुणाची भीति आहे? चांदणी–चांदणी—"

"अण्णा–अण्ण्या–लेका–ऊठ! कसा जनावरासारखा लोळतो आहेस? कसा अजगरासारखा पसरला आहेस? ऊठ! तब्बल तीन तास झाले कीं तुझा मुडदा होऊन! ऊठ–ऊठ–नाहीं तर पेकटांत लाथ बसलीच! बघ–ऊठ लेका–अण्ण्या–ए अण्ण्या, गाढवा—"

माझ्या स्वप्नाचा भंग झाला. राजाभाऊंनीं जवळ येऊन उठवून, हलवून, धक्के मारून, आणि माझ्या कानाच्या कण्यांत खूप जोरानें ओरडून मला

उठविलें. स्वप्न संपलें. मी जागा झालों. डोळे चोळीत चोहोंकडे पाहिलें. खरेंच सर्व मंडळी लोळून घोळून उठली होती. सर्वांच्या पुढें बाळक्यानें मधल्या वेळचा म्हणून चहा आणून ठेवला होता. तिकडे दादासाहेबांनीं प्यायला सुरुवातही केली होती. माझ्याकरितां पाहुणे मंडळी राजाभाऊं-सुद्धां खोळंबली होती आणि चहाकरतांच राजाभाऊंनीं आस्थेनें मला उठविलें. मी चूळ भरली. चहाचा कप हातीं घेतला. सर्वांसह चहापानाला सुरुवात झाली. मंडळींत गोपाळभय्या मला दिसला नाहीं. दुपारीं पडल्यापडल्या झोंप लागते काय ? आणि जागेपणीं चाललेल्या विषयांना स्वप्नाचें स्वरूप येतें काय याच विचारात मी गुंग होतों. आता तें सर्वच विसरल्यासारखें झालें होतें. पण चांदणीची आठवण अजून होती. चांदणीच्या विचारांत असतांना मला राजाभाऊंनीं उठविलें. चहा पितां पितांच राजाभाऊ म्हणाले " अण्या, पाहुणे आज राहिले आहेत!—"

" हं! " असा मी नुसताच हुंकार भरला.

"तूं लवकर उठला नाहींस मग काय करणार! मीच गोपाळभय्याला धाडला तिकडे व्यवस्था करायला!" राजाभाऊंनीं माहिती दिली. आतां माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. मी त्या संबंधांत आणखी विचारणार तों बाहेर गेलेला गोपाळभय्या परत आला. माझी व राजाभाऊंची त्याच्याकडे एकदमच प्रश्नार्थक नजर वळली. त्यांनीं खुणेनें एका बाजूस बोलावतांच मी उठून त्याला बाजूला घेऊन गेलों.

" हं काय?—"

" चांदणी म्हणाली कीं दुपारीं एक सांगितलं आणि आतां एक. तेव्हां मी काय करावं, हें मला नीट समजेना—" गोपाळभय्या सांगूं लागला.

" नीट काय तें सांग– असा गोंधळूं नकोस! "

" चांदणीच्या घरीं पाहुण्यांना जेवाखायलासुद्धां घेऊन जायचं आहे. तशी तिला तयारी करायला कळविण्याकरितां मी गेलों होतों—"

" बरं मग—"

" आणि सकाळीं ठरलं होतं कीं रात्रीं नुसतं गाणंच करायचं!" गोपाळभय्यानें सांगितलें. "तेव्हां ती म्हणाली, खायचीप्यायची व्यवस्था करायची असेल तर तसं लवकर करायला पाहिजे. त्याची व्यवस्था झाली पाहिजे.

त्याच्या खर्चाला पाहिजे. त्याकरितां अण्णासाहेबांना घेऊन या म्हणजे सगळं होईल. म्हणून तसाच परत आलों. उशीर झाला तर स्वयंपाक केव्हां व्हायचा, जेवणं केव्हां करायची, मग बैठकीला किती उशीर होईल ? त्याची तयारी झाली पाहिजे. तेव्हां म्हणतों, तुम्हींच चांदणीकडे चला आणि काय तें ठरवा."

मी लगेच राजाभाऊंना खूण केली. राजाभाऊ ताबडतोब उठून जवळ आले. मी त्यांच्या खांद्यावर हात ठेवून आणि पाहुण्याकडे पहात म्हटलें "राजाभाऊ, आपल्याला कल्पना आवडली. चादणीचं नुसतं गाणं ऐकण्यांत काय गमंत आहे ? चांदणीच्या इथं खायचं प्यायचं—ठीक आहे कल्पना—पण राजाभाऊ, पाहुणे त्यांतले आहेत का, याची चौकशी केलीत का अगोदर ? नाहीं तर आपण—तिनं--तयारी करायची आणि शेवटीं फुकट विरस व्हायचा!"

राजाभाऊ 'मी विचारतों हं पाहुण्यांना,' असें म्हणून पाहुण्यांकडे गेले. त्यांना त्यांनीं जरा हलकेच—कानाशीं लागून—उत्सुकतेनें, ऐटीनें, हंसत असें स्पष्ट विचारलें. त्यांना त्यांनीं काय उत्तर दिलें हें कांहीं ऐकायला आलें नाहीं पण त्यांच्या चेहऱ्यावर हास्य चमकलें. मला खूण पटली; मी गोपाळभय्याच्या पाठीवर थाप मारीत लगेच त्याला चांदणीकडे पिटाळला. 'चल जा. मी आलोंच म्हणून सांग. पुन्हां परत येऊन, राजाभाऊंच्या बसायच्या खोलींतल्या कपाटांतील वरच्या भागांत मागच्या बाजूला जॉनहेग साहेब आहेत त्यांना घेऊन जा' असें सांगितलें. गोपाळभय्या गेला. मी राजाभाऊंच्या कानांत कांहीं सांगून बाहेर जाण्याकरितां कपडे केले, पाहुण्यांच्याकडे एकदां जरा तुच्छतेनेंच पाहिलें आणि बाहेर जायला म्हणून निघालों.

राजाभाऊ तसे नाहींत असे आहेत असें पाहुण्यांना सक्रिय दाखविण्याचा मोका आला म्हणून मला जरा बरें वाटलें. पण त्यापेक्षां आजच्या सारख्या मजलसीच्या प्रसंगानें राजाभाऊंच्या गळ्याभोंवतीं चांदणीच्या मायावी हाताचा विळखा कायमचा बसवतां येईल या विचारानें मनाला अधिक आनंद झाला होता. असला प्रसंग वांया दवडायचा नाहीं हें तर माझें ठरलेलेंच होतें.

चांदणीचं वेड जितका दीर्घ काळ राजाभाऊंना राहील तितका काळ-पर्यंत वहिनीसाहेबांच्या हातीं राजाभाऊ पूर्णपणें लागत नाहींत, हें सूर्य-प्रकाशाइतकें स्वच्छ होतें !

त्याच सदुद्योगाला मी मोठ्या उत्साहानें निघालों. एका दरवाजाच्या बाहेर आलों. डोक्यांतल्या विचाराबरोबर पायांनींही गती घेतली होती. चांदणीकडे जायचें होतें मग गती कां येणार नाहीं ?

" रामराम, अन्नासाब, रामराम ! " कुणी तरी माझा मार्ग रोधून धरला. मी उभा राहिलों. तों सकाळचे शेतकरी—नारू, जानू, संतू, वाघू आणि म्हातारा जोगू—माझ्या मार्गांत उभे ! मी त्यांच्याकडे पाहिलें. त्यांनीं मला पुन्हां रामराम केला आणि म्हटलें " अन्नासाहेब, वाईच थांबा ! "

" जरा आमचं दोन सबूद ऐकून घ्या "

" आम्हीं सकाळपून हत बसलो या—"

" पर आम्हांस्नी कुनी पुसना बी, इचारीना बी, का ऐकून बी घीना—"

" ह्येस्नी इचारावं तर त्येंच्याकड बोट दावत्यात—त्येना गाठावं तर त्ये हुडत् करून आंगावायलं टाकत्यात्—सकाळपून असं चालया बघा—"

" आम्हीं जेवलों-खाल्लों. आम्हास्नी पोटालाबी मिळालं—"

" पर आम्हीं पोटापायीं कांहीं आलों नाहीं हत—"

मी नुसता उभा राह्यचा अवकाश सगळ्या शेतकऱ्यांनीं मला गराडा घातला आणि माझ्यावर सरबत्ती सुरूं केली. इतक्या कचाटींत गांठल्या-वर त्यांचं म्हणणं मला ऐकावेंच लागलें. मी ज्या अत्यंत महत्त्वाच्या कामा-करितां निघालों होतों, त्याची जाणीव मला होती. तिकडे जाण्याची त्वरा होती पण त्या आडमुठ्या शेतकऱ्यापुढें करणार काय ? बरें 'चला हटा दूर' म्हणून त्यांना धुडकावून पुढें चालूं लागावें तर तेंही शक्य नव्हतें. तशी त्यांची गत राजाभाऊंनीं आणि दादासाहेबांनीं दिवसभर केल्याची बोंब त्या शेतकऱ्यांनीं अगोदरच केली होती. त्यांचें काय तें थोडक्यांत ऐकावें आणि त्यांना झट्दिशीं वाटेला लावतां आलें तर पहावें, जातां जातां फुकटांत मोठेपणा कांहीं न करतां मिळाला तर कां घेऊं नये, असाही विचार आला आणि मी त्यांच्यापैकीं म्हाताऱ्या संजूला विचारलें—

" हं, मग काय म्हणणं तुमचं ? "

" काय म्हूनशान् काय इचारतासा, हज्जार खेकटी हैती—"

" तुमच्या हजार भानगडी ऐकायला मला वेळ नाहीं. महत्त्वाच्या कामाला निघालों आहें मी. थोडक्यांत काय असेल तें सागा—"

" इनामदारांच्या मनातनं आम्हास्नी तारायचं हाय का मारायचंय?"

" धा वर्सं झालीं शेतांतली हीर पडलीया, गाळ झालाया, म्वाट नाहीं."

" सात वर्सं झालीं आडव्या पाटाचं पानी न्हाई. पाऊसकाळचं कमी झालंय् तर आडव्या पाटाला पानी येतं कुठन् ?—"

" बागाईत गेलं. कोरडवाहू झालं—"

" त्ये पर रहावं कसं ? पांच वर्सांत खातमूत न्हायी–जिमनी अक्षी निकसी झाल्याती नव्ह का ? "

" हें सगळं खरं. पण पाऊस कमी झाला तर त्याला इनामदारांनीं काय करावं ? आणि खातमूत नाहीं हें तुम्हीं येऊन काय सांगतां ? तें तुम्हींच घालायला पाहिजे. घातलं नाहीं हा तुमचा चुकारतट्टूपणा आहे–"

" ब्येस ! " माझ्या बोलण्यानें चिडून त्यांतला एक म्हणाला. " शेळी जाते जिवानिशी न् खानारा म्हन्तु वातड !—"

" जिमनी इनामदारांच्या आन् आम्हीं खातमूत घालायचं व्हय् ? "

" आम्हीं राबायचं, आंगमेहनत करायची ती करतुया कीं मरस्तुवर "

"धन्याच्या गोष्टी त्यांनीं कराया होव्यात् ! त्यापायींच आम्हीं वराडतुया !"

" तुम्हीं हें असें अधेमधें कसें सांगतां रे ? ज्या वेळचं त्या वेळीं कां सांगत नाहीं ?" मी मध्येंच म्हणालों.

" भले शाबास ! अन्नासाब ! इनामदारांच दिवांजी वसुलाच्या येळेला जवा येतात तवा आम्हीं त्येंच्या कानावर या संमद्या गोष्टी घातल्या-बिगर रहातु असं का तुमच्या मनीं ? "

" त्येबी हुं हुं म्हून ऐकत्यात ! करूं म्हनत्यात ? इनामदाराच्या कानांवर घालूं म्हून थोर तोंडानं सांगत्यात्. बोकांडी बसून आम्हास्नी भांडीकुंडी इकायला लावून आमच्याकडचा वसूल घेत्यात अन् जात्यात् ! गेलं कीं गेलं मंग आमची कशाला कुणाला आठवन राहतीया ? "

" मंग दिवांजी जे उगवत्यात ते म्होरल्या सालाला–इनामदारांचा वसुलाचा दट्टया आमच्या मागं लावायच्या वक्ती ! "

" तवा बोला आतां, आम्हीं शेतांत नांदावं कसं? जगावं कसं? अन् करावं काय ? "

" बरं!" मी त्यांच्या सांगण्याचा मथितार्थ समजून त्यांचें चऱ्हाट आटोपतं घ्यावं म्हणून म्हटलें. " मी समजलों तुमचं म्हणणं! पण मी तुमच्या बाबतींत काय करावं असं तुमचं म्हणणं आहे! आणि तुम्हीं माझ्याजवळच सांगण्याचं कारण काय ? "

" आजकाल तुमची चलती इनामदारसाबाच्याजवळ है म्हनून! "

" यकदा इनामदारास्नी परतक्ष जिमनी दाखवायापायी आना. "

" औंदा आम्हास्नी पीक काहीं आलं न्हाई, तवा वसूल माफ करावा."

" निदान्‌ची म्होरल्या सालापावत तकुबी तरी द्यावी. "

" हीर काढून घेवी, ताली, पाटवनं दुरुस्त करून द्याव्या, खतामुताची येवस्था बघावी. न्हाईतर आम्हास्नी पोटापायी देशोधडीला तरी लावावं! "

" डुई न् डुई असं चाललया. आतां आम्हीं पोरबाळं मारायला बी तयार न्हाई आन् इनामदारांच्या शेतसाऱ्यापायीं बायकामानसं इकायला बी राजी न्हाई. "

मी ऐकून घेतों असें पाहून त्या अडाण्यानीं जास्तच चऱ्हाट लावलें. मी नंतर त्याना म्हणालों, " ठीक आहे; कांहीं हरकत नाहीं. मला सांगितलंत हें बरं केलंत. आतां आलात तसें रहा. उद्यांबिद्या मी इनामदारांची आणि तुमची शांतपणानं गांठ घालून देतों. माझ्याजवळ जें सांगितलं तेंच तुम्हीं त्यांच्याजवळ एकदां मांडा. मी त्यावेळीं तुमच्या बाजूनें सांगायचं तें सांगेन. मग काय होईल तें पाहूं! "

हे लोक सकाळीं आले त्या वेळीं, त्यांचे ते जमिनीपर्यंत लवून, कपाळाला हात लावून मुजरा करणं, दीनवाणीनं पहाणं, एका पायावर आदरानं उभं राहणं, वगैरे पाहून मला त्यांच्याबद्दल फार बरं वाटलं होतं, त्यांच्याबद्दल आदर वाटला होता, पण हे एवढ्याकरितां आले असतील, त्यांच्या पोटांत असं गाऱ्हाणीं सांगण्याचं आणि या वर्षीचा वसूल बुडविण्याचं विष भरलं असेल हें मला काय माहीत? माझा फुकट वेळ घेतला याबद्दल मला त्यांचा राग आला. राजाभाऊ किंवा दादासाहेब, या लोकांचं रुक्ष चऱ्हाट सुरूं व्हायच्या अगोदरच बंद व्हावं म्हणून का

धुडकावतात यांतलं इंगित आज मला कळलं. पुन्हां आपल्यावर असा प्रसंग येऊं द्यायचा नाहीं असं ठरवून टाकलं आणि 'उद्यां राजाभाऊंना समक्षच भेटवतों' असं कांहीं तरी सांगून त्यांच्यांतून निसटलों. त्यांनीं तें कबूल केलं पण मी चालतां चालतां 'आम्हीं रहातों. दोन दिवस शेता-कडची नुकसानी सोसून आलुयाच, पर भेट तरी होऊं द्या. नाहीं तर तकडची बी नुकसानी न् हाकडची बी नुकसानी असं व्हयील ! दूध बी नाहीं अन् वासरुबी नाहीं. असं करूं नगासा" असं ऐकवलंच !

चांदणीकडील पाहुण्यांच्या खायचीप्यायची आणि बैठकीची व्यवस्था करायची होती. लवकर गेलों नाहीं तर चांदणी रागावेल, राजाभाऊ रागावतील शिवाय आपलंही त्यांत बरंच नुकसान व्हायचा संभव आहे. हें ध्यानात येऊन त्या लोकांना हो हो म्हणत आणि मनांत 'उद्यांची बात उद्यां' असें आणित तेथून चांदणीकडे झटकलोंच !

वाटेंत शेतकऱ्यांच्या गाऱ्हाण्यांपैकीं कांही लक्षांत राहणें शक्यच नव्हतें. पण तिकडे जाण्याची पाळी आली तर तेथें 'हरिणीसारख्या आणखी कांहीं हरिणी आढळण्याचा संभव आहे' असं कांहीं तरी मनांत आल्यावांचून रहात नव्हतें. पण तशा विचारांना महत्व देण्याची ती वेळ होती का ?

---

# प्रकरण आठवें

## ओघ बदलला

चांदणीच्या घरीं रात्रीं काय काय झालें आणि काय काय नाहीं, हें सांगण्याची सोय नाहीं. खाल्लें काय, प्यालों किती, कोण लवकर रंगले, कोणाचा किती वेळांत मुडदा झाला; चांदणीनें गाण्यांत नाचण्यांत बोलण्यांत कसा किती मजा आणला, हें सांगणें फार कठीण ! अहो सांगणार काय ? अगोदरच रात्रीचे सारे प्रकार ध्यानांत ठेवायला भानावर कोण होतं ? आणि त्यांतूनही जें कांहीं ध्यानांत राहिलं तें सर्व काय सांग-ण्यासारखं असणार ? अंधेऱ्या रात्रीं श्रीमंतांच्या बरोबर जें काय कराय-

सवरायचं, त्याबद्दल आपल्याच गळ्यांत हाडूक बांधून हिंडण्यांत हंशील काय! त्यांतून आपल्यापुरतं असतं तर गोष्ट वेगळी. आपल्याबरोबर श्रीमंत इनामदारांचा व त्यांच्याकडे आलेल्या सन्मान्य पाहुण्यांचा संबंध! पण त्याबद्दल बोलायचं कसं?

इतकें खरें कीं चांदणीच्या घरची रात्र बेहद्द अशी सर्वांचीच आनंदांत गेली. पाहुणे अगदीं गारीगार होऊन गेले. आदले दिवशीं दुपारीं त्यांनीं यथास्थित जी व्याख्यानबाजी केली होती त्याबद्दलचें पुरें पुरें प्रायश्चित त्यांनीं रात्रीं राजाभाऊंच्या बरोबर घेऊन टाकलें. दुपारीं केलेल्या नसत्या आगळिकीची खुल्या दिल्यानें बसल्या बैठकींत राजाभाऊंची माफी मागितली. राजाभाऊ भोगत असलेल्या ऐश्वर्याबद्दल, त्यांच्या रसिकपणाबद्दल, चांदणीसारखी 'चांदणी' मिळवून अगदीं आपल्या छोट्याशा गांवांत 'मुंबई' निर्माण केल्याबद्दल, राजाभाऊंची रंगल्या मनानें तोंडभर स्तुति केली! चांदणीनें राजाभाऊंना लाडांत येऊन आणि आणून किती आणि कशा कशा तऱ्हेनें लुबाडलें, त्याला सुमारच नाहीं! मला मात्र चांदणीच्या करवीं जेवढा कार्यभाग करून घ्यावा असं वाटत होतं, तेवढा कार्यभाग मी आठवणीनें करून घ्यावयाला विसरलों नाहीं.

पाहुण्यांच्या पुण्याईनं अवघी रात्र तर गमतींत घालविली. अशा रात्री आमच्या नेमानं जात असें नाहीं. कोणी तशापैकीं आला गेला कीं, मग मजलस हटकून व्हायची. तसे प्रसंग वरचेवर यावेत म्हणून आम्हीं पर्यायानें थोडीफार खटपटही करीत असूं. इतर बाबतींत राजाभाऊंच्या मूळच्या कंजूष वृत्तीला प्रोत्साहन देत असूं तितकेंच असल्या गमतीच्या वेळीं आम्हीं राजाभाऊंना हवे तितके सढळ बनवीत असूं. तोही महापुरुष त्या बाबतींत आमच्या अर्ध्या वचनांत असतो—आहे, म्हणून तर त्याच्या जिवावर आमच्या उड्या! चांदणीसारखं मोहरं राजाभाऊंकरितां मींच मुद्दाम गोव्याची सफर करून मिळवून आणलं होतं तें राजाभाऊंच्या आज्ञेनं आणि खर्चानं! त्याबद्दल वारंवार जसे राजाभाऊ माझी पाठ थोपटीत तसेंच असलें भरभक्कम लुबाडण्यासारखं कूळ मिळवून द्यायला मी कारणीभूत झालों म्हणून चांदणी वरचेवर माझे उपकार मानी. काल रात्रीं हें पाहुण्यांना कळलें तेव्हां त्यांनींही माझी मनसोक्त स्तुति केली. चांदणीच्या

हातचे पेले घेतांना, तिनें तयार केलेले पदार्थ यथास्थित पोटांत लोटतांना, तिच्या गोड गळ्याच्या सुरेल ताना ऐकतांना आणि कौशल्यानें ती नाचतांना सारी रात्र स्वर्गसौख्यांत साऱ्यांचीच गेली असल्यास नवल काय ?

पहांटे पांच वाजेपर्यंत असाच कार्यक्रम चालला होता. रात्रीं चांदणीच्या घरीं जातांना पाहुण्यांनीं 'आपण पहांटे जाणारच' असें निक्षून सांगितलें होतें व आम्हींही तशी सोय खात्रीनें होईल असें आश्वासन दिलें होतें. नव्हे तशी व्यवस्थाही करून टाकली होती. राजाभाऊंनीं आपल्या मोटारड्रायव्हरला पांच वाजतां हजर रहावयाला बजावलें होतें. त्याप्रमाणें बरोबर पांच वाजतां चांदणीच्या दारांत मोटारीचा पोंगा वाजला. म्हणूनच आम्हांला पांच वाजल्याचें कळलें. पाहुण्यांना जाण्याची ओढ असल्यामुळें त्यांचें तिकडे विशेष लक्ष गेलें. ते धडपडून उठले. कपडे चढविले. निघण्याची तयारी केली, बाकी सर्वजण पेंगूळलेच होते. चांदणी थकून भागून आंत गेली. राजाभाऊंचा लोळागोळाच झाला होता. त्याना हांक मारण्याचें कारण नव्हतें, तें इष्ट नव्हतें; आणि हांक मारली तरी त्याचा उपयोगही नव्हता. म्हणून पाहुणे त्यांना हांक मारण्याच्या भानगडींत पडले नाहींत. "अण्णासाहेब, आम्हीं आपला घेतों निरोप. शक्य तर आमच्या बरोबर तुम्हांला स्टेशनपर्यंत पोंचवायला या म्हणून—" असें ते म्हणाण्याचाच अवकाश. मी त्यांच्याबरोबर येतोंच म्हटलें आणि सज्ज झालों. गोपाळभय्या वांकडातिकडा व्हायच्या बेताला आलाच होता, पण त्याला उठवलें. राजाभाऊंना वेळेच्या आंत व्यवस्थितपणानें घरीं घेऊन जाण्यासंबंधानें बजावून सांगितलें. दादासाहेब किंवा आईसाहेब यांच्या दृष्टीस पडण्याच्या अगोदर राजाभाऊंना आपल्या जागेंत सुखरूपपणानें पोंचविण्याची जबाबदारी माझ्यावर नाहीं तर गोपाळभय्यावरच असायची ! आणि राजाभाऊंचाही आम्हां दोघांवरच काय तो भरंवसा. आज मात्र गोपाळभय्याच्याच अंगावर ही जोखीम टाकावी असें—कां कोण जाणे—पण मला वाटलें. मीं टाकलीही आणि पाहुण्यांना पोंचविण्याकरितां त्यांच्याबरोबर मोटारींतून निघालों.

परत आलों त्यावेळीं बारा वाजून गेले होते. वाड्यांत शिरतांना मनाची धाकधूकच होत होती. राजाभाऊ कशा स्थितींत वाड्यांत परत

आले, दादासाहेबांच्या किंवा आईसाहेबांच्या नजरेंत तर आले नाहीं ना? कोणी आपल्याकडे त्या नजरेनें पहात तर नाहीं ना! इत्यादि प्रश्न मनांत येऊन जात आहेत, माझें पाऊल दरवाजाच्या आंत पडत आहे तोंच काल-पासून धरणं धरून बसलेले शेतकरी 'अन्नासाब, रामराम' करीत पुढें झाले. निराळ्याच नादांत असल्यामुळें शेतकऱ्यांना एकदम पहातांच मी गडबडलों. 'अरे, हो–तुम्हीं ते नाहीं का? तुमच्याबद्दल–करतों हं व्यवस्था–' असें मी त्यांना सांगण्याचा प्रयत्न करीत आहें तर त्यावर तेच म्हणाले, "कसली राव व्यवस्था करतायन ते? सकाळ उठून बघतुया तर समाजलं कीं इनामदारसाब दुखणकरी झाल्याती! बाहीर यायचं न्हाईत आन् कुनास्नी भेटायचं बी न्हायती!"

"बघा आतां! है का न्हाई जलूम? गेलं का आमचं तीन रोज वाय-फाळच हाकडं तकडं!"

राजाभाऊ आजारी हें ऐकून मी तर चमकलोंच. "बरं तर. मग काय करतां? जा तुम्ही आतां. सवडीनं सांगेन मी इनामदारांना आणि तुमच्याकडे शेतवाडीवर घेऊनही येईन त्यांना–" असें कसें बसें सांगून एकठोक राजाभाऊंच्याकडेच निघालों.

त्यांच्या निजायच्या जागेचें दार बंद होतें. दादासाहेब आपल्या कचे-रींत हाताखालच्या कारकुनाला कांहीं जमाखर्च सांगत बसले होते. दुसरें कोणीच दिसलें नाहीं. दादासाहेबांच्या चेहऱ्यावर तसा कुठला विकार मला दिसला नाहीं, ते कामांतच व्यग्र दिसले. बाकीचीं माणसें आपापल्या कामांत मग्न होतींच. बाहेर कळलेल्या बाबतींत तितकेसें तथ्य नसावें असें स्पष्ट दिसलें. नाहीं तर पांच सहा तासांच्या अवधींत राजाभाऊंना एकदम असें आजारी व्हायला झालें काय?

खोलीच्या बाहेर थोडा थबकून उभा राहिलों. दार उघडून एकदम आंत जावें कीं नाहीं अशी शंका आली. कानोसा घेतला. खरेंच आंत कोणी तरी त्यांच्याशीं बोलत असल्याचें ऐकायला आलें? राजाभाऊंशीं त्यांच्या खोलींत जाऊन दार लावून असें त्यांच्या आईसाहेबांशिवाय कवा वहिनी साहेबांशिवाय कोण बोलत असणार? आणखी थोडें लक्ष दिलें. वहिनीसाहेबांचाच आवाज ऐकला. मग मात्र दार उघडण्याचें

धाडस केलें नाहीं. आज तरी धाडस करवेना. एरव्हीं अनेकदां मी आंत बेधडक गेलों होतों–नेहमीं जातही असे पण आज जाववेना. आंतील पतीपत्नींचा संवाद ऐकण्याची बुद्धि होऊं लागली. त्यांच्यांत आपलें नांव निघतें आहे काय? वाईट म्हणूनच निघतें काय? वहिनीसाहेबांच्या तोंडून शिव्याशाप तर ऐकायला येणार नाहींत? अशी कल्पना येऊन बाहेरून ऐकायची बुद्धि झाली व बाहेरच तसा मी अधांत्री तरंगत उभा राहिलों.

" मग ऐकायचं ना माझं?—"

" ऐकायचं! ऐकायचं! ऐकायचं! कितीदां सांगूं माणिक तुला हें?"

" तसं नव्हे! मला अजून खरं नाहीं वाटत! माझ्या गळ्याची एकदां शपथ घ्यायची होती!"

" ती काय म्हणून?"

" असं म्हणायचं झाल्यावर बोलायचं काय माणसानं? इतक्यांत विसरायचं झाल्यावर, मग ऐकेन ऐकेन ऐकेन म्हटलं तें कशाबद्दल?"

" माणिक, तूं तर मला वकिलीच्या पेचांतच पकडायला लागलीस! तुम्हां शिकलेल्या बायकांशीं बोलायचं म्हणजे एक हेंच आहे—"

" असं म्हटलं म्हणजे बोलणं संपेल अशी समजूत आहे वाटतं?"

" पण हा काय तुझा जुलूम माणिक? आम्ही जेव्हां तेव्हां तुझंच म्हणणं ऐकायचं कशाकरितां?"

" आजच्यासारखी प्रकृति नेहमीं बिघडूं नये, शरीराची खराबी होऊं नये, अब्रूची चर्चा चारचौघांत चालूं नये म्हणून—"

असं कांहीं तरी थोडं थोडं मधूनच ऐकायला आलं. त्या बोलण्याचा आगापिच्छा कळेना म्हणून उगाचच मनाला कसेंसें झालें. पुढें कांहीं वेळ तसंच ऐकायला आलं असतं तर कार्यकारणभाव कळलाही असता,पण तें पुढें बंदच झाल्यासारखं झालं. आतां मला तेथें उभें रहावेसेंही वाटेना. दादासाहेबांच्याकडे जाऊन बसावं कीं स्नान वगैरे उरकून स्वयंपाकघराकडे वळून कांहीं पोटापाण्याची व्यवस्था पहावी, बाळक्या भेटला तर त्याला, नाहीं तर येसू—

येसूचं नांव मनांत यायला आणि येसूच आंतून त्या बाजूनें यायला एक गांठ पडली. ती जवळ येतांच मी तिला थांबवून विचारलें, " काय ग येसू, थांब जरा; राजाभाऊ आजारी आहेत? काय झालं आहे त्यांना?"

माझ्या प्रश्नाला उत्तर न देतां माझ्याकडे तिनें नुसतेंच नखशिखांत पाहिलें. जरा हंसलीशी सुद्धां वाटलें.

" येसू, हें काय ? मीं काय विचारलं तुला ? राजाभाऊ आजारी आहेत काय ?"

" होय !" उत्तर मिळालें.

" कशानें ? काय होतंय ?"

" कशानें म्हणून मलाच काय विचारतां ? आहे नेहमींचंच ! पित्त झालंय ! डोकं दुखत होतं. वांत्या झाल्या. अगदीं दुर्गंधी ग बाई दुर्गंधी ! उभं रहावत नव्हतं तिथं " असं सांगितलं. सांगतांना हंसू दाबण्याचा तिचा प्रयत्न चालला होता. पण यावेळीं तो साधला नाहीं. तिच्या त्या हंसण्याचा आशय माझ्या ध्यानीं आला. पण मी तिकडे मुद्दाम दुर्लक्ष केलें.

तिचें हंसणें जसें कांहीं मला समजलेंच नाहीं, या पद्धतीनें मी विचारलें, " मग त्यांची प्रकृति पाह्यला आपल्या वैद्याला–शिवरामपंत पानशाला–आणलं नव्हतें का ? "

" बोलावणं गेलं होतं "

" मग काय झालं ? "

" त्याचा निरोप आला कीं असली श्रीमंती खोटीं दुखणीं खरीं मानून मी औषधं देत आलों असतों, तर आज पुण्याच्या जिमखाना कॉलनीवर स्वतःचा बंगला बांधला असता ! असल्या आजाराकरितां पानसे वैद्य नाहीं. " येसूनें हंसत हंसतच सांगितलें.

" आणखी ? "

येसू पहिल्याच हंसण्याच्या स्वरांत म्हणाली. " आणखी काय असायचं ? तुम्हांला शिव्यांची लाखोली चालली होती. गोपाळभय्याचा उद्धार होत होता. पाहुण्यांचीही हजेरी मधून मधून चाललेलीच होती. आणखी कुणाकणाचीं नांवं तोंडांत घोटाळत होतीं. कोणशीशी 'ती' सुद्धां जिभेवर नाचत होती. मग काय होतं नी काय नाहीं देवाला माहित. आणखी काय दुसरं असायचं ? "

येसूनें सांगितलेलं, ऐकून घेतलें. सारा प्रकार ध्यानीं आला. येसूनं मिस्किलपणानं तो वर्णन केला इतकंच. खरेंच ते प्रकार नेहमींचेच होते.

गोपाळभय्याला शिव्या मिळाल्याचें ऐकून मला मुळींच वाईट वाटलें नाहीं कीं राग आला नाहीं. नेहमींच्याच प्रकाराबद्दल वाईट काय वाटा-यचें आणि राग तो काय मानायचा ? शिवाय राजाभाऊंना ती एक तशी संवयच लागून गेली होती. आणखी कांहीं वेळ जाण्याकरितां 'चल जा फाजील कुठली ! भलतीच पंचाईत तुला कशाला ? अगोदर स्वयंपाक-घराकडे चल. मला जेवायला वाढ. राजाभाऊ निजले असतील तर ते उठेपर्यंत जेवून तर घेतों' असें मी येसूला म्हणतों आहे तोंच राजाभा-ऊंच्या शयनगृहाचें दार उघडलें गेलें. आंतून वहिनीसाहेब बाहेर आल्या. आम्हांकडे त्यांनीं पाहिलें. आमची नजर त्यांच्याकडे गेली. दार उघडतांच वहिनीसाहेबांचा चेहरा हंसरासा भासला पण लगेच तो अत्यंत गंभीर—किंचित् तिरस्कारयुक्त—झाला असें निदान मला तरी वाटलें. येसूनें त्यांच्या-कडे मुळींच लक्षपूर्वक पाहिलें नाहीं. 'काय ग तें ?' असं वहिनीसाहेबां-नींच तिला विचारलें तेव्हां 'साहेबांच्या अंगाखालचा पलंगपोस आणि उशांचे अभ्रे बदलायचे आहेत, ते हे धुतलेले घेतले आहेत' असें म्हणत म्हणत माझ्याही पुढें येसू आंत घुसली.

"बाहेर अण्णा आला आहे वाटतं ? त्याला आंत हांक मार" येसू बाहेर निघायच्या वेळीं तिला राजाभाऊंनीं सांगितलेलें मीं ऐकलें. मग मी येसू बाहेर येण्याची वाटही न पाहतां आंत गेलों. पलंगाशेजारच्या आरामखुर्चीवर राजाभाऊ हातपाय ताणून पडले होते. पलंगपोस बदलण्या-करितां पलंगावरून स्वारी खालीं आली होती ती अजून त्याच स्थितींत होती.

"कां, कसं काय आहे ?" आंत जातांच मीं विचारलें.

"हें असं आहे !" मजकडे पहात राजाभाऊंचें हंसत हंसतच उत्तर आलें. "अरे पण अण्णा, तूं आलास केव्हां ? जेवलास का ?"

"अगोदर आपल्या प्रकृतीची चौकशी, मग जेवण !"

"ठीक ! चालूं द्या चौकशी ! पण मला आधीं हें सांग, पाहुणे काय म्हणत होते ? त्यांना गाडी मिळाली का ? आपल्याबद्दल—"

"खूष होते पाहुणे ! त्यांनीं आपल्याला एकदां मुद्दाम त्यांच्याकडे बोलावलं आहे, परतभेट घेणें त्यांना आवश्यक वाटूं लागलं आहे—"

“ बरं आणखी काय ?—”

“ आणखी काय ! आपण आजारी झालांत हें—”

“ खरंच बुबा ! झालं खरं असं !”

“ पण असं कसं झालं ? आतांपर्यंत कांहीं आपला असा अनुभव नाहीं. आमचं कधीं असं झालं तर तुम्हीं आमचीच हुर्यो करायला तयार असायचे ! करून जिरवायची आपली घमेंडही तशीच अनुभवही तसाच ! मग कालच–”

“ तसं बोलायचं म्हणजे कालचं प्रकरण नेहमींपेक्षां जास्तच रंगलं !”

“ म्हणजे ?—”

“ अरे, तुझं लक्ष नव्हतं अण्णा, तिनं मला किती वेळां आणि किती किती जास्तीचा आग्रह केला तो ! शेवटीं तर स्वतःच्या हातांनीं–मग काय होईल सांग तूंच—”

“ असं, असं ! पण त्यांत काय ? इष्टापत्तीच ती आपल्याला !”

“ पण ती आज भोगावी लागली ना ?”

“ जाऊं द्या ! घरीं आल्यावर तसा कांहीं त्रास झाला नाहीं ना ?”

“ तसा म्हणजे ? ” मजकडे भेदक दृष्टीनें पहात राजाभाऊ म्हणाले. “ सकाळीं वांत्या होऊं लागल्या तेव्हां, बाहेर कळतांच दादासाहेब धांवत आले. मासाहेब घाबऱ्या घाबऱ्या येऊन उभ्या राहिल्या. माझ्याभोंवतीं येसू, बाळक्या, इतर नोकरचाकर, आमच्या सौभाग्यवती यांचा गराडा पडला ! मला काय झालें आणि काय नाहीं असें होऊन गेलें. जो तो विचारूं लागला. सौभाग्यवती आणि मासाहेब तर रडायला लागल्या. बोलतां येईना आणि चालतां येईना. गोपाळभय्या मला सोडून लगेच झटकला. सभोंवतालची मंडळी कांहीं तेथून हालेनात. मग मी तुला आणि गोपाळभय्याला रात्रीं जाग्रण घातल्याबद्दल यथास्थित शिव्या दिल्या.”

“ तें चांगलं केलंत ! चुकला घांव ऐरणीच्या माथीं यायचाच !”

“ बोल, आणखी काय विशेष व्हायला पाहिजे होतं तुला ?”

“ झालं हें काय थोडं झालं ? एवढ्यानंच सारं भरून पावलों. बरं आहे. आणखी जें जें कांहीं झालं असेल तें तें आतांच एकदां सांगून टाकावं म्हणजे पुन्हां हें नको.”

" बाकी अण्णा, कालची मजलस फारच महागाईची पडली. आणखी पडणारही आहे ! "

" म्हणजे काय ? "

" अरे, चांदणीनं हातांतलं सोन्याचं घड्याळ मला हवं म्हणून काढून घेतलं! परवां आणलेली हिऱ्याची आंगठी लाडीगोडी करून उडविली! त्या वेळीं मला नाहीं म्हणतां येतंय थोडंच ?"

" बस्स ? इतकंच ? मग काय बिघडलं त्यांत ? हें येवढं तिला पाहिजेच ! तुमच्या जिवावर तर ती इथं राहिली आहे !"

" अरे, पण एवढ्यानं कुठं ती संतुष्ट आहे ? आपल्या नांवावर एकादा मळा करून द्या म्हणून तिनें हट्ट धरला आहे ना कालपासून ?"

" अं ? असं आहे का ?"

" आतां तूंच सांग, तिच्या नांवानं मळा करून द्यायचा म्हणजे काय ? दादासाहेब आहेत, मासाहेब आहेत, करूं म्हटलं तरी आपल्याला इतक्यांत कसं करतां येणार ?"

" रात्रीं कॉफीच्या वेळेला लाडीगोडीनें आपल्याला मुद्दाम एका बाजूला नेलं होतं तें एवढ्याचकरतां वाटतं ? " मी आठवण दिली.

" नाहीं तर काय ? " राजाभाऊ म्हणाले, " नाहीं तर आपल्याला परत गोव्यांत पाठवा म्हणते !"

" जाऊं द्या हो ! " राजाभाऊंना धीर देण्याकरितां मीं म्हटलें, " गेली तर गेली; पत्रास नको तिची ! एक चांदणी गेली तर पन्नास आणं— तिची घमेंड नको ! शिवाय तुम्ही देतों म्हणालांत तरी काय होणार आहे ? इनाम जमिनी कोणाला देतां येत नाहींत, कोणाला घेतां येत नाहींत हें काय तिला माहीत आहे ? तेव्हां तिला तसं झुलवलं तरी बिघडणार आहे कुठं तुमचं ?"

माझ्या या बोलण्यावर राजाभाऊ एकदम खूप होऊन मला कसें म्हणतात, " यंव रे अण्या ! शाबास आहे तुझी ! डोकं आहे तुला ! म्हणूनच तर लेका तूं मला नेहमीं जवळ पाहिजे असतोस ! तुला बोलायचं सुचतं चांगलं ऐन वेळीं !"

" कशाचं कशाचं राजाभाऊ ! माझं काय ? मी आपला कसला ?"

" नाहीं! आहे, तुझ्यांत ढंग आहे! तूं आपल्याकडे आलेलीं वर्तमान-पत्रं बित्रं वाचतोस कीं नाहीं, त्याचा तुला चांगला उपयोग होतो. तुझ्याचकरितां तीं मी सारीं मागवतों. नाहीं तर मला काय करायचीं आहेत तीं? इथं कोण वाचतो लेकाचा! आणि अण्ण्या, इतक्या दिव-सांत काल पाहुण्यांशीं बोलतांना तूं वर्तमानपत्र वाचतोस अन् त्याचा उपयोग कसा करतोस हें मला कळलं! ते त्या बुरुजावर उभे राहून जेव्हां जोरजोरानें बोलूं लागले तेव्हां मी चीतच झालों. तूं मात्र लेका त्यांना चांगलं तोंड दिलंस. बरी गंमत केलीस—"

" आणि त्यानंतर आपण–" मी राजाभाऊंची कल्पना पुढें पूर्ण केली.

"पाहुण्यांत होतं नव्हतं तें अवसान रात्रीच्या मजलसींत आपल्यांत मिसळून मारून टाकलंत! आपण तरी काय थोडे पराक्रमी आहांत?"

" तें एक और झालं बुवा! दुपारीं लंब्याचवड्या थापा काय मारल्या आणि रात्रीं–हँ! कसे हे असे लोक असतात—"

" अहो राजाभाऊ, असे हे लोक असतात म्हणून जगांत हें असं चाललं आहे! बोलेल तसा वागेल तोच दुसऱ्याला वागवील! नाहीं तर कोण कोणाचं ऐकतो? मी नेहमीं म्हणतों तें उगीच नाहीं कीं त्या लोकां-च्यापेक्षां आपण आणि त्या लोकांच्या उद्योगापेक्षां आपलेच उद्योग फार चांगले आहेत."

"बरोबर आहे तुझं म्हणणं! जाऊं दे तें! पण काय रे अण्ण्या, रात्रीचा मला जसा थोडा त्रास झाला तसा तुला कांहीं? आणि त्या पाहुण्यांना?" राजाभाऊंनीं सहज गमतीनें विचारलें.

"मला? तसा विशेष नाहीं झाला आणि काल मी तसा पहिल्यापासून सावधही होतों. पाहुण्यांची मात्र शहामत खरी! आपल्यापेक्षां ते फारच बिलंदर! आपल्यापेक्षांही त्यांनीं आडवा हात जास्त मारला, पण कांहीं नाहीं! त्यांचा सरावच दिसला! बाकी आपल्या एकंदर ह्याच्यावर मात्र बहाल खुष होते–" हें बोलतां बोलतांच राजाभाऊंना झालेल्या त्रासावरून व नुकत्याच वहिनीसाहेब तिथून गेल्याचें आठवल्यावरून मीं विचारलें, 'राजा-भाऊ, आपला आजार सर्वांना एरव्हींचाच वाटला कीं कोणाच्या कांहीं लक्षांत आलं विशेष? वहिनीसाहेबांच्या ध्यानांत कांहीं आलं नाहीं ना?"

" मूर्ख आहेस का रे अण्ण्या ? लेका, ती इतकी अडाणी आहे, का बोळ्यानें दूध पीत असते ? "

" मग काय ? आपलं सारं बिंग फुटलं वाटतं ? "

" हं ! आणखी त्याबद्दल तिनें आमची चांगली षोडशोपचारें पूजाही पण बांधली ! आतांपर्यंत सांचलेलं सारं उकरून काढून आम्हांला चांगली सूर्याचीं पिल्लं दाखविण्याची पाळी आणली ? पाळी आणली कसली दाखविलीच ! शहाण्याला शब्दाचा मार म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. आपण शिकलेल्या बायकाबद्दल कांहींच्या कांहींच बोलतों खरें; पण अण्ण्या, आज आपल्याला अनुभव आला. शिकलेल्या बायका असं वेचक मर्मी बोलतात कीं काय सांगूं ? "

" अरेच्या ! म्हणजे वहिनीसाहेबांच्या बोलण्याचा तुमच्यावर फारच परिणाम झालेला दिसतोय तर ? " मीं मिस्किलपणानें म्हटलें.

" अर्थात् ! यांत काय संशय ? " राजाभाऊंनीं सरळ उत्तर दिलें.

" बरं–? " मीं पुढें विचारलें, " परिणाम झाला आहे म्हणजे काय झालं आहे ? त्या काय म्हणाल्या ? आपण काय ठरविलं ? "

" अण्ण्या, गाढवा, थट्टा करूं नकोस आमची ! पण मी तुला खरं खरं सांगतों. तिच्या बोलण्याचा आणि उपदेशाचा माझ्यावर फार फार फारच परिणाम झाला आहे ! आपण आतां सगळं कांहीं सोडून देणार ! "

" काय ? "

" हो ! खोटं वाटत असेल तर शपथ घेऊन सांगतों. "

" नका ! राजाभाऊ, अगोदर भलती शपथ घेऊं नका ! आपण सोडणार म्हणजे काय काय सोडणार तें एकदां सांगा आणि मग शपथ घ्या ! नाहीं तर फुकट पश्चात्ताप करण्याची पाळी यावयाची ! सोडणार काय ? चांदणीला ? का जॉन हेग, जॉन बेग, जॉनी वॉकर, व्हाइट हॉर्स, ब्लॅक अँड व्हाइट, ओल्ड टॉम, जिन, जिलिबी, रम्, थ्री स्टार्स यांपैकीं कांहीं सोडणार ? कुठें सोडणार ? किती वेळ सोडणार ? "

" अण्ण्या, अण्ण्या, लेका अण्ण्या—"

" काय ? काय ? त्या सर्वांबरोबर अण्ण्यालाही सोडणार ! ठीक आहे- चांगलं आहे. उत्तम आहे ! स्तुत्य आहे ! मग आतांपासूनच तुमचा आमचा

ऋणानुबंध सरता झाला, आम्हींही आपली रजा घेतों! झाल्या तेवढ्या केल्या गंमती. आतां तुमचे मार्ग निराळे—आमचे वेगळे! आपण आपल्या वाड्यांतून हांकून देणार त्यापेक्षां आमचे आम्हींच शहाणपणानं निघून गेलेलं काय वाईट? आपण वहिनीसाहेबाचं ऐकूं नये आणि आमचं ऐकावं असं मी कधीं म्हटलं नाहीं, म्हणत नाहीं आणि म्हणणार नाहीं. आपण त्यांचंच ऐका. त्यांच्याच तंत्रानं वागा, आमचा नाद सोडा, त्यांतच आपलं हित आहे—कल्याण आहे—"

" अण्ण्या! फारच भडकलास तूं हं! माझं सगळं ऐकून घेतल्या-शिवाय, तिनं मला काय काय सोडायला आणि काय काय धरायला सांगितलं आहे हें समजावून घेतल्याशिवायच बडबडलास! देऊं कां एक लाथ पेकाटांत!" असें म्हटलें आणि खरेंच त्यांनीं कृतीकरतां लाथ उचललीही. मी जरा बाजूला झालों म्हणूनच बरं!

" बरं मग ऐकवा तें एकदां मला!" मीं म्हटलें.

" मी चांदणीकडे गेलेलों तिला खपत नाहीं!"

" हं! पण इनामदार लोकांनीं असं न करून कसं चालेल—"

" आमचं बाहेरचं खाणंपिणं तिला मुळींच पसंत नाहीं—"

" कां?"

" माझी प्रकृति आजच्यासारखी बिघडते म्हणून!"

" काय वेड आहे? असं कुठं नेहमींच असतं वाटतं?—"

" येसू माझ्याशीं बोललेली—मी तिच्याकडे पाहिलेलं तिला आवडत नाहीं. स्पष्ट बोलली नाहीं—पण पर्यायानें तेंचे सांगितलें—पायांतली वहाण पायांतच बरी दिसते—डोक्यावर कोणी ठेवीत नसतात! असं ती म्हणते."

" बरोबर! हें वहिनीसाहेबांचं बोलणं मलाही पटलं या बाबतींत—"

" काय? या बाबतींत सौभ्याग्यवतीसारखंच तुझंही मत आहे? तूंही तिच्याच बाजूचा आहेस? लेका, या बाबतींत पहिल्यांदा भर देणारा तूं आणि आतां तूंच—"

"राजाभाऊ," मीं किंचित् हंसत म्हटलें "माझं बोलणं तुमच्या लक्षांत नाहीं आलं! वहिनीसाहेबांना तें आवडत नाहीं; आणि भलतेंच त्यांना आवडायचेंही नाहीं—पण मी म्हणतों आपण हें त्यांच्या डोळयावर येण्या-

सारखं करतांच कां? खायचं तें झांकून खावं हें मी आपल्याला नेहमींच सांगतों. पण आपण ऐकतां कुठें माझं? आपला स्वभाव—"

"बरं! बरं! आहे ठाऊक तुझं पांडित्य! आणखी ऐक—"

"काय?—"

"अरे, ती तुझी–आपल्या मळ्यांतल्या वाटेकऱ्याची हरिणी–काल तिनं थेट सौभाग्यवतीसमोर येऊन बोंब मारली ना सारी—!"

"अं? असं का? तरी मला वाटलंच होतं कीं, ती छिनाल पोर भडकच आहे म्हणून! तो भडकपणा इथपर्यंत केला का? हरकत नाहीं. त्याचा बंदोबस्त आपल्याकडे लागला" बेगुमानपणें मी आश्वासन देऊन म्हटलें "चला पुढें. आणखी? आमच्याबद्दल अजून नाहींना वहिनीसाहेबांचं मन कलुषित? बोला. हो! म्हणजे आपलं—"

"छे:! भलतंच कांहीं तरी! जशी माझी तशीच तिचीही तुमच्याबद्दल भावना आहे—"

"मग कांहीं हरकत नाहीं! बरं आणखी काय काय—"

"बोलण्यावरून बोलणीं निघालीं कीं निघतातच! मोडकळीस आलेल्या राममंदिराचा जीर्णोद्धार करावा. मोहरमचं, मुसलमानांचं, त्यांच्या ताबूताचं जें फार दांडगं बंड असतं, तें बंड मी अजीबात मोडावं—"

"हें नाहीं आपल्याला पटत बोवा!" मी त्यांना थांबवून म्हटलें; "वहिनीसाहेब सुशिक्षित आहेत, समंजस आहेत; बयाच्या मानानें त्यांचे चांगले पोक्त विचारही आहेत पण राजाभाऊ, वहिनीसाहेबांच्या मताविरुद्ध मी बोलतों म्हणून राग येऊं देऊं नका कीं, गैरसमजही करून घेऊं नका–त्या मला वंद्य आहेत. पूज्य आहेत. मान्य आहेत. आदरणीय आहेत! म्हणून काय त्या म्हणतील तें सगळंच काय मान्य करायचं? त्या एवढ्या वाचतात, विचार करतात, त्यांच्या हें एवढं ध्यानांत येऊं नये–"

"तिच्या काय ध्यानांत यायचं!—"

"चालू काळीं सरकारी वक्रदृष्टि इनामी उत्पन्नाकडे आहे. कुठूनं तरी खुसपट काढून इनामी उत्पन्न काढून टाकण्याचं त्यांचं धोरण आज सर्वांना माहीत आहे. दुसरें, आपल्यापेक्षां मुसलमानावर सरकारी मेहेरनजर पहिल्यापासूनच जास्त आहे. तेव्हां 'इनामी उत्पन्ना'च्या भावी संकटांना

टाळण्याकरितां सरकारांना जें प्रिय तें आपल्याला प्रिय करून घेतलं पाहिजे. आजकाल हिंदूंचा राम, तुमच्या उत्पन्नावर कांहीं संकट आलं तर तें दूर करायला धजणार नाहीं पण संकट न येऊं देण्याकरितांच रामापेक्षां रहिमचा–मुसलमानांच्या उंच उंच डोल्यांचा तरी खास उपयोग होईल अशी आशा आहे! म्हणून तर तुम्हीं मुसलमानांचे डोले खांद्यावर घेऊन मिरवतां, त्याचा उदो उदो करतां! हें वहिनीसाहेबांना कुठं समजलंय ?—" असें एक चांगलें व्याख्यान मीं दिलें.

" बरोबर आहे तुझं म्हणणं! " माझा मुद्दा राजाभाऊंना एकदम पटला; ते पुढें म्हणाले; " अण्णा, हें तुझ्यासारखं आपल्याला नाहीं बुवा वेळेला बोलायला सुचत! तूं हें सांगितलंस, तें तिच्याशीं बोलतांना मला सुचलं असतं तर? अण्ण्या, आतां असं करतों, सौभाग्यवतीनें पुन्हां बोलायला आरंभ केला म्हणजे तुला हांक मारतों आणि तिच्या प्रश्नांचीं उत्तरें तुलाच द्यायला लावतों—म्हणजे—"

" वा: ! राजे ! वा: ! म्हणजे स्वत: स्वस्थ राहून आपण चांगुलपणा मिळविणार आणि मला पुढें करून वाईटपणा माझ्या पदरीं बांधणार वाटतं ! या गोष्टीला आपण नाहीं बुवा कबूल ! वहिनीसाहेबांची माझ्याविषयीं सहानुभूति आहे ती अशानें आपण होऊन घालवायला मी तयार नाहीं–"

" पण लेका, माझ्या पापाचा पाढा आजची संधि साधून तिनें माझ्याच पुढें वाचला आहे आणि यांतली कोणतीही गोष्ट पुन्हां हातून होऊं द्यायची नाहीं अशी खबरदारी घ्यायला बजावलं आहे! पण मी मूर्खानें तें कबूलही केलं आहे!—"

" मग चांगलं झालं ! "

" चांगलं काय झालं तुझं कपाळ का माझं कपाळ ? मी या पेंचांतून कसं सुटावं हें जर का तूं भल्या गोष्टीनं सांगितलें नाहींस तर तुझ्या टाळक्यांत चांगलं हेंच घालीन बघ " असें म्हणत एक गिरदी त्या त्वेषांत माझ्यावर जोरानें त्यांनीं फेंकलीच ! " बोल ! मी कसं वागावं हें सांगतोस कीं नाहीं ?—"

" काय राजाभाऊ हें ! बायकांचं काय ऐकायचं आणि काय नाहीं हें ज्याचं त्यानं ठरवायचं का माझ्यासारख्या तिऱ्हाइतानं शिकवायचं ?—

" भलती बडबड नको आहे मला–सौभाग्यवतीनें ज्या गोष्टी करायच्या नाहींत, असें सांगितलं आहे व जें मीं कबूलही केलं आहे त्याबद्दल सांग–"

" ठीक आहे! मग असं करा—" सांगायच्या सुरवातीला येणारें हंसू मी कसें तरी आवरलें. दारांतून कोणी येणार तर नाहींना, अशा हेतूनें तिकडे पाहिलें आणि मग म्हटलें, " राजाभाऊ, चांदणीकडे आपण वेळीं अवेळीं, दिवसांसुद्धां जातां, तें एकदम बंद करून फक्त रात्रींच जात जा–"

" म्हणजे ?—"

" त्या बाबतींत एवढी सुधारणा झाली तरी वहिनीसाहेबांना संतोष वाटेल. येसूच्या संबंधांत मघाशींच काय तें सांगितलं आहे. आतां राहिला खाद्यपेयाचा प्रश्न! त्या बाबतींत—"

" काय करूं ?—"

" त्याचा अतिरेक हल्लीं होतो. त्याला आळा घाला! तो अशाकरितां घालायचा कीं, घरीं संशय येऊं नये आणि आजच्यासारखं आजारी पडूं नये"

" गाढव आहेस झालं!"

" इतक्या उपयुक्त सूचना करून शेवटीं मीच गाढव ना? वाः! खासा न्याय! मग विचारलंत तरी कशाला? बरं पण; तें बाजूला सारा. वहिनीसाहेबांनीं जसं कांहीं करायचं नाहीं, असं सांगितलं तसं कांहीं करायलाही सांगितलं असेलच!" मी विचारलें.

" अरे तर रे! तेंही मी तुला विचारणारच होतों—"

" तें काय काय आहे?"

" संपत्तीचा सद्व्यय—"

" तो आपला चाललाच आहे! तें त्यांनीं नको सांगायला!–"

" लोकशिक्षण, लोककल्याण, आत्मोन्नति, देशसेवा!"

" ठीक आहे! उत्तम आहे! इतकंच ना? हें ठरलं तर! हें सगळें–निदान यांतलं कांहींही केलं तरी वहिनीसाहेबांचं समाधान होणार आहे ना? त्या खूष होणार आहेत ना? आपल्याकरवीं लोककल्याण, आत्मोन्नति, देशसेवा हे सर्व प्रकार घडविण्याचं आपल्याकडे लागलं! बोला, केव्हांपासून तुमची तयारी आहे? वहिनीसाहेबांनीं केव्हांपासून उद्योगाला लागण्याची आज्ञा केली आहे?–

हें मी म्हणायला आणि दार उघडून वहिनीसाहेब सरळ आंत यायला एकच गांठ पडली. एकदम मी दचकलोंच! त्यांनीं माझें काय बोलणें ऐकलें आणि काय नाहीं कोण जाणें! पण त्याचा विचार करण्याची फुरसत राजाभाऊंनीं मला दिलीच नाहीं. ते लगेच मला म्हणाले 'यांच्या आम्हांला काय आज्ञा आहेत हें यांनाच विचार."

"अण्णा, तुम्हांला जेवायचं आहे ना अजून? मग उठा बरं अगोदर. तुमचं तिकडे पान मांडून बाळकृष्णा वाट पहात आहे, जा अगोदर. जेवण झाल्यावर तुम्हांला काय विचारायचं असेल तें विचारा."

"अरे हो! तुला जेवायचं होतं नाहीं का?—" राजाभाऊ उद्गारले.

"बोलायच्या भरांत ध्यानांतच राहिलं नाहीं!" असें म्हणत मी उठलोंच, वहिनीसाहेब तिथेंच राहिल्या. मी बाहेर जातांना दार पुढें केलें!

"हें असंच वागणं असलं म्हणजे लोककल्याण, आत्मोन्नत्ति, देशसेवा चांगलीच हातून होईल म्हणायची?—" हें किंवा असलेंच कांहीं तरी वहिनीसाहेबांचें वाक्य माझ्या कानीं पडलें. पण मी मात्र 'राजाभाऊंना कोणत्या प्रकारच्या देशसेवेच्या मार्गाला लावावं म्हणजे आपली चलती आणि जगाची डोळेफोड होईल याच्या विचाराला गंभीरपणें त्याच क्षणापासून सुरवात केली.

---

# प्रकरण नववें

## यक्षिणीनें कांडी फिरविली?

नदीचा प्रवाह कालांतरानें बदलत असतो तसेंच मनुष्यस्वभावाचें आहे कीं काय कोण जाणें! आणि तसा बदल व्हायला थोडेंसेंच कारण पुरतें आणि प्रवाहाची गति आणि पसारा मात्र फार झपाट्यानें वाढत जात असतात. या गोष्टीचा विचार करण्याचें कारण आजपर्यंत पडलें नव्हतें. पण ती गोष्ट आपल्यापर्यंत येऊन भिडल्यानंतर आणि त्या गोष्टीचे

अनिष्ट परिणाम आपल्याला भोगावे लागणार हें स्पष्ट दिसून आल्यानंतर कोणालाही तशा गोष्टींचा विचार येणारच ! माझ्या बाबतींत तरी सध्यांच असें पुष्कळसें होऊन राहिलें होतें.

चांदणीच्या घरीं एक दिवस मजलस झाली काय, त्यांत जरा जास्त इकडे तिकडे झालें काय, दुसरे दिवशीं राजाभाऊ तास दोन तास जरा कुठें अवस्थ झाले काय, आणि त्याच क्षणाचा वहिनीसाहेबांनीं योग्य प्रसंग साधून आमच्याविरुद्ध फायदा घेतला काय? राजाभाऊंचा अगोदरच लवचिक स्वभाव, त्यांत त्यांची ओशाळगत झालेली, त्यांत आणखी राजाभाऊंच्या मनाचा प्रवाह बदलावयास टपून बसलेल्या वहिनीसाहेबासारख्या, रूपसंपन्न आणि शिक्षणसंपन्न अशा राजाभाऊंच्या पत्नी ! तेव्हां राजाभाऊंच्या मनाचा प्रवाह झटक्यासरशीं बदलला आणि फार झपाट्यानें त्याचा वेग व विस्तार वाढूं लागला हें वर्णन करण्यांत तरी काय विशेष आहे ? त्या दिवशीं चांदणीच्या घरीं सर्वजण मजलसींत दंग असतांना आमची चैन शिखराला पोहोंचली आहे–शेवटाला गेली आहे–कळसाला तिनें गांठलें आहे, असें मधून मधून त्या रात्रीं आम्हांला वाटत होतें. राजाभाऊंच्या मनाचा प्रवाह बदलावयाला त्याच्या दुसऱ्याच दिवशीं वहिनीसाहेब समर्थ झाल्याचें जेव्हां माझ्या दृष्टीस आलें, त्यावेळीं–त्या रात्रीची चैन खरीच अतिरेकाला पोंचली अशी खात्री पटली. कारण,एकाचा अतिरेक झाल्याशिवाय दुसऱ्याचा आरंभ होतो कसा ! दर दिवशीं मी पहात होतों–राजाभाऊ आमच्यांतून हळू हळू निसटून वहिनीसाहेबांच्या मोहपाशांत जास्तच अडकत चालले होते ! मला त्यांनीं लोकोपकाराचा, देशभक्तीचा मार्ग विचारला होता. मी डोकें खाजवून आपल्याला फायदेशीर असे कांहीं मार्ग मुक्रर करून राजाभाऊंना सुचविणारही होतों, पण कसें काय झालें कुणास ठाऊक, ते वहिनीसाहेबांच्या तंत्रांतून सुटून त्यांना व मला पहिल्याप्रमाणें बोलासवरायला ऐसपैस वेळ मिळेनासाच झाला ! ते मला विचारीनात–म्हणजे त्यांना तशी फुरसदच मिळेना. मला सांगतां येईना–सांगूं केव्हां ? आतांशा वहिनीसाहेबांनीं राजाभाऊंचा सुखाचा जीव चांगलाच दुःखांत घातला होता व त्याही तशाच दुःखांत पडत होत्या. जीं कामें करायला दादासाहेब होते, हाताखालीं आणखी किती तरी दिवाण-

जींचा तांडाच्या तांडा होता, म्हटलें असतें तरी त्यांत आणखी किती-कांची भरही घालतां आली असती. आजपर्यंत अनेक वर्षांपासून दादा-साहेब तो कारभार करीतच होते. नोकरादिकांनीं सहज ज्या गोष्टी करा-यच्या त्या स्वतः राजाभाऊंनीं करण्याचें कारण काय ? त्यांत मोठेपणा आणि शोभा काय ? पण वहिनीसाहेबांनीं तसा विचार करायला राजा-भाऊंना फुरसद कुठें ठेविली होती ? एकाद्या बड्या सरकारी अधिकाऱ्याचे महिन्यामहिन्यांचे दौरे आगाऊच ठरलेले असतात, तसे आपल्यासह राजाभाऊंचे दौरे वहिनीसाहेब स्वतः ठरवूं लागल्या. ते अमलांतहि येऊं लागले ! इनामगावें किती आहेत ? कुठें कुठें आहेत ?—त्यांची हालहवाल काय आहे ? तिथले लोक सुखी आहेत कीं दुःखी ? त्यांच्या तक्रारी काय आहेत, त्यांना गरजा कशाच्या आहेत, आपल्याविषयीं त्यांच्या कल्पना काय आहेत, आपल्याकडून त्यांना कोणकोणत्या गोष्टींची अपेक्षा आहे ? असल्या नसत्या प्रश्नांना महत्त्व आणून त्याच विषयाचा एक-सारखा काथ्याकूट करून त्याकरितां त्या त्या ठिकाणीं प्रत्यक्ष फिरून यायचें; गोरगरीबांत मिसळायचें; त्यांचीं सुखदुःखें पहावयाचीं, त्यांना विचारावयाचें; त्यांची कळकळ बाळगायची असले प्रकार सुरू झाले ! वहिनीसाहेबांनीं हे उद्योग सुरू केले. बरेच दूरचे यांचे वांटेकरी लोक राजाभाऊंना भेटा-यला आले असतां ज्यांना ‘ राजाभाऊंना आपल्याकडे पाठवून देऊं किंवा घेऊन येऊं ’ अशी मी सरळ थाप देऊन वाटेला लावलें होतें तिकडेसुद्धां मला न विचारतां वहिनीसाहेबांच्या सांगण्यावरूनच त्यांच्यासह राजाभाऊ चांगला चारपांच दिवसाचा दौरा करून आले. तिकडे ते जाणार हें मला कळलें तेंव्हां त्याला मोडता घालण्याचा मी पुष्कळ प्रयत्न केला. ‘ जाणारच तर आगाऊ त्या गांवीं आपल्या स्वाऱ्या जाणार असल्याचें कळवा म्हणजे तुमच्या बरदास्तीची तेथें लोक व्यवस्था करतील. दोघेंच जाऊं नका. आणखी कुणाला तरी बरोबर घ्या. गोपाळभय्याला बरोबर न्या. माणसांचं कांहीं दुर्भिक्ष नाहीं. मग श्रीमंती असून गरीबीचे डोहाळे कां तुम्हांला ? ’ असं सुद्धां संधि साधून वहिनीसाहेबांच्या समोर राजा-भाऊंना बोलण्याचं मी धाडस केलें ! पण वहिनीसाहेबांनीं मलाच निरु-त्तर करून गप्प बसविलें. त्या आपल्या चक्क मला म्हणाल्या, “ त्या गांवीं

आगाऊ वर्दी द्यायची कांहीं आवश्यकता नाहीं. आगाऊ कळलं तर ते गरीब लोक आमच्या स्वागताची तयारी करतील. त्याकरितां निष्कारण खर्चांत पडतील. त्यांची गरीबी लपली जाईल आणि आम्हांला खरी वस्तुस्थिति मुळींच कळायची नाहीं. जाऊं त्यांची वस्तुस्थिति पहायला आणि येऊं त्या गरीबांकडूनच आपलं आगतस्वागत करवून, त्यांच्याकडून आपल्याभोंवतीं दिवे ओवाळून घेऊन ! त्यांच्या उपयोगी पडायचें दूर राहून, त्यांनाच दुष्काळांत तेरावा महिना या न्यायानें उलट खर्चांत पाडून ! म्हणून आगाऊ कळवायाचं नाहीं. आपली जेवायखायची व्यवस्था आपल्याबरोबर ठेवायची. त्या गरीबांना पैची देखील तोशीस द्यायची नाहीं. याकरितां तर तिकडे जायचं. शिवाय आमच्याबरोबर रिकामी माणसं हवींत कशाला ? यात्रेजत्रेला कांहीं तिकडे जायचं नाहीं कीं कुठें प्रेक्षणीय स्थळ पहायला–सहज जिवाचं कोडकौतुक करून घ्यायला–जायचं नाहीं. मग इतरांना नेऊन काय करायचं ? घोडं मेलं ओझ्यानं नी शिंगरूं मेलं हेलपाट्यानं असलं पाहिजे आहे कशाला ?—"

वहिनीसाहेबांच्या या बोलण्यावर मी काय बोलणार ? मला चुरमुरे खात स्वस्थच बसावें लागलें ! त्या वेळींच नव्हे, तर त्यानंतर एकसारख्या आमच्या तशाच पाळ्या यायला लागल्या ! आम्ही आतां वाड्यांत निस्तेज होत जाणार, निस्तेज होत चाललों, असें मुद्धां वरचेवर आमच्या मनांत येऊं लागलें !

राजाभाऊ दिवसेंदिवस आम्हांला महाग होऊं लागले. इतकं त्यांना चांदणीचं वेड ना !–दिवसा काय, रात्रीं काय, चार तास काय, आणि दहा तास काय, स्वारी तिच्याकडे पडून रहायची, तर आतां तिच्या घराकडे महिना–महिना राजाभाऊंना फिरकायला होईना ! नव्हे तिच्या घरावरून त्यांची मोटार देखील जाणें मुष्कील झालें ! तिचे निरोप यायचे, मला बोलावून न्यायची, तिच्या तक्रारी, तिचीं गऱ्हाणीं, रडणें, भेकणें, सुरू व्हायचें. शेवटीं 'असें किती दिवस चालणार ? माझी पुढें वाट काय ?' असें तिनें मला विचारलें. मी तरी तिला काय सांगूं ? माझ्यावर ती अवलंबून, आणि तिच्यावर आम्ही ! आणि आम्हां सर्वांची तर अशीच तऱ्हा होऊन बसलेली ! तरी चांदणीच्या बाबतींत अजून हें बरें होतें कीं, तिचा

तनखा निर्वेधपणानें चालू होता. त्याकडे अजून वहिनीसाहेबांची किंवा दादासाहेबांची वक्रदृष्टि वळली नव्हती! राजाभाऊंच्या मागें सारखी फिरतीच लावल्यामुळें वहिनीसाहेबांनीं येसूची आणि त्यांची शिताफीनें ताटातूटच केली होती. दौऱ्यावर त्या बाळक्याला बरोबर घ्यायच्या. येसूला आर्जवून मुद्दाम टाळायच्या! याप्रमाणें वहिनीसाहेबांनीं राजाभाऊंना आमच्याकडे वळविण्याचीं जीं जीं दारें म्हणून होतीं, तीं तीं दारें हां हां म्हणतां, मोठ्या कौशल्यानें आणि तडफीनें रोखून टाकलीं होतीं!

राजाभाऊंची जी आवडती बुलसली मोटार कीं जींत आजपर्यंत केवळ राजाभाऊ, चांदणी, मी व गोपाळभय्या असे बसत आलों; आमचा एक दिवस तींतून मजेनें हिंडून आल्याशिवाय गेला नाहीं, तींतच आतां राजाभाऊ आणि वहिनीसाहेब बसून सकाळीं दौऱ्यावर जात असतांना ती आम्हांला नुसती दिसते किंवा परत येतांना दृग्गोचर होते!

आतां पंक्तीवरच्या आमच्या गोष्टीगप्पांना महत्त्वच राहिलं नाहीं. किंबहुना आम्हांला तोंड उघडायची पाळीच येईना. सध्यां आम्हीं—मी, गोपाळभय्या वगैरे—नुसते पंक्तीबारगीरच ठरलों होतों. दौऱ्यावरून परत आल्यावर राजाभाऊंच्या दौऱ्यांतील साऱ्या गोष्टींबद्दल गप्पा चालू झाल्या होत्या.

" अमक्या ठिकाणीं आमचं स्वागत झालं, तमक्या टिकाणच्या लोकांना आम्हीं अमुक अमुक करूं म्हणून आश्वासन दिलं, अमक्या गांवच्या बायकांना भेटायला बोलावलं—त्याना एकत्र जमविलं—त्यांच्या मुलांना खाऊ वांटला—त्यांना खण वगैरे दिले—त्यांच्यांत बसून त्यांच्या बऱ्याच गोष्टी ऐकल्या, त्यांना पुष्कळ गोष्टी सांगितल्या, निघतांना मंडळींनीं असा निरोप दिला, मंडळी दूरवर पोंचवायला आली-पुन्हां येण्याचा आग्रह केला, अमक्या ठिकाणीं मोटार नादुरुस्त झाली, तीन तास तिथें काढावे लागले, वाटेंत दोघांना कांहीं ठिकाणीं उपाससुद्धां पडले—गरीब शेतकरी फार सज्जन असतात—चांगले असतात—त्यांचीं दुःखें आणि दैन्यावस्था यांकडे कोणी लक्ष देत नाहीं, पण पाहिल्याशिवाय कळत नाहीं, कळल्याशिवाय त्यांच्या सुधारणा करणार कोण? पहाणार कोण?—"

वहिनीसाहेबांच्या संगतीनें आणि सहवासानें राजाभाऊ असें सुद्धां बोलण्यांत तरबेज होऊं पाहत होते. पंक्तीवर राजाभाऊ आम्हांला म्हणून सांगत

पण ऐकत असत सारे जण! दादासाहेब मुकाट्यानें जेवीत. इकडेतिकडे पहात नसत किंवा आपल्या चेहऱ्यावर चिरंजीवांच्या सांगण्याचा अनुकूल-प्रतिकूल कांहीं परिणाम होत आहे—नाहीं—असें सुद्धां दाखवीत नसत!

राजाभाऊंच्या पंक्तीवरच्या गोष्टी अगदीं आम्हांला इच्छेच्याविरुद्ध ऐकून घ्याव्या लागत, नव्हे—ऐकून त्यांची आणखी प्रशंसा करावी लागे! करणार काय? त्यांच्या पंक्तीला जेवायचें असे ना आम्हांला? पंक्तीवर एकदां कोणी एकादे वेळीं त्रयस्थ असला म्हणजे त्या त्यांच्या नव्या नवलाईच्या गोष्टींचा त्या तिऱ्हाईतावर मारा होई. त्या वेळीं मात्र तेवढ्यापुरते आम्हीं अचूक सुटत असूं!

त्यांच्या त्या बोलण्याचा माझ्यावर एकादे वेळीं असा सुद्धां परिणाम होई कीं, एवढा बिचारा श्रीमंत असून काय एकसारखा जीवापाड कष्ट करतो आहे आणि आम्हीं मात्र ऐदीपणानें त्याच्या अन्नावर फुकट पोसत आहोंत!

हें असें वाटूं लागलें कीं मनाला अत्यंत चीड येई. आम्हांला असें वाटायला लावायची पाळी वहिनीसाहेबांनीं आणिली होती. या अनर्थाला त्या कारण होत्या. भर पंक्तीवर राजाभाऊ अलीकडे वहिनीसाहेबांची स्तुति—दादासाहेबांच्या समोर—आपल्या मातुश्रींच्या—श्रीमंत वहिनीसाहेब इनामदाराच्या देखत, त्यांची मर्यादा झुगारून देऊन करीत. म्हणूनच दादासाहेब मुकाट्यानें बसत! त्यांना त्यांचें कोणतेंही करणें मुळींच पसंत नसावें. वहिनीसाहेबांनीं तर त्यांच्याबरोबर दौऱ्यावर जावें, कुळंब्यामाळ्यांच्या बायका जमवून, त्यांच्यापुढें व्याख्यानें झोडावींत, पांडित्य मिरवावें, ज्ञानाची दिवटी पाजळावी असें दादासाहेबांना आवडत नसलेंच पाहिजे असें त्यांच्या तटस्थ वृत्तीवरून वाटत होतें. राजाभाऊंचें कोणतेंही कृत्य प्रथमपासूनच मला मान्य नव्हतें. माझ्या मताला दादासाहेबांचें कितपत सानुकूल्य आहे, हें पहावें असें एक दिवस माझ्या मनांत आलें. त्यांचें आपल्यासारखेंच मत असलें—राजाभाऊंनीं बायकोच्या छंदानें भलतेच ढंग चालविले आहेत, ते बंद व्हावेत, त्यांचे ते उद्योगही नव्हेत व ते करण्याची त्यांना आवश्यकताही नाहीं, असें माझ्याप्रमाणेंच दादासाहेबांचेंही मत असलें—आणि तें तसें असणारच! कारण राजाभाऊंनीं आपला कारभार अशा प्रकारें हातांत घेतला तर दादासाहेबांची तरी त्यांना काय जरूर?

वडील म्हणून फार झालें तर त्यांना कुठें तरी अडगळींत रिचवितील. पण त्या तऱ्हेनें राहणें दादासाहेबांना आवडलें पाहिजे ना? त्याशिवाय त्यांना या वतनाचें वहिवाटदार राहून आणखी कांहीं गोष्टी करावयाच्या आहेत त्यांची काय वाट? म्हणून दादासाहेबांचें मत सध्यां तरी माझ्या मताशीं जुळतें असणारच!—तर त्यांच्या आपल्या विचारानें राजाभाऊंचें आणि वहिनीसाहेबांचें चालू बंड मोडून टाकण्याचा विचार करतां येईल. या कल्पनेनें एक दिवस सकाळीं राजाभाऊ आणि वहिनीसाहेब मोटारींत बसून कुठल्या खेड्याची शेती पहायला म्हणून गेले, त्यांना आम्हीं सर्वांनीं निरोप दिला आणि मग ती संधि साधून सहज म्हणून मी दादासाहेबांच्या जागेंत जाऊन बसलों. त्यांच्याच पुढचें पानतंबाखूचें तबक जवळ ओढलें. सुपारी कातरीत मीं होऊनच म्हटलें, "काय, दादासाहेब, राजाभाऊंचा नवा उपक्रम कसा काय आहे?—"

"फार चांगला आहे!" उठून आपल्या तोंडांतली दातांची कवळी पाठीमागच्या कोनाड्यांतील कांचेच्या बरणींत काढून ठेवून दादांनीं माझ्या प्रश्नाला उत्तर दिलें. ते तेवढेंच म्हणून थांबले नाहींत तर परत वळून, आपल्या हाताच्या त्या विचित्र बोटांनीं विडी अबदार अशी धरून तोंडांत घालून आणि बेतानें काडी ओढून विडीला लावीत आणखी म्हणाले, "समजलांत अण्णा? आतां मुखत्यार कारकीर्द आहे! आम्हांला बोलायचं काय कारण आहे? मी आजपर्यंत या इस्टेटीचा मॅनेजर होतों—आजही आहे-मुखत्यारांना जरूर असेपर्यंत आणखीही राहीन. आतां मुखत्यारच देखरेख पहायला लागले आहेत. फार चांगली गोष्ट आहे! माझ्या शिरावरचं काळजीचं ओझं उतरलं असं मी म्हणेन!

"अहो पण यातायात कोण? कष्ट किती?" मीं दादासाहेबांना मुद्दाम डिंवचण्याच्या हेतूनें मध्येंच म्हटलें.

"मग? कष्ट केले म्हणून बिघडलं कुठं? शिवाय छंदीफंदी लोकांतून रिकामटेकडे हिंडण्यापेक्षां आणि चैनी-व्यसनी बनण्यापेक्षां चालू आहेत हे उद्योग फार-फारच चांगले आहेत!"

दादासाहेबांच्या संबंधाची माझी पहिली कल्पना चुकली. राजाभाऊंचें कृत्य त्यांना पसंत असल्याचें स्पष्टच त्यांनीं सांगितलें. पण सांगतां सांगतां,

त्या खवचट आणि हलकट थेरड्यानें 'छंदीफंदी माणसांच्या नादीं लागून रिकामटेकडे हिंडण्यापेक्षां आणि चैनी-व्यसनी बनण्यापेक्षां सध्यांचा उद्योग चांगला आहे' असा चिमटा सरळ सरळ मलाच काढला! आपल्याला हा थेरडा उपयोगी पडायचा नाहीं-कापल्या करंगळीवर तो मुतायचा नाहीं असें पक्कें ठरलें. मग मी त्याचें पुढील ठरावीक 'मी आज नेहमींप्रमाणें पांच वाजतां उठलों. एरंडेलाची सबंध बाटली रोजच्यासारखी तोंडाला लावली-चहांत आणि एरंडेलमध्यें मला मुळींच फरक वाटत नाहीं. नंतर चार वेळां शौचाला जाऊन आलों. शौचाला साफ झाल्याशिवाय मला बरेंच वाटत नाहीं. मी पूर्वीं बँकेचा मॅनेजर होतों तेव्हांपासून माझ्या शौचासंबंधानं......" या प्रकारचें त्या थेरड्याचें त्याच्या शौचासंबंधीचें व्याख्यान ऐकायला मुळींच बसलों नाहीं! वहिनीसाहेबासंबंधीं कांहीं चुगली करावी असं एकदां मनांत आलें होतें पण थेरडा जिथें सर्वस्वी राजाभाऊंचा भुत्या, तिथें वहिनीसाहेबांबद्दल मला ब्र तरी तो कसा उच्चारूं देईल? मी बोललोंच नाहीं. तसाच उठलों.

आतां काय करावें? राजाभाऊ आपल्या पकडींत पुन्हां कसा यावा? कसा आणावा? कांहीं उपयोग नव्हता, पण मी थोरल्या श्रीमंत वहिनी-साहेबांनासुद्धां त्या बाबतींत डिवचून पाहिलें. पण त्या म्हणाल्या, "बघ बाबा! राजाभाऊ उगीचच मरमर मरतो आहे. निजून बसून खाल्लं तरी त्याला पिढ्यान्‌पिढ्या सरायचं नाहीं, असं उत्पन्न आहे! मग कां तो जिवाची अशी फेसाटी करतोय, काय कीं! ती पोरगी पण त्याच्याबरोबर वणवण फिरते तेव्हां काय म्हणावं? पण सांगायचं कुणी नी ऐकणार कोण? धांव धांव धावतील, अन् एकाद्या दुखण्याला आमंत्रण करतील झालं! अण्णा, राजाभाऊ माझं कांहीं ऐकायचा नाहीं. आतांशा माझ्यासमोर येत नाहीं कीं माझ्याशीं बोलत नाहीं. त्या पोरीला तरी बोलायची कांहीं सोय आहे होय? ती मुळीं बोलायची वेळच आणूं देत नाहीं. घरांत आली कीं कामांत आणखीन् नवऱ्यानं बोलावलं कीं आपली मोटारींत जाऊन बसते! अण्णा, तूं तरी राजाभाऊला चार गोष्टी समजावून सांग. हीं नवीं पोरं आमचं का ऐकायचीं आहेत? तुमचंच ऐकायचीं!"

आटोपलें! त्यापुढें मी काय बोलणार?

राजाभाऊंचे चालू प्रकार तसेच चालू दिले तर पुढें मागें आपली धड-गत नाहीं. आपला चरू बंद व्हायचा, चैन संपायची नी साराच कारभार आटपायचा! तेव्हां नाना व्याप करून राजाभाऊंसारखा वेताळ पुन्हां पूर्वस्थळावर आणणें मला अत्यंत आवश्यक होतें. वेताळ जागीं असेल तरच आमच्यासारख्यांच्या लीला निर्विघ्न चालायच्या; नाहीं तर काय?

मग राजाभाऊंला पुन्हां आपल्यांत आणायला करावें काय? युक्त्या पुष्कळ आहेत! पण ताबडतोब अमलांत कोणती आणावी? तापलेली कांच निवण्याकरितां घाईनें पाणी ओतलें तर निवायच्या ऐवजीं फुटाय-चीच! तेव्हां घाई करून उपयोगी नाहीं. चालू जमान्यांत कुठें कुणी-कडून बोट शिरकायला जागा आहे का? दौऱ्यांत, वहिनींच्या सहवासांत राजाभाऊ संतुष्ट असतात का असंतुष्ट? वहिनीसाहेबांपासून त्यांना त्रास होतो कीं नाहीं कसला? तसें कांहीं असलें तर तेवढा व्रण पाहून संधि साधून त्या व्रणाला टोंचण्याची कामगिरी करतां येईल म्हणून एकदां बाळक्याला मुद्दाम एका बाजूला गांठला. त्याच्याशीं गोड गोड बोललों. त्याच्या पाठीवर हात फिरविला. त्याला खूप चढविला. स्वतः सुपारी फोडून सुद्धां दिली आणि त्याच्याकडून सहज म्हणून काढून घेण्याचा प्रयत्न केला. त्याला विचारलें, "काय रे बाळक्या, दौऱ्यावर असतांना वहिनीसाहेबांचं राजाभाऊंशीं भांडण होतं का रे? त्या त्यांना त्रास देतात का? त्यांचा पाणउतारा करतात का कधीं?" त्याही लेकानं माझ्या प्रश्नांचीं उलट उत्तरं देऊन माझी निराशाच केली! माझ्या प्रश्नांच्या उत्तरांपैकीं एकही अपेक्षित उत्तर आलें नाहीं. उलट "दौऱ्यावर असतां वहिनीसाहेब राजाभाऊंना फारच चांगलं जपतात. त्यांना कोणताही त्रास होऊं देत नाहींत. कामें झालीं कीं स्वतः स्वयंपाक करून वाढूं लागतात. मला कांहींच करावें लागत नाहीं. वरवरचीं कामं तेवढीं मी करतों. बोलून, वागून, अर्ध्या वचनांत राहून वहिनीसाहेब राजाभाऊंच्या आतां चांगल्याच आवडत्या झाल्या आहेत! आणि साहेबही पण वहिनीसाहे-बांच्या शब्दाबाहेर जात नाहींत!—" हेंच त्या लेकानें मला सांगितलें! याची का मी अपेक्षा केली होती?

विचार करकरून अखेर मला मनाशीं असें ठरवावें लागलें कीं, सध्यांचा मामला अनुकूल कालाची वाट पहात बसण्याचा आहे. वेळ आल्याशिवाय कांहीं होत नाहीं. वहिनीसाहेबांनीं जंग जंग जरी पछाडले तरी राजाभाऊ कायमचे कांहीं त्यांच्या काबूंत राहणार नाहींत. त्यांचा स्वभावच तसा आहे. आज त्यांना कळणार नाहीं पण पुढें कळेल. आज त्यांचे दिवस आहेत. काय व्हायचें असेल ते चार दिवस होऊं द्या. तूर्त स्वतःला, चांदणीला, आणि गोपाळभय्यासारख्या प्रामाणिक माणसाला कसें संभाळून घ्यायचें एवढेंच पाहिलें पाहिजे. वेळ आली कीं, बत्ती लावायला तयार असलें म्हणजे झालें!

आज कांहींही आणि कसाही विचार करून पाहिला तरी राजाभाऊंच्या बाबतींत एकाद्या यक्षिणीनं कांडी फिरवल्याची गत झाली आहे यांत मुळीं संशय नाहीं. वहिनीसाहेबांशिवाय दुसरी यक्षिणी कोण असणार? राजाभाऊंवर त्यांनीं आपल्या सौंदर्याची मोहिनी घातली, ज्ञानाची छाप पाडली, सहवासानं आणि प्रेमाच्या जादूनं गुंगवून टाकलं हेंच खरें!

एका ' माणिक ' पुढें चांदणी निस्तेज ठरली! येसूनें यश गमावलें. अण्णा, तूं तर नादान झालास? माणिक खरेंखुरें अस्सल माणिक आहे का कृत्रिम आहे? अस्सल असेल तर आपला शेवटपर्यंत असाच नाइलाज होईल. नक्कल असेल-कृत्रिम असेल-तर राजाभाऊंवरील जादू फार काळ टिकणार नाहीं! माणिक अस्सल कीं नक्कल, हें एकदां कसोटीला लावलेंच पाहिजे. आपल्या सुखाकरितां—आपल्या इज्जतीकरितां—आपल्या चैनीकरितां हा उपद्व्याप केलाच पाहिजे. वहिनीसाहेबांनीं ओघ बदलला—यक्षिणीची कांडी फिरविली—तोच ओघ पुन्हां आपल्याला बदलतां आला पाहिजे-नाहीं तर काय अण्णाचें जिणें?

दिवसगत होत होती. राजाभाऊंचा आणि वहिनीसाहेबांचा कार्यक्रम धूमधडाक्यानें चालू झाला होता. गरीबांच्या—शेतकऱ्यांच्या—हितासाठीं उभयतां स्वतः हिंडूं लागले होते. कुठें शाळा स्थापन करायच्या, कुठें दवाखाना उघडायचा, कुठें पाण्याची व्यवस्था लावायची, कुठें वाहतुकीच्या साधनांची व्यवस्था करायची, कुठें हातमाग काढण्याची इच्छा असेल तर त्यांना मदतीचीं वचनें द्यायचीं—शेतीकडे व शेतींत राबणाऱ्या लोकांच्या

गरजांकडे कान देऊन आणि डोळे ताणन लक्ष द्यावयाचें–पहावयाचें—असेंच चाललें होतें, हेंच ऐकायला येत होतें.

श्रीमंतांना भिकेचे डोहाळे केव्हां केव्हां लागतात हें खरें; पण त्यांपैकीं आमचे राजाभाऊ नव्हेत, हें मी प्रथमपासून जाणून होतों. पण तशाही राजाभाऊंना वळविणाऱ्या सुशिक्षित वहिनीसाहेब भेटल्या ना? त्याच वहिनीसाहेब माहेरकडून श्रीमंत घराण्यांतल्या असत्या तर त्यांना भिकेच्या कल्पना सुचल्या नसत्या. सुचल्या असत्या तर त्या लगेच तशा तऱ्हेनें वागायला धजल्या नसत्या आणि त्यांनीं आपल्या श्रीमंत पतिराजांना तसें वागविलें नसतें! पण आमच्या वहिनीसाहेब मुळच्या गरीब आणि त्यांत सुशिक्षणाची भर पडलेली! म्हणून हें असें झालें होतें!

मला हें मुळींच आवडत नव्हतें. भयंकर संताप येत होता पण अनुकूल काळाची वाट पाहणें जरूर आहे हें मी स्वतःला सांगत होतों. चांदणीला, गोपाळभय्याला आणि आपल्या स्वार्थांतील लोकांना हेंच सांगत होतों.

रागाची तिडीक उठली म्हणजे असेंही मनांत येई कीं, तें कांहीं नाहीं, राजाभाऊंला यक्षिणीच्या कांडीच्या प्रभावांतून जागें करण्याकरितां गोपाळ-भय्याला आगाऊ धाडून, रात्रीं अपरात्रीं वाटेंत मोटार अडवून, यथेच्छ चौदावें रत्न दाखवावें आणि खुशाल घरीं अंथरुणावर लोळवावा म्हणजे दौरे–जादू–कार्यक्रम चटसारे बंद होतील!



# माणिकची मनोमंजूषा

## प्रकरण दहावें

### मैत्रिणींना पत्रें

तिकडच्या त्या एक दिवसाच्या आजारीपणाच्या वेळीं अशी एक वळ आली कीं देवाचं नांव घेऊन आणि जिवाचा धडा करून—जरा निर्भीड होऊन आणि लाज सोडून—त्या वेळेचा फायदा घेऊन मी तिकडे बरीच बोललें. गोड बोलून चिमटे घेतले! डोळयांत पाणी आणून तिकडच्या जीवाचं पाणी पाणी होतं का पाहिलं. रुसून, रागावून, हृदयाचा बालेकिल्ला अशा वेळीं तरी काबीज होतो आहे का पाहिलं. थोडं थोडं यश येत आहे असें वाटलं व धीर आला. आणखी आम्हां बायकांचीं शस्त्रास्त्रें पाजळन त्यांचा निकरानं उपयोग करून घेतला! हरिणीबद्दल, येसूबद्दल, तसंच ती कुणीशीशी—तिच्याबद्दल बोललें. बोललें, पण असं कीं तिकडे माझा राग तर येऊं नये पण अंजन मात्र डोळयांत झणझणीत पडावं. तिकडच्यापेक्षां शाळे-

तील चारदोन पुस्तकें मी जास्त वाचलीं असल्यामुळें त्याबद्दल तिकडच्या बोलण्यांत वरचेवर मी आपल्या शहाणपणाचा तोरा मिरवून तिकडे ओशाळायला लावीन कीं काय? अशा प्रकारचा ध्वनि येई, त्याचा मागमूसही आपल्या वागण्याबोलण्यांत येऊं द्यायचा नाहीं, तसा तिकडचा पाणउतारा होऊं द्यायचा नाहीं, असा मनाचा पक्का संकल्प केला होता व मी तशीच वागत होतें. त्यांत माझा आनंद होता, समाधान होतं आणि माझ्या नवसाला सध्यां जें पावलंसं वाटत होतं तें हेंच! तिकडच्यावर बौद्धिक विजय मिळविण्याची हाव माझ्या स्वप्नांत सुद्धां नव्हती. प्रेमाचा विजय मिळवावयाचा ही बुद्धि धरली होती! त्याला या एका क्षुल्लकशा प्रसंगानें फळ धरणार असं वाटूं लागलं होतं. माझ्या प्रेमाचा प्रभाव दिसूं लागला. त्यानंतर माझ्या कर्तबगारीला वाव मिळूं लागला. त्याचा तहानभूक हरविणारा आनंद मला झाल्याशिवाय कसा राहील? आणि तो माझा सात्त्विक आनंद मी माझ्या मैत्रिणींना—मित्रांना—आईबापांस—बहिणभावास कळवून वाढीस लावल्या-शिवाय कशी राहीन!

आज तशींच कांहीं पत्रें लिहावयाचा विचार होता. आम्हीं दौऱ्यावरून कालच आलों होतों आणखी चारपांच दिवस पुढें जाणार नव्हतों. तसं विशेष कामच नव्हतं म्हणून पत्र लिहावयाचं ठरविलं होतं; त्याच तयारींत होतें. तिकडची अजून झोंप संपायचीच होती. मी तरी झोंपमोड कशाला करूं म्हणन स्वस्थ होतें. झोंप संपेल मग प्रातर्विधि आटोपतील, त्याला चांगले दीडदोन तास लागतील तोंपर्यंत एक दोन पत्रें मी सहज लिहीन अशी खात्री होती. आमचे दौरे सुरू झाल्यापासून, तिकडचा चहा, तिकडचं जेवायचं, तिकडचे कपडे काढणं—ठेवणं हें मी माझ्याकडे मुद्दाम घेतलं होतं. तिकडे तें हवंसंही झालं होतं. घरांत आल्यावर दुसऱ्यांनीं केलें असतं तरी चाललं असतं—होतीं पुष्कळ नोकरमंडळी पण माझं मीच तें करीत असें. कोणाही नोकरावर सोंपवायचं नाहीं कीं कुणावर विसंबून राहयचं नाहीं असं मी निश्चित ठरविलं होतं.

पत्रें लिहायला बसायच्या अगोदर टपाल आलं तें एक बरंच झालं. पत्र वाचून मगच पत्रें लिहायला बसावं म्हणून मी अगोदर पत्रं वाचायला घेतलीं. आलेल्या पत्रांत माहेरचं एक होतं. गोड घांस म्हणून मी तें शेवटीं

वाचण्याकरितां म्हणून ठेवून दिलं. एक दोन पत्रं अनपेक्षित व किरकोळच होतीं; दोन मैत्रिणींची—माझ्या पत्रांचीं उत्तरेंच —होतीं. अर्थात् दोन्हीं पत्रांत माझी — माझ्या कामाची यथास्थित स्तुतिच होती. त्याकरितांच हा सारा व्याप होता ! मैत्रिणींचीं स्तुतीपर पत्रं आलीं म्हणजे जीवाला धन्यता वाटे व अंगावर मूठभर मांस चढे !

एका मैत्रिणीनें ' अशींच वरचेवर पत्रं पाठवून तुझ्या कार्याची प्रगति कळवीत जा. तुझ्या कार्यांत ईश्वर तुला यश देईल ' असं कळकळीनंच लिहिलं होतं तर दुसरीनं आणखी बरेंच लिहिलं होतं. तिला आमच्या दौऱ्यांतल्या बारीक सारीक गोष्टी देखील कळाव्यात अशी इच्छा होती. चांगलं–वाईट, वाटेंतील गंमती, खेड्यांतले लोक—त्यांच्या गंमती–त्यापासून होणारीं दुःख–सुखं, वगैरे कळविण्याविषयीं त्या मैत्रिणीनं घायकुतीला येऊन लिहिलं होतं. तिला सविस्तर पत्र लिहून कळवायचं म्हणून मीही योजना केलीच होती ! पत्रं पाठवायचीं. आपलं कोणतं चूक, कोणतं बरोबर हें त्यांना विचारयचं; त्यांच्या सूचना वारंवार मागवावयाच्या व त्यांचा सांगोपांग विचार करावयाचा असें मी मनाशीं ठरविलें होतें.

माझ्या मैत्रिणींचीं तर पत्रं आलींच होतीं—येतही होतीं पण विशेष आश्चर्याची—पण तितकीच आनंदाची—गोष्ट म्हणजे मनोहराची देखील दोन पत्रं आलीं होतीं. माझ्या नव्या कार्याची बातमी त्याला माझ्या माहेरीं कळली. त्याला अत्यंत आनंद झाला. आमच्या घरीं येऊन जेवून गेला त्या वेळीं एक अक्षरही आम्हांला एकमेकांशीं बोलायला झालं नाहीं. माझी कल्पना होती कीं तो आमच्या येथून ज्या मनाच्या विशिष्ट मनःस्थितींत बाहेर पडला तो, आम्हांला—आमच्या घराला–घरांतील माणसांना–मला देखील शिव्या देत असेल–नांवें ठेवीत असेल–कधीं संबंधही असल्याशीं नको असा निश्चयही करून असेल–आणि तो तसा करता वागता तर त्याला बोलायला मला तोंडच नव्हतं ! पण तसं कांहीं एक न करतां, त्यानं माझ्या कार्याचं अभिनंदन केलं होतं, माझ्या कार्याला शुभाशीर्वाद दिला होता, चिरकालीन यश चिंतिलं होतं. एका पत्रांत त्यानें असं आश्चर्य प्रकट केलं होतं कीं आजकालचे इनामदार सत्कार्याला जुंपणं म्हणजे सूर्याला पश्चिमेला उगवावयाला लावण्याइतकंच अशक्य आहे ! तें तूं कसं केलंस,

याबद्दल तुझं अभिनंदन करावं तितकं थोडं आहे, धन्यवाद द्यावेत तितके अपुरेच पडतील-असें म्हणून आपल्या निर्मळ मनाचा दाखला पटविला होता!

अशा चोहींकडच्या उत्साहपूर्ण वातावरणामुळें माझ्या दृष्टीला जग जसं कांहीं नवंच दिसायला लागलं. आनंद, उत्साह, चैतन्य याचाच चोहींकडे संचार आहेसा वाटत होता. मला पैशाला कमी नव्हतं, त्याचा मना-सारखा खर्च करण्याची स्थिति आली होती. सर्वांत महत्त्वाची गोष्ट तिक-डून अगदीं माझ्या मुठींत यायचं झालं होतं, असं दिसत होतं! याहून आम्हीं स्त्रियांनीं, सौख्याचं, ऐश्वर्याचं, आनंदाचं शिखर गांठायचं तें कोणतं?

माझ्या अंगांत, त्या सर्व तऱ्हेचं वारं शिरलं होतं. त्याच भरांत मी हिंडत फिरत होतें, वागतसवरत होतें. सासूबाई माझ्याकडे अभिमानानं पहात होत्या, मला बरं म्हणूं लागल्या होत्या. दादासाहेबसुद्धां—सहसा कुणाला चांगलं न म्हणणारे—सुनबाईचं कौतुक प्रसंगीं करीत होते मग मला काय उणं होतं?

वाईट दिवस गेले, खडतर संपलं, आतां त्याचं पुन्हां जन्मांत दर्शन व्हायची भीतिच नाहीं. आतां आपण, आपलं कार्य आणि कृतकार्याचा आनंद असंच मला वाटायला लागलं होतं! दिवसांतून हें कितीदां तरी असं मनांत येई. स्वस्थ बसलें असलें कीं तशा विचारांची किती जलद धांवपळ आणि गर्दी सुरू होई म्हणतां? मला ती प्रयासानंच थांबवावी लागे. दुसऱ्या कसल्या तरी विचारांत मन गुंतवावं लागे. आनंददायक विचारांचा अतिरेकसुद्धां डोक्याला त्रासदायकच होतो. आज देखील मला असंच झालं होतं पण मी प्रयासानं माझ्या मनाला ताळ्यावर आणलं. 'अशा नुसत्या विचारांतच गुरफटून बसलें तर हातचीं कामं कशीं व्हायचीं?' असं मी मनाला वरचेवर खडसावी तसंच आजही केलं. झड-झडून उठलें, लिहायच्या जागेकडे गेलें, सगळ्या पत्रांवरून पुन्हां एकदां नजर फिरविली. कुणाकुणाला काय काय, कशीं कशीं उत्तरं लिहायचीं हें ठरविलं आणि लिहावयास बसलें. लिहायला बसतांना तिकडची उठायची वेळ झाली कीं काय म्हणून एकदां पलंगाकडे पाहिलं, तों या कुशीवरून त्या कुशीवर वळायचं झालं; तितक्यांत उठायचं होईल असं दिसलं नाहीं, तेव्हां मग लिहावयाला बसलें. मनोहराच्या पत्राचं उत्तर लिहिलं. त्याचं पत्र

लहानच होतं. मी पण उत्तर तसंच लिहिलं 'माझ्या कार्यांत मी काय काय करायला पाहिजे, काय काय नको?' असं मी मागल्या पत्रांत विचारलं त्याला त्याच्या उत्तरांत 'असल्या गोष्टी मनुष्य पत्रांत किती म्हणून लिहील? त्याला समक्षच भेटायला हवं, चर्चेकरितां बराच वेळ घालविला पाहिजे. सध्यां तुमचं चाललं आहे तें उत्तमच आहे. जेव्हां समक्ष गांठी-भेटीचा योग येईल तेव्हां व बराच वेळ बोलायबसायला मिळेल त्यावेळीं पाहूं. पत्रांत जास्त लिहितां येणें शक्य नाहीं. शिवाय अभ्यासामुळें मला तितकासा वेळही नाहीं—' असं लिहून आलं होतं. त्याचं म्हणणं खरं होतं पण मला त्याचं काय होय? उलट उत्तरांत " भेट झाल्यावर बोलूं पण भेट होणार केव्हां? भेटीची वेळ मुद्दाम आणली तर ना? नुसतं जेऊन न भेटतांच परस्पर चालतं झालं, मुद्दामच तसं ठरवलं तर भेट एका युगांत तरी होईल का?' असं मी जाणूनबुजूनच खोडसाळपणानं लिहून मनोहराची जरा गंमतच केली. स्वतःचं मन आनंदांत असलं म्हणजे दुसऱ्याला असं सहज चिमटे घेणं मोठं गमतीचंच वाटतं! मनोहराच्या पत्राला उत्तर लिहितांना देखील हें असें माझ्या मनांत येऊन गेल्याशिवाय राहिलें नाहीं.

त्यानंतर मी माझ्या दुसऱ्या एका मैत्रिणीला गंभीरपणानं पत्र लिहावयाला बसलें. पत्र चांगलं सविस्तर लिहावयाचं होतं. तिच्या बऱ्याचशा प्रश्नांचीं उत्तरं लिहायचीं होतींच पण आमच्या कालच्या दौऱ्यांतील विशेष गोष्टी तिला लिहून कळवायच्या होत्या म्हणून मी संगतवार मनाशींच अगोदर थोडा वेळ पत्र जुळवीत बसलें. मध्येंच दार उघडलें गेलें व दारांत अण्णा व गोपाळभय्या दिसले. त्यांना पाहून कांहीं विचारायच्या आंतच गोपाळभय्या दारांतून परत गेला. अण्णा आंत आला म्हणून 'काय आहे?' एवढेंच मी त्याला विचारलें. त्याच्याकडून 'कांहीं नाहीं उगीच' इतकंच उत्तर मिळालं व पलीकडच्या बाजूला असलेल्या खुर्चीवर जाऊन तो मुकाट्यानें बसला. शेचारचं एक वर्तमानपत्र त्यानें आपल्या तोंडापुढें धरलें. 'बसेना का, मला काय करायचं आहे त्याच्याशीं' असं कांहीं तरी त्याच्याबद्दल माझ्या मनांत तितक्यांत आलं आणि गेलं. मग त्याच्याकडे मी पुन्हां पाहिलंही नाहीं. मी मुकाट्यानें पत्र लिहावयालाच आरंभ केला—

॥ श्री ॥

प्रिय मैत्रिण शकुंतला ईस प्रेमपूर्वक नमस्कार वि. वि.—

तुझं पत्र आजच मिळालं. कालच्या पत्राचें उत्तर लिहिण्याच्या तयारींत मी आज होतें तोंच दुसरें हें तुझें पत्र आलें. माझ्या नव्या कार्याची सविस्तर हकीकत ऐकायला तूं इतकी उत्सुक आहेस हें वाचून किती आनंद होतो म्हणून लिहूं? कोण ग इतकं नाहीं तर विचारणार नी चौकशी करणार? कार्याचं कौतुक करायचं तर बाजूलाच राहूं दे, उलट सुरवातीला हेटाळणी काय करतात, टर काय उडवतात, मोडता काय घालतात—कांहीं पुसूं नकोस! आमच्या कार्याचा आरंभ तर पुष्कळांना हास्यास्पदच वाटला! पहिल्यापहिल्यांदा असं फार झालं. सुरवातीला तर एकीकडे उत्सुकता आणि दुसरीकडे भीति यांत माझी नुसती त्रेधा उडे! तिकडचे कान केव्हां, कोण, कुठें, कसे भरवील नी तिकडचं मन केव्हां कसं फिरेल आणि मूळपदावर जाईल याची सारखी धास्ती होती. अजूनही ती थोडी थोडी वाटतच असते, नाहीं असं नाहीं. तिकडचं मन दौऱ्यावर असतांना मध्येंच चलबिचल होई. वाटेंतून उगीचच परत फिरायची तिकडे लहर लागे. 'नाहीं जायचं पुढें! करायचं काय मला हा व्याप करून? जातील दादासाहेब नाहीं तर धाडूं बाळक्यालाच!' असं म्हणायचं होई. मध्येंच वाटेंत कुठें मोटार बिघडली, एवढं मताच्या विरुद्ध झालं कीं लगेच माझ्यावर उसळायचं होई. 'प्राण गेला तरी बायकांचं ऐकूं नये म्हणतात असें पूर्वीचे लोक सांगत आले तें कांहीं खोटं नाहीं!' असं म्हणायचं होई. वाटेंत पाऊस आला तरी त्याचा दोष सुद्धां माझ्यावरच यायचा! पण मी तितक्याला तोंड देई! उलट उत्तर द्यायचं नाहीं, तिकडे दुखवायचं नाहीं, आपला तर मुद्दा सोडायचा नाहीं, आपलं तें खरं करायचं, अस्सं मी चालविलं. असं करतांना स्वतःला त्रास होतो. केव्हां केव्हां त्रास असह्य झाला म्हणजे तें कुठें जाणंही नको नी तो त्रासही नको असं वाटतं. पण लगेच मनांत येतं कीं मी अशी कंटाळलेलें तिकडे दिसलें, तर साराच कायमचा कारभार आटपायचा. शिकलेल्या मुली नुसत्या पोषाखीच असतात, चिकाटी धरून त्यांच्या

हातून कोणतींच चांगलीं कामं व्हायचीं नाहींत कधीं, असा सध्यां जो बभ्रा आहे तो खराच ठरायचा! म्हणून माझ्या जीवाचं मी रान करतें-तिकडच्या साऱ्या लहरी संभाळते पण शेवटीं माझं म्हणणं शेवटाला नेतें म्हणून सारं हें चाललं आहे! तिकडच्या लहरीला संभाळण्या-करितां आम्हीं केव्हां केव्हां गांवाला जातांना अर्ध्या वाटेंतून परत देखील आतांपर्यंत एक दोन वेळां आलों आहोंत. आज नाहीं तर नाहीं, आजच्च काय नडलंय-पुन्हां दोन दिवसांनीं तिकडे जाऊं, आजच्च त्या गावचीं शेतं नी शेतकरी कुठें निघून जात नाहींत कीं शेती डुबत नाहीं—शेतकरी मरत नाहींत! असं धीरानं म्हणून मी परत आलें आहे. मी तिकडची लहर संभाळली कीं दुसऱ्या वेळीं माझी लहर संभाळायचं होतं. 'चल तुझ्या मनासारखं होऊं दे. तुझं आणखी हें नको!' असं म्हणून मी म्हणेन तसें वागायचं होतं!

याशिवाय तिकडच्याशीं वागतांना मी आणखी एक खबरदारी सदोदित घेत असतें बरं का? स्वारीचं उणं कधीं देखत किंवा मागें काढायचं नाहीं, त्याचं चर्वितचर्वण करीत बसत नाहीं, तेंच तेंच उगा-ळीत बसत नाहीं. कांहीं थोडं चांगलं झालं कीं 'हें आपण असायचं होतं म्हणून झालं. अशानंच आपल्याबद्दलचा असा आदर वाटेल, वाढेल मंडळींत;' असं जेव्हांच्या तेव्हां सांगून मोकळं व्हायचं. या वागण्याचा अनुकूल परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं हो!

शकू, असं चालविलं आहे मी! म्हणून माझ्या कार्यांत मना-सारखं यश मिळूं लागलं आहे बरं का! अग, आपण शिकलेल्या मुली जिथें जाऊं तिथें आपल्या ज्ञानाचा प्रभाव दाखवूंच दाखवूं; हें तुझें नेहमीचं बोलणं मी माझ्यापुरतं तरी खरं करूं लागलें आहे! याचा मला आनंद होतो तसाच तुलाही नाहीं का होणार? झालाच पाहिजे. म्हणूनच तर इतकं हें तुला विस्तारानं लिहावयाला बसलें आहे. मी वागतें कशी, वागवतें कशी आणि त्याबद्दल माझ्या मनाला कसं काय वाटत असतं हें लागोपाठ दोन्ही पत्रांत तूं विचारलंस म्हणून मीही पण लिहिलं. आतां मला दुसरीं आणखी पत्रें लिहायचीं आहेत, म्हणून तुझं हें पत्र येथेंच पुरें करतें—

पत्रावर सही केली, शाई टिपली. पाकिटांत घालून बंद करून त्यावर शकूचा पत्ता लिहून तें पत्र मी हातावेगळं केलें; मग वत्सलेच्या पत्राचें उत्तर लिहायला घेतलं. वत्सलेला माझ्या शहाणपणाबद्दल पहिल्यापासून मोठा विश्वास! मला जास्त कळतं, मी म्हणेन ती सर्वांनीं पूर्व दिशा मानली पाहिजे असं तिला वाटे. तिनं पत्रांत माझ्यावर स्तुतीचा नुसता वर्षाव केला होता. मी खेड्यांत गेल्यावर काय बोलतें, कशी बोलतें, माझ्या बोलण्याची छाप लोकांच्यावर कशी पडते? आमच्या बोलण्याचा लोक सत्कार कसा काय करतात वगैरे वगैरे हकीगत वत्सलेनें मला अगदीं मोठ्या अगत्यानें विचारली होती.

मी कार्याला बाहेर पडतांना माझी मनांतली पहिली समजूत अशी वत्सलेसारखीच होती. पण कल्पना आणि वस्तुस्थिती यांत महदंतर असतं हें दौऱ्यावर असतांना ठिकठिकाणीं मला अनुभवानंच कळलं होतं. आम्हीं कितीही नाहीं म्हटलं तरी ज्या ज्या ठिकाणीं आम्हीं जात असूं, त्या त्या ठिकाणीं आमचा बहुतेक काळ त्या त्या ठिकाणच्या लोकांनीं केलेल्या आदरसत्कारांतच जात असे. खरी वस्तुस्थिति पहायला, अनुभवायला, त्यावर चर्चा करायला वेळच मिळत नसे. मी बायका जमवून माझे विचार त्यांच्यापुढें मांडीं, पण कांहीं केल्या माझं समाधानच होत नसे. त्या गांवांतलीं चार माणसं तिकडच्यासमोर येत, पण त्यांचं एकमेकांशीं औपचारिक, अदबीचं नी त्रोटकच बोलणं होई! मुख्य मुद्दा निघायचाच नाहीं व ते लोक समोर बोलायचं कसं म्हणून धाडस करायचे नाहींत असें माझ्या अनुभवाला येई. आम्ही दौरे काढतों, आमच्या इनाम गांवच्या सर्व खेड्यांना जात असतों हें एक सुख वाटे तरी तिथल्या केल्या कार्यानें अपेक्षेइतकं समाधान होत नसे. त्याचं कारणही कळत नसे. त्यामुळें मनाला रुखरुख लागायची पण तें बोलायची चोरी. बोललं कीं सर्वच थांबायचं, ही भीति असे ना?

वत्सलेच्या पत्राला उत्तर देण्याच्या वेळीं तें असमाधान तीव्रतेनें जाणवे! पण आमचं दौऱ्यांत असतांना चुके कुठें आणि रुखरुख कां लागे याचा नुकताच एका खेड्यांत उलगडा झाला होता. तीच हकीकत मी वत्सलेला आज लिहिणार होतें—लगेच लिहिलीही. तिला लिहिलें—

॥ श्री ॥

प्रिय मैत्रिण वत्सला ईस सप्रेम नमस्कार वि. वि.—

वत्से, माझ्या कार्याच्या औत्सुक्याचं आणि औचित्याचं तूं कौतुक केलंस तें बरोबर ! पण माझ्या सर्वज्ञतेचं आणि त्याच्यावरील प्रभुत्वाचं गुणगान केलंस हें मात्र चूक ! तुझ्यासारखीच माझी समजूत होती पण अनुभवानें ती फोल ठरली. कालचीच गंमत तुला कळवतें म्हणजे मी हें कां म्हणालें तें तुला कळेल. आम्हीं आमच्या एका खेड्याला निघालों होतों. तिथं गेल्यावर आमचा ठराविकच कार्यक्रम होता. जायचं, बायका पुरुष जमवावयाचे, त्यांच्यापुढें उपदेशानं भरलेली व्याख्यानं द्यावयाचीं, त्यांचा आदरसत्कार स्वीकारायचा आणि पुष्प-हार गळ्यांत घालून मोटारींतून डौलानं परत यायचं हाच तो कार्य-क्रम. त्याकरितांच आम्हीं निघालों. जातांना वाटेंत एक खेडं लागलं. आमच्या ड्रायव्हरनें एंजीनमध्यें पाणी घालण्याकरितां त्या गांवच्या धर्मशाळेपुढें गाडी सहज उभी केली. गांव अगदीं लहान होता. धर्म-शाळेसमोरून सरळ समोर रस्ता गेला होता. धर्मशाळा या टोकाला तर दुसरें टोक समोर दिसत होतं. बहुतेक घरें रस्त्याच्या दोहीं बाजूस दिसलीं. एका बाजूला बहुतेक घरांच्या पाठी आलेल्या तर दुसऱ्या बाजूस घरांचीं तोंडेंच ! सडक व घरें वेडीवांकडी पण स्वच्छ दिसत होतीं. धर्मशाळाही स्वच्छ होती. पलीकडे कसलेंसें देऊळ, त्यापुढें चांगलें स्वच्छ पटांगण व समोर पार होता. पारावर लिंबाचं झाड होतें. जवळूनच कुठूनसा मुलांचा कलकलाट ऐकूं येत होता त्या-वरून तिथें शाळाही असावी असें वाटलें. माणसांची फारशी वर्दळ दिसली नाहीं. गुराखी गाई म्हशी वगैरे धर्मशाळेवरूनच हांकून नेत होते. रानांत गुरें जायचीच ती वेळ होती. कांहीं मुलें, फाटकीं तुटकीं अंगरखीं घातलेलीं—केस वाढलेलीं—हातांत चांदीचीं कडी व पायांत चांदीचे वाळे घातलेलीं—मातींत लोळलेलीं अशीं—आमच्या मोटारीच्या आंवतीभोंवतीं गंमत पहायला जमलींच होतीं. साधारण निर्मनुष्य म्हणून गांव उदासही भासत होता. तर स्वच्छता, आणि होता त्यांत टापटीपीचा म्हणून रम्यही दिसत होता. त्या गांवाविषयीं उगीचच

मला उत्सुकता वाटूं लागली. कुणी भेटलं तर गांवाची चौकशी करावी असं सुद्धां वाटूं लागलं. मोटार पहायला जमलेल्या चार अजाण मुलांजवळ कसली चौकशी करायची? त्यांना कळणार काय? आणि ते सांगणार काय? ज्यांना विचारतां येईल असे एक दोन गुरांमागचे गराखी होते पण त्यांचीं गुरें पुढें चाललीं होतीं. ते आपल्या गुरांना आंवरण्याचा आणि घरोघरचीं दावणीचीं गुरें सोडून आणण्याच्याच धांदलींत दिसले. मग ते थांबणार कसे आणि त्यांना आपल्या उत्सुकतेकरितां थांबवायचे कसे?

मी आपली तशीच उत्सुकतेनें इकडे तिकडे पहात राहिलें. आमच्या ड्रायव्हरचें इंजिनांत पाणी घालून झालें होतें. त्यानें पेट्रोल किती आहे तें पाहिलें. मोटारीखालीं वांकून, मागेंपुढें डोकावून इंजीनवरची दोही बाजूंचीं झांकणं उघडून पंखा, वायर्स, नट्स् वगैरे जिथल्या तिथें व्यवस्थित आहेत कीं नाहींत हें लक्षपूर्वक पाहून, मोटार सुरूं करण्याकरितां त्यानें लोखंडी दांडा हातीं घेतला. तिकडूनही जरा कंटाळून 'चल रे लौकर आटप. आपल्याला अजून बरंच दूर जायचं आहे. इथंच जर इतकं ऊन झालं तर पोंचायला वेळ किती होईल–' असं त्रासूनच म्हणायचं झालं. मोटार सुरूं होणार इतक्यांत किनई वत्से–

---

# प्रकरण अकरावें

## कुलकर्णी मास्तर

समोरच्या देवळांतून अंगांत एक खादीचा लांब सद्रा, पायांत खडावा, डोकीला पांढरी स्वच्छ खादीची गांधी टोपी असलेले, असे एक किडकिडीत उंचेलेसे गृहस्थ बाहेर पडून देवळाच्या पटांगणांतून आमच्या मोटारीकडे पहात पहात चालले होते. मीं त्यांना पाहिलं. त्यांनींही मला पाहिलं. त्यांनीं मला ओळखलं, तसे त्यांचे पाय आपोआपच आमच्या मोटारीकडे वळले. अगदीं जवळ येतांच मीं त्यांना ओळखलं!

" ओहो, कोण ? माणिक ! अन् तूं इकडे कुठें ?—"

" अगबाई ! कुलकर्णी मास्तर !—" मी उद्गारलें !

गाडी सुरू होत होती ती थांबविली व कुलकर्णी मास्तरांना गाडींतून उतरून मीं नमस्कार केला ! वत्से, आपल्याला पुण्याला शाळेंत शिकवायला होते ते कुलकर्णी मास्तर होते ते ! मीं तिकडे कुलकर्णी मास्तरांची अगदीं थोडक्यांत ओळख करून दिली. माझ्या बोलण्याच्या तऱ्हेवरून नी वागण्याच्या प्रकारावरून कुलकर्णी मास्तरांना आम्हां उभयतांबद्दल बोलून ओळख करून देण्याची आवश्यकता उरली नाहीं. तेवढ्यांत त्यांनीं आमची पूसतपास केली. दौऱ्याचा हेतू विचारला. तुझी व आपल्या शकूची पण आठवण आणि चौकशी केली. मी पण थोडक्यांत त्यांना सारं सांगितलं. कुलकर्णी मास्तरांचंच तें खेडं होतं. पुणें सोडल्यापासून ते आपल्या खेड्यालाच रहात आहेत. आमच्या दौऱ्याचा उद्देश त्यांना कळल्यावर, ते आम्हांला तसेंच सोडणार थोडेच ? ' जर आपण खेडींच पहायला निघाला आहांत तर थोडा वेळ खोळंबा करून आमचं खेडं पहा, ' असं ते म्हणालेच. या खेड्याला काय पहायचं असं म्हणायची सोय नव्हती ! शिवाय कुलकर्णी मास्तरांना नाहीं कसं म्हणायचं ? मी जरा पंचायतींत पडलेली पाहून कुलकर्णी मास्तरच म्हणाले, ' तुम्हांला इतकी पंचाईत नको पडायला ! मी कांहीं तुम्हांला मुक्काम करा म्हणत नाहीं ! अहो मुक्काम करण्यासारखं आहे काय खेड्यांत आणि तुमच्यासारख्या श्रीमंतांची मनासारखी सरबराई करायला त्राण कुठें आहे आमच्यांत ? आला आहांत, खेडं वाटेवर आहे, दोन घटका विश्रांति समजा वाटेंत. तुमच्या लोकांना तुम्ही चार शब्द सांगायला निघाला आहांत त्यांतलेच दोन शब्द आमच्या खेड्याच्या अडाणी लोकांच्या कानावर घाला. '

मला उद्देशून आणि तिकडेही उद्देशून कुलकर्णी मास्तर बोलले. मीं तिकडे सहेतुक पाहिलें. कुलकर्णी मास्तरांच्या विनंतीला मान द्यायचा तिकडच्याही मनांत आलें. मुक्काम्यानं मोटारच्या बाहेर यायचं झालं ! कुलकर्णी मास्तरांनीं चालविलेली प्राथमिक शाळा पाहिली. तालीम बांधलेली दाखविली. तिचं नांव त्यांनीं बजरंग–संस्था म्हणून सांगितलं.

बजरंग संस्थेच्या उद्देशांत काय काय गोवलं आहे हें थोडक्यांत सांगितलं. बोलत बोलत त्यांनीं आपल्या घरीं आम्हांला नेलंच ! कलकर्णी मास्तरांच्या घरीं जाण्यांत मलाही एक प्रकारची गमत वाटली. त्यांच्याशीं बोलण्यांत दंग झाल्यामुळें त्यांच्या पडक्या घराकडे माझं लक्षच गेलं नाहीं. त्यांच्या बजरंग संस्थेच्या नांवावर येणारीं 'केसरी,' 'नवा काळ,' 'ज्ञानप्रकाश,' 'विविधवृत्त,' 'समर्थ,' 'ऐक्य' हीं वर्तमानपत्रें फाईल करून ठेविलेलीं पाहिलीं. 'मासिक मनोरंजन, 'विविधज्ञानविस्तार,' 'रत्नाकर,' 'यशवंत,' 'वागीश्वरी' 'चित्रमय जगत्' हीं मासिकें आणि आणखी किती तरी दुसरींही पुस्तकें मी तिथें पाहिलीं. मी आश्चर्यानें थक्कच झालें! एवढ्याशा खेड्यांत आणि अशीं वर्तमानपत्रें व मासिकें ! पण हें सर्व कुलकर्णी मास्तरांच्यामुळें हें लक्षांत येऊन मी गप्प बसलें. कौतुक वाटलें. 'हें सर्व आपल्या खेड्यांत वाचायला वाचक आहेत?' म्हणून मीं कुलकर्णी मास्तरांना विचारलें! ते हंसले. त्यांच्या नुसत्या हंसण्यानेंच मी मूर्खांत निघालें. हिंदुस्थानांतल्या एवढ्याशा खेड्यांत इतकीं वर्तमानपत्रें व मासिकें वाचणारे भाराभर वाचक मिळाले कीं झालेंच! कुलकर्णी मास्तर वाचीत असले पाहिजेत व त्याचा योग्य तो उपयोग आपल्या खेड्यांतल्या लोकांना वेळ प्रसंगीं करून देत असले पाहिजेत हें मला पटलें. मीही हंसलें. मी हंसलें तें पाहून कुलकर्णी मास्तरही हंसले. नाहीं म्हटलें तरी त्यांच्याकडे आम्हांला थोडासा उपहारही घ्यावा लागला! कुलकर्णी मास्तर तिकडेही बोलत होतेच. 'आपण आरंभिलेला उद्योग स्तुत्य आहे. आपल्यासारख्यांनीं असें मनांत आणलें तरच खेड्यापाड्यांचा तरणोपाय आहे. हिंदुस्थान जसं साऱ्या जगाचं जीवन आहे. तसंच हिंदुस्थानांतलीं खेडीं हिंदुस्थानचें जीवन आहेत!' खेडीं आणि शेती म्हणजे धन्याला दररोज सोन्याचें अंडें देणारी कोंबडी आहे हें कुलकर्णी मास्तर मोठ्या हौसेनें आणि अभिमानानें सांगत होते. 'पण जग हिंदुस्थानाला खायला बसलें आहे आणि हिंदुस्थान आपल्या खेड्यांना खायला टपलं आहे!' अशीही वस्तुस्थिति सांगायला त्यांनीं कमी केलं नाहीं. तसंच बोलतां बोलतां 'नुसते दौरे

काढून आणि क्षणभर व्याख्यानबाजी करून गेल्यानें खेड्यापाड्यांची आशा कोणीं धरूं नये; त्याबरोबरच खेड्यांच्या सुधारणा करायला परक्या ठिकाणचा शहाणाही चालायचा नाहीं. ज्या खेड्याचा त्या खेड्यांतला शहाणा निपजला, तो तेथेंच टिकून खेड्यांतच निःस्वार्थबुद्धीनें मिळून मिसळून वागला, तरच खेड्यांची सुधारणा व सुस्थिति शक्य आहे' असें सांगायलाही कुलकर्णी मास्तर कचरले नाहींत! कित्येक वर्षांचा आपल्या खेड्याचा अनुभव ते मधून मधून सांगत होते.

कुलकर्णी मास्तरांच्याविषयीं आदर असल्यामुळें मला त्यांचं बोलणं पटत होतं—उमजत होतं—ऐकावंसंही वाटत होतं. माझी चूक मला कुलकर्णी मास्तरांच्या अनुभवाच्या बोलण्यानं कळत होती. रुखरुख कां लागत असे याचा प्रकाश मनांत पडत होता म्हणून मी कान देऊन ऐकत होतें. पण कां कोण जाणे कुलकर्णी मास्तरांच्याकडे फार वेळ बसणं तिकडे बरं वाटत नसावं असं मला मध्येंच एकदां वाटलं. इतक्या गरीबांच्या घरीं बसायची तिकडे संवय नव्हती. पूर्वी असली तरी ती आतां मोडली होती; तरी पण कुलकर्णी मास्तरांशीं तिकडून बोलायचं होतंच होतं.

मध्यें थोडा वेळ गेला. जायला निघावं असें मनांत आलं, तोंच कुलकर्णी मास्तरांना बोलवायला एक माणूस आला. कुलकर्णी मास्त-रांकडे आम्ही गेलों त्या वेळीं एकदां कुठें तरी जवळपास शिंग वाज-ल्याचं ऐकायला आलं होतं. कां वाजलं हें आतां आम्हांला मास्तरांना बोलवायला आणि 'देवळाच्या पारासमोर माणसें जमलीं आहेत चला तिकडे' असं सांगायला माणूस आला त्यावेळीं मला कळलं. गांवांतल्या मंडळींना विशेष प्रसंगीं एकत्र जमविण्याकरितां शिंग वाजवून इषारा देण्याची व्यवस्था मास्तरांनीं केली होती व ती शिस्त गांवच्या लोकांनीं कडक रीतीनें पाळली होती हें पाहून आम्हीं आश्चर्यानें थक्कच झालों!

आम्ही देवळासमोरच्या पाराकडे गेलों. पारावर तात्पुरतीं बुरणुसें आणि घोंगड्या अंथरून बैठक घातली होती. पारासभोंवतीं लहान-मोठ्या माणसांचा हां हां म्हणतां केवढा तरी घोळका जमला! इषा-

त्याचें शिंग ऐकतांच शेतांत काम करीत असलेलीं माणसं हातांतलं काम टाकून तशींच धांवत आलीं होतीं. कामाचीं आयुधें कित्येकांच्या हातांत तशींच होतीं !

आम्हीं पारावरच्या बैठकीवर जाऊन विराजमान झालों. जातांना वाटेंतच कुलकर्णी मास्तरांनीं सांगितलें कीं, आमच्या लोकांना मी आपली ओळख करून देईन. आपल्या कार्याची कल्पना सांगून आपल्या कार्याला आम्हीं शुभ यश चिंतूं आणि मग आपल्यास वाट-ल्यास आपण उभयतांनीं चार शब्द आमच्या लोकांस अवश्य सांगावेत !

कुलकर्णी मास्तर बोलायला उभे राहिले, त्याचं बोलणं सुरू झालं. ते आपल्या लोकांना काय सांगतात यापेक्षां कसं सांगतात, किती सोप्या भाषेंत सांगतात, त्यांच्या सांगण्यांत व त्याच तऱ्हेच्या आमच्या लोकां-पुढें आम्हीं बोलत होतों त्यांत काय फरक होता हें मी पहात होतें. ते अगदीं साधं बोलत होते, सोपे शब्द वापरीत होते, आणि मुद्द्याला गांठ घालीत होते. तें ऐकूं लागलें तेव्हां आपल्याला तसं बोलतां येत नाहीं, त्यांच्या बोलण्यांतली कळकळ आणि तळमळ आपल्या बोलण्यांत नसते हें मला स्पष्ट दिसूं लागलं. आज त्यांचें व्याख्यान ऐकून, खेड्यांत व्याख्यान कसं द्यावं, खेड्याकडे पाहण्याचा दृष्टिकोण कसा ठेवावा हें मी शिकलें. माझी चूक मला उमगली. रुखरुख कां लागत असे हें कळलं. परोपदेशे पांडित्य करून मनाचं समाधान कसं होणार? दग-ड्याला आजार आणि धोंड्याला औषध पाजून काय होणार? खेड्यांच्या लोकांना पाहिजे असतं एक आणि आपण त्यांच्या माथीं मारीत असतों भलतेंच, तें परिणामकारक कसं होणार !

पहिल्यांदा तितकंसं कांहीं थांबायचं माझ्या मनांत नव्हतं पण आतां थांबल्यावर—कुळकर्णी मास्तरांचं व्याख्यान ऐकल्यावर—थांबलों हेंच चांगलं झालं; जसं कांहीं कुलकर्णी मास्तरांनीं आपल्या लोकांचं निमित्त पुढें करून मलाच सत्कार्याचा धडा देण्याकरितां थांबवून धरलं असं मला वाटलं. कुलकर्णी मास्तर बोलत होते तेव्हां मध्येंच मी वळून तिकडे हळूंच पाहिलं, तिकडेही त्यांचं भाषण आवडत होतं असं दिसलं, तें पाहून मलाही जरा बरं वाटलं.

पारासभोंवतीं जमलेली मंडळी आमच्याकडे आदरानें पहात होती; पण मास्तरांचं भाषण आशाळभूतपणानें ऐकत होती.

'मंडळी, तुम्हांला आपल्या कामाचा खोळंबा करून मीं मुद्दाम बोलावलं तें आपल्या गांवाला ज्या थोर लोकांचे पाय सहजगत्या लागले, त्यांचें तुम्हांला दर्शन घडावं म्हणून! संत येती घरा तोचि आपला दिवाळी दसरा, हें मी आपणांस नेहमींच सांगत आलों आहे. यापूर्वी जसें आपल्या या गरीब खेड्याला श्रीमत् शंकराचार्य, रानडे, चिपळूणकर, देशसेविका पार्वतीबाई आठवले, देशभगिनी कमलाबाई-साहेब देशपांडे इत्यादि थोर मंडळींनीं येऊन पावन केलें आहे, त्याच-प्रमाणें आज या लक्ष्मी–नारायणाचा लाभ अगदीं सहजासहजीं आपल्या पूर्व भाग्यानेंच झाला आहे. म्हणून आज आपल्याला दिवाळी–दसऱ्या-सारखाच सणाचा दिवस आहे! हे श्रीमंत इनामदारसाहेब आहेत. यांच्याबद्दल तुम्हांला विशेष सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे ही कीं, हे आपलीं इनाम गांवें प्रत्यक्ष पहावयाला, आपल्या लोकांचीं सुखदु:खें पाहून तीं निवारण करायला जात आहेत. हे नुसता उपदेश करा-वयाला जात नाहींत, सरकारी अधिकाऱ्याप्रमाणें आपल्या लोकांनाच छळायला–पिळायला–नाडायला जात नाहींत, तर त्यांचें कल्याण करायला जात आहेत! आपल्यासारखीं जीं यांचीं खेडीं आहेत त्यांना चांगले दिवस दाखवायला हे निघाले आहेत, ही काय कमी आनंदाची गोष्ट आहे? आज त्यांच्या खेड्यांची सुधारणा होईल, उद्यां आपली होईल; यांच्याचप्रमाणें आपलाही परमेश्वर धांवेल, यांच्या-प्रमाणें जर खेडोपाडीं लक्ष्मी–नारायणाची दुक्कल स्वतः सुखदु:ख पाह-ण्याकरितां आणि खेड्याचें दु:ख घालविण्याकरितां जाऊं लागली, विचार करूं लागली, शरीरानें, मनानें, आणि पैशानें झीज सोसूं लागली तर आपल्यांतलीं माणसें आज पोटापाटीं लागून मुंबई-सारख्या बकाल वस्तींत ओझीं वहायला जातात, तीं कां जातील? आपल्या शरीराची आणि संसाराची वाताहात करून घेतात ती कां करून घेतील? हे कोणी सरकारी अधिकारी नव्हेत कीं, आपल्या वर कर लादतील–दुष्काळांतही सारा वसूल करतील–आम्हां-

लाच लुबाडून आमच्या चांगल्याकरितां आमच्या पाठीचीं धिरडीं करतील ! हे सावकार लोक नव्हेत कीं, कर्जाकरितां व व्याजाकरितां तुमच्या दारांत दंडा घेऊन भय्या बसवतील–तुमच्या जमिनीवर वांकडा डोळा ठेवतील–सावकारी पाश तुमच्या गळयाभोंवतीं अडकवतील ! हे तुम्हांला कांहीं मागायला आले नाहींत–मागायला येणार नाहींत. या लक्ष्मी–नारायणांची मोहीम गरिबांना लुबाडण्याकरितां नाहीं तर त्यांना जगविण्याकरितां आहे, त्यांना सुखी करण्याकरितां आहे. म्हणून आपण यांचें कल्याण चिंतू या. हे ज्या खेड्यांची सुधारणा करणार आहेत तीं एकदां आपणही जाऊन पाहूं आणि मग भगवंताजवळ अशीच प्रार्थना करूं कीं देवा, आमच्याही खेड्याला असेच सुखाचे दिवस दाखीव ! या लक्ष्मी–नारायणाप्रमाणें स्वत: गरीबांसाटीं झिजायला तयार झाल्याशिवाय खेड्यापाड्यांची सुधारणा होईल अशी आशा धरण्यांत काय हंशील आहे ? हा लक्ष्मी-नारायणाचा जोडा आपल्या लोकांना, शिका आणि अशक्त व्हा; घरदार सोडा आणि नोकऱ्या जोडा; हातचें सोडा आणि पळत्याच्या पाठीमागें लागा, असं कांहीं सांगायला जात नाहीं. उलट लोक घरेंदारें टाकून मुंबईला कां जातात ? शेती कां सोडतात ? घरेंदारें सोडूं नयेत म्हणून–शेती टाकून त्यांनीं जाऊं नये म्हणून आपण काय करायला पाहिजे ? हें विचारायला आणि विचारून त्याप्रमाणें खटपट करायला हे निघाले आहेत. म्हणूनच आपण याचं अभिनंदन केलं पाहिजे....’

याप्रमाणें कुलकर्णी मास्तर किती तरी वेळ बोलत होते. बोलतांना कित्येक इंगाडे शब्द योजून ते लोकांना हंसवायलाही लावीत होते. त्यांचं बोलणं संपलं. त्यांनीं तिकडे आणि मलाही कांहीं बोलावं म्हणून सुचविलं. त्यांच्या बोलण्यानंतर आम्हांला कांहीं बोलतां येण्यासारखं नव्हतंच मुळीं. बोलायचं म्हटलं तर तेंच तेंच बोलावं लागलं असतं. आम्ही अमूक अमूक करणार आहोंत, हें सांगण्यांत काय फुशारकी होती ? अगोदर कांहीं करावं आणि मग अधिकारानं बोलावं म्हणजे त्या बोलण्याला अर्थ उत्पन्न होतो, असं आतां माझं मलाच वाटूं लागलं होतं. आम्हीं कांहीं बोलणार आहोंत या कल्पनेनें जम-

लेली मंडळी अजून तटस्थ होती. मी हलकेच कुलकर्णी मास्तरांच्या जवळ माझ्या बोलण्यांतली अडचण सांगितली. माफ करा म्हटलं. आपलं भाषण मलाच मार्गदर्शक झालं आहे म्हटलं. त्यांनींही मग नाइलाज म्हणून आमची सोडवणूक केली. त्यांनींच उठून लोकांना सांगितलं कीं 'पाहुण्यांना गडबडीनें जायचं आहे म्हणून त्यांना आतां बोलतां येत नाहीं. पुन्हां लवकरच ते आपल्याकडे बोलण्याकरितां येणार आहेत तेव्हां त्या वेळीं त्यांच्या व्याख्यानाचा आपण भरपूर लाभ घेऊं !' नंतर मंडळी आपापल्या कामावर चालती झाली.

आम्हीं आमच्या मोटारींत बसलों. कुलकर्णी मास्तरांचा निरोप घेतला. मी आणि तिकडूनही कुलकर्णी मास्तरांना आमच्याकडे यायला विनंति केली. त्यांनीं हंसून हो म्हटलं आणि आमची मोटार त्या खेड्यांतून पुढें आमच्या इनामाच्या गांवीं जायला निघाली !

वत्सले, केवढें हें पत्र मी तुला आज लिहिलें ? पण हें पत्र, मीं हें मुद्दामच लिहिलं आहे. तूं माझ्याकडे ज्या दृष्टीनें पाहात होतीस तीच दृष्टि केवळ खरी नव्हती. हें माझं मला जसं समजलं, तसंच तुलाही कळावं म्हणून लिहिलं आहे. कुलकर्णी मास्तरांच्या अनुभवाच्या बोलाकडे आम्हीं कसं पहावं हें त्यांनींच मला आज शिकवलं. त्याचा मी तर उपयोग करून घेईनच ! पण पुढेंमागें माझ्याप्रमाणेंच तुझ्यावरही जेव्हां जबाबदारी येऊन पडेल, त्यावेळीं त्याचा तुलाही उपयोग व्हावा म्हणून एवढं मोठं पत्र लिहिण्याची मी इतकी उरस्फोड केली आहे, समजलीस ? खेड्यापाड्यांना खरं काय पाहिजे असतं आणि आम्ही त्यांना काय द्यायला तयार झालेलों असतों हें कुलकर्णी मास्तरांनीं 'धोंडू आजारी आणि दगडूला औषध द्यायची तयारी' हें वाक्य उच्चारून किती समर्पक रीतीनें पटवून दिलं नाहीं ? मी तर त्यावेळीं भारीच हंसलें.

आमची मोटार पुढें चालू झाली त्यावेळीं "तुमचा कुलकर्णी मास्तर बराच तडफदार आहे कीं ! अशीं माणसं खेड्यापाड्यांतून असतील व त्यांना सत्तेचा आणि संपत्तीचा त्यांच्या मनासारखा पाठिंबा असेल तर हींच माणसं खेड्यांची किती भरभराट करून दाखवि-

तील !–" असे तिकडच्या तोंडचे शब्द ऐकले अन् वत्से, मला किती धन्य वाटलं म्हणून सांगूं. अगदीं कृतकृत्य झाल्यासारखं वाटलं ! खेड्याकडे पाह्यला तिकडे कुलकर्णी मास्तरांचं हें एक उदाहरणच नाहीं का झालं ? वत्से, त्या वेळेपासून मी त्याच एका आनंदांत आहे. आज पुष्कळ झालें. यानंतर असंच केव्हां तरी पुन्हां लिहीन ? पण लिहून लिहून लिहावयाचं तरी किती ? जेव्हां समक्ष भेट होईल तेव्हां पुष्कळ —पुष्कळच बोलूं म्हणजे झालें. आतां येथेंच पत्र पुरें करतें—

तुझी

**माणिक**

पत्र लिहून संपविलं ! आज खूपच लिहून सगळं पत्र जुळवलं. मग इकडे तिकडे पाहिलं तर तिथं कोण होतं ? मी पत्र लिहिण्याच्या नादांत गुंगलें असतांना केव्हां तिकडून उठून बाहेर जायचं झालं होतं कोण जाणे !

मी 'अगबाई ! किती तरी वेळ लिहितच बसलें आहे वेड्यासारखी ! मला कांहीं अंग धुणं–कामंबिमं आहेत कीं नाहीं ?' असें आपल्याशींच पुटपुटत जागेवरून उठलें ! उठतां उठतां समोर राखून ठेवलेल्या पत्रावर दृष्टि गेली. तें तसंच वाचायचं राहिलं होतं. बाहेर जातजातच वाचून टाकावं म्हणून मी तशीच निघालें तोंच तिकडून दार उघडून आंत यायचं झालं. येतां येतां म्हटलं 'झाला का सारा पत्रव्यवहार ? माहेरच्या पत्राला काय उत्तर टाकलंत ? येणार म्हणून कीं नाहीं म्हणून ? माहेरीं बोलवलंय ना ?'

"काय ? मला माहेरचं बोलावणं आलं आहे ?" मी एकदम म्हटलें.

"हातांतलं पत्र वाचलं म्हणजे समजेल. आम्हांला पत्र आलं आहे त्यांत तोच मजकूर आहे. हें हातांत पत्र आहे, त्यांत तोच मजकूर असणार म्हणून विचारलं. जायचें असेल तर आमची कांहीं ना नाहीं, एवढंच आम्हांला सुचवायचं आहे ! दुसरं कांहीं नाहीं" तिकडून म्हणणं झालं !

मीं मग तिथंच उभी राहून पत्र वाचलं !

"खरंच मला माहेरला जायला हवं होतं !" असें म्हणून तिकडे पाहिलं. पण लगेच मनांत आलं कीं आतांच कशाला त्याची वाटाघाट ? जेवणखाण झाल्यावर सावकाश त्याबद्दल ठरवून मग लिहिलं तरी चालेल. 'मग

ठरवूं ' असें मीं अर्धवट, पण तिकडे ऐकायला जाईल अशा रीतीनं म्हटलें नी अंग धुवायला म्हणून तिथून निघालें.

एवढं बरीक खरं कीं, माहेर अन् माहेरचं बोलाविण्याचं पत्र म्हटलं नी एकदम बाकी सर्व विसरायला झालं ! एका पाठीमागून एक माहेर-च्याच संबंधानं एकसारखे विचार यायला लागले. माहेर ! माहेर ! माहेर म्हणजे काय, अन् तिकडची गोडशी मधुरशी ओढ कशी असते हें आम्हां बायकांशिवाय कुणाला कधींच कळायचं नाहीं !

---

# प्रकरण बारावें

## मन सासरींच राहिलं !

एकादी गोष्ट आपल्या मनासारखी झाली, होऊं लागली म्हणजे स्वतःला एक प्रकारचा विशेष आनंद होत असतो. पण त्या आनंदाची परि-पूर्णता, आपल्या हातून घडलेली किंवा घडत असलेली गोष्ट अगदीं अथ-पासून इतीपर्यंत आपल्या मायेच्या माणसांजवळ पुन्हां पुन्हां सांगितल्या-शिवाय होत नसते. लोकांनीं आपल्यास खोदखोदून विचारावें, आपणही अवसान आणून आणि जीव तोडून सांगावें; लोकांनीं, आपल्या मायेच्या माणसांनीं, आपल्या कल्पकतेचें, आपल्या धडाडीचें, तडफीचें, कार्यावरील एकनिष्ठेचें, त्याकरितां सोसलेल्या हाल–अपेष्टांचें कोडकौतुक आपल्या तोंडा-वर एकसारखें करावें; बाह्यतः आपल्याला तसलें कौतुक नको आहे, तें आपल्याला आवडत नाहीं, असें दाखवीत असावें; पण अंतर्यामीं तर आपलीं गुणवर्णनें नित्य नवीं कानीं पडत असावींत; असें किती जणांना तरी वाटत असतें. दुसऱ्या तिसऱ्याचें मीं कांहीं सांगत नाहीं; पण माझ्या मनाची बरीक हुबेहूब वर लिहिल्याप्रमाणेंच अवस्था झाली होती. मी तिकडे सांगायला गेलें; माझें ऐकायचें झालें. निरनिराळ्या खेड्यापाड्यांतून पसरलेली आमची शेतवाडी, आमची कुळें, त्यांची अवस्था, त्यांच्या

अडी अडचणी, त्यांच्या गरजा, वगैरे प्रत्यक्ष पहावयाचें; प्रत्यक्ष ऐकायचें आणि चालू परिस्थितींत आपल्या शेतीकरितां आणि तींत कसणाऱ्या कुळांकरितां आपल्याला काय काय चांगलें करतां येणार आहे, याबद्दलचा विचार करून त्याप्रमाणें उद्योगाला लागायचें; या कल्पनेप्रमाणें आम्हीं आमचीं इनामगावें पहायला आरंभ केला. रोज एकाद दुसरा गांव जाऊन पहायचा, जरूर तर एकाद दुसरा दिवस त्या त्या ठिकाणीं मुक्काम ठेवायचा; तिथल्या लोकांशीं त्यांच्यांत मिळून मिसळून वेळ घालवून माहिती मिळवायची, या कष्टाच्या उद्योगाला मी लागायचें ठरवलें. माझ्या म्हणण्याला कबुली देऊन त्याप्रमाणें लगेच वागायचें होऊं लागलें. अण्णा, गोपाळभय्या, यांच्यासारख्या खुशालचेंडूंच्या संगतींतून सुटका होणें दुर्घट वाटत होतें पण त्या बाबतींत मला उलट अनुभव येऊं लागला. ही अशी क्रांति माझ्या सांगण्यामुळें झाली, याचा मला आनंद आणि अभिमान वाटूं लागला तर तें अगदीं स्वाभाविकच नव्हे का? मला तसा आनंद–अभिमान वाटूं लागला होता. माझें हें कार्यकर्तृत्व कुणा तरी मायेच्या माणसाजवळ सांगावेंसें वाटूं लागलें होतें. पण सासरीं कुणाजवळ सांगतां येणार? आम्हीं दौऱ्यावरून परत आलों कीं, सासूबाई आम्हां उभयतांची दृष्ट काढायच्या; दादासाहेबांनीं आमचीं–विशेषतः तिकडचीं-मुक्त कंठानं स्तुतिस्तोत्रें गायला सुरवात करायची; दौऱ्यांत आम्हीं केलेल्या कामगिरीपेक्षां आम्हीं प्रवासांच्या दगदगीनें दमलों, खेड्यांत आमचे खायचे प्यायचे हाल झाले, थंडीवाऱ्यानें आम्हांला हैराण केलें, आमच्या ऐषआरामाची आबाळ झाली वगैरेबद्दलची चर्पटपंजरी—प्रत्यक्ष यांतील कुणी कांहीं पाहिलें नसतां-नाही—यथास्थित अगदीं डोळे भरून पाहिल्यागत चालवायची; तिथें माझ्या मनाचें समाधान कसें होणार? मला आमच्या कष्टाबद्दल कुणी हळहळ दाखवायला नको होती तर आमच्या कामगिरीचा गुणगौरव करायला पाहिजे होता, आणि तोही आम्हीं आमची कामगिरी सांगितल्यावर, अगोदर नव्हे. तसेंच आमच्या कष्टाबद्दल हळहळ ऐकूं यावयाला हवी होती पण ती अगोदर नव्हे, नंतर! पण सासरीं तरी वस्तुस्थिति अशी होती. मग माझी तृप्ती कशी होणार? नाहीं म्हणायला प्रवासांतील एका खेड्यांत आमचे 'कुलकर्णी मास्तर' भेटले. थोड्या

वेळांत मला काय त्यांना सांगतां आलें तें मीं त्यांना सांगितलें. त्यांनीं पण माझ्या हौसेबद्दल, कार्याच्या योजनेबद्दल आणि प्रत्यक्ष उद्योगाबद्दल माझी स्तुति केली—जरा जास्तच केली म्हणाना—पण ती एक तेवढी स्तुति झाली खरी. त्याही स्तुतीनें मनाचें समाधान झालें नव्हतें. बसल्या बसल्या मधूनच वाटे, चहूंदिशीं उठावें–एखाद्या आपल्या बालमैत्रिणीच्या गांवीं जावें–मैत्रिणीला भेटावें अन् तिला आपल्या नव्या कर्तबगारीचा पाढा इत्थंभूत ऐकवावा. मी माझ्या पराक्रमाचीं वर्णनें मैत्रिणींना कळवीतही होतें पत्रांतून, पण तशानें समाधान कसें व्हावें? दुधाची तहान ताकावर भागविल्यासारखंच होत होतं तें!

पण असें वरचेवर मनांत यायला नी एक दिवस अकल्पित माहेरचं पत्र यायला आपली गांठ पडली. स्वारीनेंच माझ्या हातीं माहेरचं पत्र दिलं, मजकूरही सांगितला, इतकेंच नव्हे पण माहेरीं जायला हंसतमुखानं परवानगीही पण दिली. मीं माहेरीं जावं असं सासूबाईंचं मत पडलं. दादासाहेबांनीं माझ्या जाण्याच्या विचाराला दुजोरा दिला! माहेरीं जाणारी मीच होतें. माझ्याबद्दल प्रश्नच कुठें होता! अगोदरच कुठें तरी मायेच्या माणसांत आपल्याला जायला मिळावं, आपला पराक्रम मायेच्या माणसांतून ऐकवावा असं वाटत होतं; त्यांत आतां प्रत्यक्ष बोलावणं आलेलं–पत्र आलेलं–सगळ्यांची जाण्यास परवानगी मिळालली मग काय विचारतां? मी अगदीं बेसुमार हुरळून गेलें. माझ्या दृष्टीपुढें माहेरची वाट–माहेर–माहेरचं घर–तिथलीं सगळीं मायेचीं माणसं दिसूं लागलीं. माझ्या येण्याची वेळ जवळ येत चालली आहे; आतुरतेनें सगळीजणं माझी वाट पहात आहेत; बाबांच्या दरवाजांतून आंगणात, आंगणांतून सोप्यांत, सोप्यांतून आणखी आंगणांत, अशा एकसारख्या येरझारा चालल्या आहेत; दरवाजांतून दूर—जिथपर्यंत दृष्टि पोंचते तेथपर्यंत—माझा टांगा—गाडी—मोटार यांपैकीं कांहीं दिसत आहे काय म्हणून डोळे आकुंचित करून, एकदां चष्मा डोळ्यावर आणून तर एकदां वर कपाळावर सरकावून बाबा पहात आहेत; मधूनच ते कांहींतरी मनाशीं पुटपुटत आहेत; माझा पत्ता अजूनही नसल्यामुळें बाबांचं मन अधिक अधीर होत आहे; आंगणांतून परतल्यावर टांग्याच्या चाकांची धडधड आणि घोड्यांच्या टापांची टपटप ऐकूं येऊन बाबा

उत्कंठेनं पुन्हां दरवाजांत जरा घाईनंच येत आहेत पण टांगा तसाच पुढें गेल्याचें पाहून आणि त्यांत मी न आढळून बाबांची अगदीं निराशा होत आहे; असें बाहेर बाबांच्या मनाचें आंदोलन चालू आहे, तर तिकडे आंत आईच्या मनाची काय तऱ्हा? माणिक आतां इतक्यांत येणार म्हणून तिची कोण तारांबळ उडून गेली आहे; 'हें करूं का तें करूं? माझ्या माणिकला अमुक आवडतं, तेंच आल्याबरोबर करावं कीं उद्यां? येतां क्षणीं दमून येईल—आवडता पदार्थ झाला म्हणून काय झालं? दमून आल्यावर पोटभर कांहीं माणिक खायची नाहीं नी मग आपला विरस होईल. त्यापेक्षां आल्याबरोबर साधंच पण थोडंसं चमचमीत कांहीं तरी करावं नी उद्यां तिच्या आवडीनिवडीच्या जिन्नसा कराव्यात' असें आईच्या मनांत चाललें आहे; त्या धांदलींत इथला पदार्थ तिथं ठेव, तिथली जिन्नस इकडे आण, उगीच फळीवरचा जड डबा खालीं काढ, तर कारण नसतांना शेगडींत आणखी कोळसे टाक असं आई करीत आहे; माणिकला चहा लागतो—येतांक्षणीं तिला ताजा चहा द्यायला हवा—म्हणून आई सकाळपासूनच पाण्याचं आधण शेगडीवर ठेवून बसली आहे; बाबा येत असल्याचा नुसता भास झाला कीं, 'झाली का वेळ! आला का टांगा!' म्हणून जरा भरून आलेल्या गळ्यानेंच बाबांना उद्देशून आई विचारीत आहे; माझीं धाकटीं भावंडें केव्हां आईच्या मागून मागून, तर केव्हां बाबांच्या मागें हिंडत आहेत; त्यांना माझ्यासंबंधींच अनेक प्रश्न विचारीत आहेत; रस्त्यांत 'पॅं पॅं-पॅं' असा कुणाच्याही मोटारीचा कर्णा वाजला तरी माझीच मोटार आली या कल्पनेनें माझीं भावंडें धांवत, ठेचळत, पडत पण उत्कंठेनें पुन्हां उठून पळत दारांत येत आहेत; त्यांचीही निराशाच होऊन तीं हिरमुसलीं होत आहेत आणि अगदीं रडकुंडीच्या आवाजांत 'बाबा, केव्हां हो यायची आपली ताई? वेळ झाली आहे ना तिची यायची? मग कां ती अजून येत नाहीं? आतां आपली ताई खूप चांगली झाली असेल नाहीं? कशी छान छान दिसेल नाहीं? मी अगोदर तिच्याजवळ जाईन नी तिला सागेन कीं आम्हीं तुझी खूप खूप वाट पाहिली मग आम्हीं तुझ्यावर रागावलों; असें मग मी ताईला म्हणेन!' असें आईजवळ आणि बाबांजवळ म्हणून त्यांची अधीरता आणखीच वाढवीत आहेत.—

वेळ टळून गेली तरी मी आलें नाहीं; मग हताश होऊन आई व बाबा वेळ कां चुकली असावी ? इनामदारांची न पाठविण्याची लहर लागली का गाडीला उशीर झाला का मध्येंच एकादा अपघात झाला अशा आई-बाबांच्यामध्यें माझ्या न येण्यावरून अनेक शंकाकुशंका निघत आहेत; ' आपण पत्रावर भागवलंत् ! आपल्याला वाटलं कीं जगांत सारींच माणसं आपल्यासारखीं आहेत. पण किती झालं तरी ते व्याही आहेत. त्यांचा वर-पक्ष आहे, त्यांतून श्रीमंत इनामदार आहेत ते ! खरं म्हटलं तर पत्रापेक्षां माणकूला आणायला स्वतःलाच जायला हवं होतं. तरी मी पहिल्या-पासून तसं सांगतदेखील होतें. पण आम्हां बायकाचें ऐकणार कोण ? पत्रापेक्षां स्वतःची गोष्ट तितकी वेगळी पडते. तितकं आपलं वजन पडतं—' अशा तऱ्हेनें आई बाबांना जरा खट्टू होऊन तर थोडी निराश होऊन म्हणत आहे—

' जांवईबुवांना स्वतःच आपल्या बायकोला घेऊन मोटारींतून यायची लहर लागते कीं काय ? श्रीमंत लहरी असतात. शिवाय त्यांना बायकोशिवाय करमलं पाहिजे ना ? आपले स्वतःच बायकोला घेऊन येतील, दोन दिवस आपणही राहतील आणि चट्दिशीं बायकोलाच घेऊन आले तसे परत जातील. माणकु आली कुणीकडे आणि गेली कुणीकडे असं आम्हां सर्वांना होऊन जाईल. पण जांवईबोवा आले तर त्यांचा यथायोग्य आपल्याकडून मानसन्मान कसा होणार ? आपण तशी तयारी तरी काय करणार ? आम्हीं गरीब, ते श्रीमंत ! एकाद्या क्षुल्लक ओहोळानें समुद्राला आपल्या वैभवानं संतुष्ट करायचं म्हटलं तर तें व्हायचं कसं ? पण छेः ! जांवईबुवा कुठले यायला आम्हां गरीबांच्या घरीं. तेही यायचे नाहींत आणि तसा आग्रह माणकूही करायची नाहीं. हजारदां बोलावलं तरी जे जांवईबुवा यायचे नाहींत ते आपसुख कसे येतील ? तेही यायचे नाहींत आणि माणकुलाही पण पाठवावयाचे नाहींत ! थोरांच्या घरीं मुलगी दिली म्हणजे भेटीला अंतर येतं म्हणतात तें हें असं !—' या प्रकारचीं बोलणीं आई व बाबा यांजमध्यें उदास अंतःकरणांनीं आणि रूक्ष शब्दांनीं चाललीं आहेत—

असें मला माझ्या जागीं बसून अंतर्दृष्टीनें दिसूं लागलं होतं. आपली मुलगी सासरहून माहेरीं यायची झाली म्हणजे गरीब असोत कीं श्रीमंत

असोत, अडाणी असोत कीं शहाणी असोत कोणत्या प्रेमळ आईबापांच्या मनाची अवस्था माझ्या आईबाबांच्या मनाच्या अवस्थेप्रमाणें होत नसेल? त्यांतून मी आईबाबांची पहिल्यापासून लाडकी; मित्रमैत्रिणींची, बहिण-भावांची आवडती; त्यांत श्रीमंत इनामदारांच्या घरीं पडलेली–सगळ्यांच्या कल्पनेपेक्षांही मी सुखांत पडलेली; आणि फार दिवसांनीं माहेरीं जाण्यास निघालेली मग माझ्याबद्दल माझ्या माहेरच्या माणसांना जरा विशेषच वाटलं तर त्यांत काय नवल ?

मला कल्पना येत होती त्यापेक्षां आणखी किती तरी पटीनें आईच्या आणि बाबांच्या मनांत कल्लोळ उठत असतील हें वर्णन करणें कठीण आहे. माहेरचें चित्र डोळ्यापुढें उभें राहिलें कीं वाटे चटदिशीं उठावें आणि एकदम माहेरची वाट धरावी. शरीराला मनाचे पंख चिकटवून एकाद्या पक्ष्याप्रमाणें भर्रदिशीं माहेरच्या माणसांत जाऊन उतरावें! पण तसं कसं होणार ?

सगळ्यांची इच्छा मला माहेरीं पाठवायची होती. अगदीं एकमतानें तसा ठराव झाला पण माझ्या मनांत आल्याबरोबर आणि तसं ठरल्याबरोबर लगेच जातां येणार होतं थोडंच ? आम्हीं श्रीमंत इनामदार ना ? मग प्रत्येक गोष्ट आमच्या इनामदारी थाटामाटाला आणि दमदारपणाला साजेशीच झाली पाहिजे. तें काय एकाद्या गरीबाच्या मुलीप्रमाणें आपलें घोड्यावर खोगीर चढवून, बरोबर कुणाला तरी घेऊन झपकन वाट चालायला लागा-यचं आहे थोडंच ? नाहीं तर डोकीवर बोजे घेऊन रस्त्यावर येऊन उभे राहून भाड्याच्या जाणाऱ्या मोटारीला हातानें थांबवून, त्या खिचडींत कसा तरी दाटीवाटीनें समावेश करून घेऊन झपकन् माहेर गांठतां येण्यासारखं आम्हां इनामदारांना थोडकंच वागतां येणार ? पाठवायचं ठरलं तरी, मोटारींतून कीं आगगाडींतून ? बरोबर कोण कोण जायचं ? बरोबर काय काय द्यायचं ? तिथी, वार, नक्षत्र, वेळ, शुभाशुभ, आडवं येणं, उभं येणं, पाल कुचकुचणं, एक कीं दोन ? हजार अडचणींचा विचार व्हायचा, काथ्याकूट व्हायचा, रणकंदनं माजायचीं, हजार वेळेला हो ना व्हायचं? शेवटीं एकदांचं ठरायचं ! पुन्हां कसली तरी, कुणी तरी क्षुल्लक शंका उपस्थित करायची आणि होबद्दल नाहीं असं स्पष्ट ठरायचं ! त्यांत माहे-

रच्या माणसांना, त्यांनीं निष्कारणच बोलावलं या एकाच भयंकर अपराधा-बद्दल दहा पांच शेलक्या शब्दांचे आहेर आणि जिभेच्या लाथा मिळा-यच्याच ! असें झालें नाहीं तर मग आम्हीं श्रीमंत इनामदार कसले आणि आमचा मोठेपणा तो कुठें राहिला ?

माझ्या माहेरीं जाण्याच्या संबंधानें अगदीं अक्षरशः जरी असं झालं नाहीं, तरी पुष्कळ झालं. माझ्या माहेरच्या माणसांना शेलक्या शब्दांचा आहेर मिळाला नाहीं, कुणी पाठविण्याबद्दल आढेवेढे घेतले नाहींत पण आगगाडीनें पाठवायचं कीं मोटार बरोबर द्यायची, याच्याच चर्चेंत नुसते दोन दिवस गेले. बाळक्या माझ्याबरोबर येणार म्हणून हट्टच धरून बसला. त्याला बरोबर घ्यावं कीं येसूला, या विचारांत मी होतें. पण येसूचा तसा कांहीं हेतु दिसला नाहीं. 'आम्हांला कशाला बाई वहिनी-साहेब नेतील आपल्या माहेरीं !' हें किंवा अशाच सारखं वेळीं अवेळीं येसू म्हणाली इतकंच. तिची तितकी ओढ दिसली नाहीं. मी पण आग्रह केला नाहीं. बाळक्याला हौसही वाटत होती आणि यायचंही म्हणत होता म्हणून मी त्यालाच शेवटीं माझ्याबरोबर न्यायचं ठरविलं. मोटारनें जायचं ठरूं लागलं तेव्हां मग तिकडूनही निघावं असं वाटूं लागलं. तिकडून निघायचं व्हायचं म्हणजे मग अण्णा, गोपाळभय्या हे तिकडचे जेवते गण यायचेच हें ओघाला आलं. मी माहेरीं जाणार ती अशा थाटामाटानें असें जेव्हां दिसायला लागलं तेव्हां खरं माहेरचं सुख घ्यायला मी न जातां नुसती आपला देखावा दाखवायला आणि गरीब माहेरच्यांना संकटांत घालाय-लाच जाणार असं मनांत यायला लागलं. तिकडून यायचं होणार म्हणून एकपरी बरंही वाटलं, एकपरी वाईटही वाटलं ! पण त्यापैकीं नक्की करणारी मी कुणीच नव्हतें. असं म्हटलं असं, तसं म्हटलं तसं याप्रमाणें वागण्या-पुरताच माझा अधिकार होता.

पण शेवटीं तेंही ठरलें नाहीं. शेवटीं ठरलं तें हें कीं, मी बाळक्याला बरोबर घेऊन आगगाडीनेंच जावें. आमच्या स्टेशनावर सगळ्यांनीं मला पोंचवावें. तिथल्या स्टेशनावर उतरून घ्यायची व्यवस्था करण्याबद्दल माझ्या बाबांना आगाऊ पत्र लिहावं. सर्वानुमतें हेंच बरं वाटलें व हेंच ठरलें. त्याप्रमाणें बाबांना पत्र गेलें. त्यांचें उत्तर आल्यावर पाठवायचं हें

उघड असल्यामुळें पत्र येईपर्यंत चार सहा दिवस सहजच जाणार होते. ते चार सहा दिवस कसे तरी घालविणें मला भागच होतें. कल्पनेचे पंख लावून माहेरीं जातां आलं नव्हतं म्हणून माझ्या मनाला कसंसं वाटत होतं हें खरें पण जायचं नक्की असल्यामुळें तितकं कांहीं खट्टू व्हायचं कारण उरलं नव्हतं ! पांच सहा दिवसांचा कंटाळवाणा काळ कसा काढावा याचं मला प्रथम कोडं पडलं होतं पण मी ते दिवस माझ्या मैत्रिणींना पत्रें पाठविण्यांत आणि ज्या ज्या खेड्यांतून मी दौरा काढला होता, त्या त्या खेड्यांचीं माणसं आधून मधून येत त्यांच्याशीं बोलण्यांत, त्यांचीं गार्‍हाणीं ऐकण्यांत, त्यांना सल्लामसलती देण्यांत आणि त्यांना आवश्यक असणारी खरीखुरी मदत तिकडून देवविण्याचं वचन द्यायला लावण्यांत व माहेरीं जाण्याची पुरेपूर तयारी करण्यांत घालविले.

त्या पांच दिवसांत स्वारी माझ्या दृष्टिआड झाली नाहीं. मला वाईट वाटेल अशी वागली नाहीं कीं बोलली नाहीं. बाहेर कुठं उगाच जाणं झालं नाहीं. दादासाहेबांच्या जवळ जाऊन बसायचं ; काय आहे–नाहीं पहायचं, सासूबाईंची पूसतपास करायची, आल्या मंडळींची माझ्या विचारें चौकशी करायची; मी कांहीं वाची ते ऐकायचं किंवा एकादे वेळीं अण्णाला बोलावून ताजीं आलेलीं वर्तमानपत्रं आणि नियतकालिकें त्याला वाचायला लावायचीं; असा तिकडचा कार्यक्रम सुरू झाला होता. संध्याकाळीं मोटार घेऊन केव्हां एकटंच तर केव्हा मला बरोबर घेऊन जायचं, असा तिकडचा सगळा वेळ जात होता. तिकडून असं माझ्या मताप्रमाणें वागणं सुरू झाल्यावर मग मला वेळ कंटाळवाणा कसा होणार ?

तिकडूनच माझ्याशीं आतांशा माझ्या मनासारखं वागायचं होऊं लागल्यामुळें बाकीचीं माणसंही माझ्या आंवतींभवतीं घुटमळूं लागलीं, मिठास बोलूं लागलीं. सासूबाई आणि दादासाहेब यांच्याबद्दल प्रश्नच नव्हता. पण घरांतलीं चाकर–माणसं, कुत्र्याप्रमाणें धन्याच्या तोंडाकडे पहायचें नी त्याच्या नजरेच्या नाचाप्रमाणें एकाद्यावर गुरगुरायचं किंवा शेपटी हालवीत, लाडीकपणानं अंगाला घसटायला यायचं असं वागतात तसंच आमच्या नोकरचाकरांबद्दल माझ्या अनुभवाला यायला लागलं होतं. त्याबद्दल मला हसूं येई, त्यांचा राग येई आणि थोडी कींवही येई. पण इतकं असलं तरी

तिकडे त्याबद्दल एक अवाक्षर बोलायची देखील सोय नव्हती! नाहीं तर एकादे वेळीं अर्थाचा अनर्थ होऊन फट् म्हणतां ब्रह्महत्या व्हायची! केव्हां कशावरून स्वारीचं मन पालटेल याचा काय नेम? म्हणून मी तें कांहीं बोलतच नव्हतें. सगळीं माझ्याशीं हंसून खेळून असत. तर मीही उलट त्यांच्याशीं तशीच वागे. केव्हां तरी अण्णा आणि गोपाळभय्या उगीचच लाडीगोडी लावून म्हणत, ' बरं का वहिनीसाहेब, तुम्ही माहेरीं आहांत तोंपर्यंत आम्हीं तिकडे येणार बरं का ? राजाभाऊंनासुद्धां घेऊन येणार. तुमचं तसं पत्रं आलं पाहिजे. पत्राशिवाय आम्ही कुणी येणार नाहीं, हो. ध्यानांत ठेवा ! मग काय ? पाठविणार ना पत्र ? '

ते असें म्हणत पण त्यांनाही हंसत हंसत मी योग्यसें उत्तर देई. तशीच अलीकडे येसूही उगीचच माझ्या पुढेंपुढें करी. एक दिवस संपला कीं, ती म्हणे, ' चला, आजचा दिवस गेला. वहिनीसाहेबांचे माहेरीं जायचे तीन दिवस राहिले. सध्यां म्हणजे वहिनीसाहेबांना एकेक क्षण युगासारखा वाटत असेल ? नाहीं का वहिनीसाहेब ? दिवसाला धोंडे मारावेसे अशाच वेळेला वाटत असतात !' केव्हां असं तर केव्हां ' आत्ता इतक्यांत वहिनी-साहेबांची निघण्याची वेळ होईल. आतां काय ? वहिनीसाहेबांच्या आईची पापणी लवत असेल, घरांतून पैंगूळ चालत असेल; दारासमोरच्या कोपऱ्यावर बसून कावळा ' काव ! काव ! ' असं ओरडून वहिनीसाहेबांच्या आगमनाची आगाऊ वर्दी देत असेल; त्यांचीं भावडें ' काव काव, सोन्याची पाव,आमची ताई यायची असेल तर भुर्रर उडून जाव ! ' असं त्या कावळ्याला उद्देशून म्हणत असतील ! नाहीं का हो वहिनीसाहेब ! उद्यां माहेरीं पोंचल्या म्हणजे माहेरच्या माणसांत दंग होतील नी आम्हां सर्वांची मग वहिनीसाहेबांना आठवणही रहायची नाहीं ' अशीही आपली चर्पट-पंजरी चालवी. ती एकंदरींत माझ्या मनासारखंच बोले. मला आवडेल, पचेल, रुचेल अशीच वागे. मग तिच्याबद्दल मला राग कुठून येणार ? ती बोले त्याचें मला बरंच वाटे.

" बरीच कीं ग आहेस तूं येसू ? तुला असं चांगलें बोलतां येतं कीं " असें म्हणून तिला तसं आणखी बोलायला मी प्रोत्साहनच देत असे. मग मात्र तिच्या बोलण्याला सुमारच रहात नसे.

झालें बाबांचं पत्र आलं. माझी जायची वेळ नक्की ठरली. गाडी पक्की झाली. माझी रात्रभर नुसती तारांबळ उडाली. या पेट्या उघड–उपस–भर; हें बरोबर घ्यावं का तें? हें तर आईला दाखवायला नेलंच पाहिजे; तें बरोबर असलंच पाहिजे; याच्याशिवाय आपलं दर वेळीं अडेल; हे नवे केलेले दागिने, हे नवे घेतलेले शालू–सगळं सगळं पाहिजे; आपण तिकडे असे किती दिवस राहणार? आणि हे सगळं एकेकदां तरी वापरणार कधीं? पण सगळं पाहिजे–असें करून करून नाहीं होय म्हणतां म्हणतां मी माझ्या सगळ्या ट्रंका तर सामानांनीं गच्च भरल्या! माझी मीच उपसत होतें आणि माझी मीच त्या भरत होतें.

येसू आणि बाळक्या दोघेही पुढें पुढें करीत पण मला तें आवडत नसे म्हणून मी त्यांना कशालाच हात लावायला सांगितलं नाहीं. माझ्या सगळ्या सामानाची बांधाबांध व्हायला किती तरी रात्र झाली. अगदीं उजाडतां निघायचं होतं; विश्रांतीला अगदीं थोडा वेळ होता पण अंथरुणावर अंग टाकणं भागच होतं. स्वारी केव्हांच झोंपीं गेलेली होती. रात्रभर माझा खटाटोप चालला होता त्याची किंचित् सुद्धां स्वारीला दाद नव्हती! मी पण तिकडे मुळींच त्रास दिला नाहीं. माहेरीं जाण्याचा एकच विचार व त्याबद्दलचा आनंद मस्तकांत थैमान घालीत होता मग त्यापुढें दुसरें तिसरें मला काय सुचणार?

मला अंथरुणावर पडतांच गाढ झोंप लागली. निजतांना मी अगदीं आनंदांत होतें. मनीं वसे तें स्वप्नीं दिसे म्हणतात त्याप्रमाणें दिवसभर माझ्या डोक्यांत जे विचार सारखे भ्रमण करीत होते, ज्या विचारांनीं मन अगदीं गच्च भरून गेलें होतें तेच स्वप्नांत यायला पाहिजे कीं नाहीं? पण कां कोण जाणें! त्या थोडया वेळांत मला त्यासारखीं स्वप्नें मात्र मुळींच पडलीं नाहींत. उलट, उलटच स्वप्नं पडलीं! येसू माझ्याकडे पाहून छद्मी हंसते आहे–स्वारीला एकटीशी पाहून तिरव्या डोळयांनीं रोखून पहात आहे व कांहीं अर्धवट पुटपुटत आहे–हरिणी–ती हरिणी–आपल्या दारावरून जात आहे–तिचा पाठलाग करायला स्वारी गोपाळभय्याला सहज हंसत हंसत सांगत आहे–चांदणी–चांदणी–काळी कीं गोरीसुद्धां प्रत्यक्षांत मी कधीं मेलीला पाहिली नाहीं तीच मूर्तीमंत माझ्यापुढें उभी! ती मजकडे तिरस्कारानें पहात

अगदीं विषारी डोळ्यांनीं रोखून पहात, स्वारीला कांहीं तरी ताडताड बोलते आहे–स्वारी पण तिच्यापुढें गयावया करीत आहे—अशींच कसलीं तरी वेडींवांकडीं मनाला त्रास देणारीं स्वप्नं पडत होतीं. स्वप्नांत माझ्या मनाचें स्वास्थ्य डळमळलें. मला तें सहन होईना. मी कुणावर रागावलें कोणास ठाऊक! दांतओंठ चावले, नी येसूवर कीं चांदणीवर कीं स्वारीवर चवताळून निघालें. माझ्या तोंडांतून शब्दच फुटत नव्हता. कांहीं तरी भयंकर बोलायचें मनांत होतें–त्याच, तशाच स्थितींत मी जागी झालें–नव्हे, मला जागी केलें! दारांत आमची मोटार पाँ पाँ करीत होती. बाळक्यानें आणि इतर नोकरांनीं माझें कांहीं सामान मोटारींत टाकलें आणि कांहीं मागें बांधलें. सासूबाई दादासाहेब मला निरोप द्यायला सज्ज झाले होते. निघण्याची घाई चालली होती. बाळक्यानें आपला जामानिमा केला होता. येसू मला कुंकूं लावायला हातांत करंडा घेऊन देवघराच्या दारांत तयार होती. स्वारीनेंच मला झोंपेंतून उठविलें. मी झोंपेंत, स्वप्नांत ओरडण्याच्या बेतांत होतें तोंच मला उठवून म्हणायचं झालं "ऊठ, ऊठ उशीर झाला ना? तुला माहेरीं जायचं आहे ना? मग उशीर नाहीं का होत? अशानं गाडी नाहीं का चुकायची?"

मी उठलें. स्वारीच्या तोंडाकडे निमिषमात्रच पण अगदीं निरखून पाहिलें. स्वप्नांतल्या त्रासदायक देखाव्याचा उदासीनपणा माझ्यावर अजूनही होताच! काय असेल तें असो, अगदीं माहेरीं जायचं होतं तरी एकदम माझं मन फिरलं. तसं कांहीं कारण कळेना; पण माहेरीं जाऊंच नये असं मला एकाएकीं वाटायला लागलं! पण मला तसं बोलतां येईना. छाती धडधडूं लागली. स्वारीनं हंसून पुनः उशीर होत असल्याची आठवण दिली. मी उठलें. झटपट आवरलं. सासूबाईंना, दादासाहेबांना व देवाला नमस्कार केला आणि मुकाट्यानें मोटारींत जाऊन बसलें! मोटार सुरूं झाली. स्टेशनपर्यंत पोंचवायला स्वतः स्वारी बरोबर होती, अण्णा आणि गोपाळभय्याही होता. पण कालची उत्सुकता आज उरली नाहीं. माहेरीं जाणं जिवावर कां आलं आहे हें कळेना आणि मनाला चैन पडेना. मी निघालें खरी पण शेवटीं मन सासरींच राहून शरीर मात्र माहेरला निघालं!

# प्रकरण तेरावें

## माहेरीं—

मी गाडींत बसलें. बाळक्यानें आणि बाकीच्या मंडळींनीं बरोबरचें सामान बांकाखालीं नीटनेटकें लावलें. गाडी पाणी घेऊं लागली. चालूं लागायला वेळ होताच. स्वारी डब्यांत येऊन बसली. कांहीं बोलायचं होत नव्हतें. माझ्या हालचालीवर, एकंदर व्यापारावर स्थिर नजरेनं एकसारखं पहायचं होत होतं. असं मधूनच केव्हां मी सहज म्हणून पहायला गेलें तर तेवढ्यावरून आढळून येत होतं. तिकडून कां बोलायचं होत नव्हतं कोण जाणे! आणि मला कां बोलवत नव्हतं हेंही देवच जाणे! क्षण क्षण जात होता तसं काळीज जास्तच धडधड करीत होतें. अण्णा व गोपाळभय्या गाडीच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत प्रत्येक डब्यांत डोकावून पहात उगीचच हंसत खिदळत हिंडत होते. स्वारीनें मनगटावरील घड्याळांत पाहिलं. गाडीला सुटायला अगदीं थोडा अवकाश उरला हें कळलें. स्वारीनं खालीं उतरून माझ्या डब्याचं दार स्वतः लावलं. मी जिथं बसलें होतें तिथल्या खिडकीजवळ येऊन अगदीं खेटून उभं राह्यचं झालं. जवळूनच अण्णा, गोपाळभय्या आणि स्टेशनावरील हजारों अनोळखी माणसं हिंडत होतीं तीं आमच्याकडे पहात होतीं. मला बाई त्या वेळीं कसंसंच झालं पण त्या वेळीं सुद्धां कांहीं बोलायची छाती होईना. कांहीं तरी बोलावंसं वाटत होतं पण अर्थ जमत नव्हता, शब्द सुचत नव्हते. एकादे वेळीं भलतेच शब्द—स्वारीला नावडते शब्द—तोंडांतून जातील कीं काय म्हणून धास्ती वाटत होती. त्या धास्तीनें मी ओठ दाबीत होतें. माझी मनःस्थिति मात्र स्वारीच्या ध्यानांत येत होती कीं नाहीं कुणास ठाऊक! तसं चेहऱ्यावर पाहून तर कांहींच कळण्यासारखं नव्हतें.

"मी जात असलें तरी हातीं घेतलेल्या कामाकडचं लक्ष कमी करायचं नाहीं बरें का." असं कांहीं तरी स्वारीला सांगायचं शेवटीं माझ्या मनांत आलं. शब्द ओठावर आले पण इतक्यांत तिकडून म्हणायचं झालं

" कां ? माहेरीं निघायचं झालं म्हणून एकही शब्द बोलूं नये वाटतं माणसानं ? वाः ! माहेरचं वेड इतकं असेल असं नव्हतं आम्हांला वाटलं ! " असं म्हणून हंसायचं झालं. " तें खोटं आहे. मी नाहीं माहेरीं जात, उतरूं का अशीच खालीं ? " असं उत्तर द्यायचं अगदीं तोंडावर आलं पण ऐन वेळीं त्याचाच अनर्थ व्हायचा म्हणून त्या वेळीं थांबलें आणि नुसतीच हंसलें. पुढें म्हणायचं झालं–" आपण तर निघालांत माहेरीं. इकडे तर लोककल्याणाच्या कामाचं अवडंबर माजवून ठेवलेलं ! तेव्हां माहेरीं किती दिवस जाणार आणि लोककल्याणाच्या कार्याचं तोंपर्यंत कसं होणार ? असं बावरल्या दृष्टीनें बघायला नको कांहीं. आमच्याकडून जें होईल तें अगदीं राणीसाहेबांची आज्ञा म्हणून आम्हीं करूच त्यांत बाध नाहीं. पण खुद्द राणीसरकारांची गोष्ट वेगळी, त्यांची हौस निराळी, उत्साह वेगळा ! तें ज्याचं त्याला, तें आमच्यांत नाहीं ! आणि आम्हाला लोककल्याणाचा गुरुजीनीं नुकता कुठें ' श्रीगणेशा' घालून दिला आणि गुरूजीचं कार्य अर्धं टाकून आपले निघाले माहेरीं ! तेव्हां म्हटलं आतां हें व्हायचं कसं ? गुरूजींच्या परोक्ष आमच्या हातून कार्याचा गाडा ओढला जायचा कसा ? म्हटलं गुरूजी कृपावंत होऊन परत येईपर्यंत आम्हीं करायचीं कामें आम्हांला आंखून देतील–तर गुरूजी गाडी सुटायची वेळ होत आली तरी कांहीं बोलतच नाहींत ! " हें ऐकून मला हंसूं आलं. स्वारी पण हंसली. गोपाळभय्या, अण्णादेखील हंसायला लागले ! ' इश्श ! ' या अर्थानें स्वारीकडे पहात मी नुसतीच मान वेळली ! मला ज्या प्रकारची काळजी होती ती स्वारीच्या बोलण्यानें त्याच क्षणीं नाहींशी झाली व मनावरचं दडपण उडालं. सकाळपासून ज्या उदासीनतेनं मला सारखा त्रास दिला होता ती सटवी कुठंच्या कुठं पळाली. माझं एक मन कष्टी होऊन उगीचच्च सासरीं राहिल्यासारखं वाटत होतं तें एका निमिषांत तिथून माहेरीं जायला निघालं. " बोलावणं यायच्या अगोदर मी परत येईन. माझ्या कामाची काळजी मला आहे. पण मी येईपर्यंत अगदींच कांहीं कामाकडे दुर्लक्ष व्हायला नको " असं मी धीर करून स्वारीला सांगतें न सांगतें तोंच— माझं वाक्यसुद्धां पुरतं झालं नाहीं तोंच—गार्डानें शिटी दिली व आपल्या हातांतलं हिरवं फडकं फडकावलं. एंजीननें " माँ ऽ ऽ ऽ " असा रडका

आवाज काढला आणि गाडी चालू झाली. गाडीबरोबर चार पावलं चालत यायचं झालं पण पहिलं बोलण्याचं व्यवधान सुटून ' बराय-बराय ' च्या नुसत्या उभयतांच्या मानाच हलायला सुरवात झाली. गाडीला वेग मिळाला तरीही मी मागें पाहात होतेंच. थोडा वेळ तिकडून पाहाणं झालं पण लगेच एका हातांत अण्णाचा एक हात व दुसऱ्या हातांत गोपाळभय्याचा एक हात धरून परत वळायचं झालं तें मग कांहीं मागें वळून पहायचं झालं नाहीं. गाडीनें मोठाच वळसा घेतला आणि स्टेशनची सारीच सृष्टी दृष्टिआड झाली. मीं खिडकींतून आंत तोंड घेतलं; मागली सृष्टी सुटली नी आतां मला पुढचं व्यवधान लागलें. पण मन कशानं कीं कोण जाणे विलक्षण भारावलं होतं व शरीर जड झालं होतं. डब्यांत मी एकटीच होतें. गाडीच्या चाकांचाही एकतंत्री आवाज सुरू झाला. त्या नादांतच मो आडवी झालें आणि मला लगेच झोंपही लागली. झोंपेंत किती स्टेशनें गेलीं कोण जाणे. जागीं झाल्यानंतर लवकरच आमचं चिरपरिचित स्टेशन आलं. उठून, तोंडावरून, केंसावरून हात फिरवतें न फिरवतें तों थबकत थबकत गाडी थांबलीही. बाहेर डोकावून पहातें इतक्यांत बाबा, माझी भावंडें—बाई, बाई, बाई ! आणखी किती तरी ओळखीचीं माणसं मला उतरून घ्यायला बाबांच्याबरोबर आलेलीं दिसलीं. कांहीं बाबांच्या बरोबरचीं तर कांहीं त्यांच्याहीपेक्षां मोठी माणसं हजर होतीं. निम्मा गांवच मला उतरून घ्यायला—मला पाह्यला—स्टेशनवर लोटला होता म्हणाना! त्या गर्दींत माझी बालमैत्रीण शकू पण दिसली; वत्सलाही तिच्या पलीकडे होतीच. झालंच म्हटलं तर सोनेरी फ्रेमचा पेबलचा चष्मा नाकावर चढविलेला, अंगांत शर्ट, कोट, पायांत कोल्हापुरी वहाणा, काचा मारलेलं पायघोळ धोतर नेसलेला, किंचित हंसरं तोंड करून गर्दीच्या जरा दूरच राहून माझ्या स्वागतासाठीं आलेला मनोहरसुद्धां मला दिसला ! त्या सगळ्यांना पाहून मला किती किती चमत्कारिक वाटलं ! माझी नुसती तारांबळ उडून गेली. बोलूं कुणाशीं आणि बघूं कुणाकडे असं मला होऊन गेलं. गाडी थांबतांच आणि मला माझ्या डब्यांत पाहतांच बाबा आणि त्यांच्याबरोबरची कांहीं मंडळी माझ्या डब्याकडे जरा धांवतच यायला निघाली. भराभर सारी मंडळी डब्यासमोर जमली. मी सर्वांकडे पाहून किंचित हंसलें. उगीचच पोक्त-

पणाचा आव आला. इनामदारीचें अन्न पचलं होतं ना ? मग तसं तें व्हायचंच ! हें थोडा वेळच झालं. भावंडांना जवळ पाहतांच आणि त्यांचं नाचणं बागडणं पाहतांच माझा पोक्तपणा कुठच्या कुठं पळाला ! मी लहानाहून लहान झालें. माहेरपण माझ्या अंगांत संचारलं नी मी टणकन् डब्याच्या खालीं उडी घेतली. तिथेंच बाबांना नमस्कार केला. भावंडाना जवळ घेतलें. सामान उतरून घ्यायला बाबांच्या बरोबरचीं माणसं डब्यात शिरलीं. बाळक्या अजून उतरलेला दिसला नाहीं. 'तूं एकटीच आलीस वाटतं ?' असं बाबा म्हणायला आणि 'बाळक्या उतरला नाहीं वाटतं अजून' म्हणून मी म्हणत इकडे तिकडे पहायला एकच गांठ पडली. मी शेजारच्या सर्व्हंटच्या डब्याकडे गेलें. बाळक्या खुशाल घोरत होता; स्टेशन आल्याची त्याला दादच नव्हती. मी हांक मारली आणखी लोकांनीं उठविलें तेव्हां तो जागा झाला. अन् मग जी कांहीं त्याची धांदल उडाली ती कांहीं पुसूं नका. मला बोलायचं कारणच पडलं नाहीं इतका तो माझ्याकडे पाहूनच ओशाळला. धडपडत उठला आणि माझ्या डब्यांत घाईनं चढूं लागला. त्याच्यासमोरच सामानाचा ढीग होता पण घाबरटपणानं त्याचं लक्ष तिकडे गेलंच नाहीं. तें लक्षांत आल्यावर तर तो जास्तच विरमला. माझ्या मैत्रिणी जवळ आल्या. माझ्या सभोंवतालचा तो प्रचंड आप्तस्वकीयांचा गराडा पाहून मला कांहीं विलक्षणच वाटलं ! एकाद्या संस्थानची राणीच मी आहें कीं काय ! असं सुद्धा मनांत येऊन गेल्याशिवाय राहिलं नाहीं. कित्येकांनीं 'कां कसं काय ताईसाहेब ?' एवढंच हंसून विचारलं. मी कितीकांशीं बोललें तर कित्येकांकडे पाहून नुसती हंसलेंच; कित्येकांकडे तर मला पाह्यला देखील झालं नाहीं. पण मी तरी त्याला काय करणार ? माझ्या स्थितींतल्या मुलीचं तशा वेळीं तसंच होईल कीं नाहीं ?

पण माझ्यावर कुणी रागावलं नाहीं. सगळयांच्याबरोबर मी घरीं आलें. बाबा विशेष कांहीं बोलले नाहींत, पण त्यांना आनंदानें आकाश ठेंगणं झालं होतं. भावंडं मला एकसारखीं बिलगत होतीं. आईच्या मनाचं काय झालं होतं आणि काय नाहीं हें कल्पनेला अगम्यच आहे. आईच ती ! आपल्या आवडत्या मुलीला—माणिकला—आपलीच एकादे वेळीं दृष्ट लागायची म्हणूनच कीं काय, आई माझ्याकडे सारखी न्याहाळून सुद्धां

पहात नव्हती! मी आंगणांत आलें त्यावेळीं माझ्यावरून दहीभात ओंवाळून टाकायला आणि हातावर पाणी घालायला म्हणून आई एका हातांत दहीभात आणि दुसऱ्या हातांत पाण्याचा तांब्या घेऊन आली. एकदांच तिनं माझ्याकडे पाहिलं. मी पण पाहिलें. दोघी हंसलों. मी चूळ भरली. आई दहीभात दाराबाहेर टाकून मागून माझ्याजवळ आली, हलकेच माझ्या खांद्यावर तिनें हात ठेवला व ' काय ताईबाई ! ' एवढेंच गद्‌गद्‌ल्या आवाजांत ती म्हणाली. पुढें तिला काय बोलायचं होतं कुणास ठाऊक! तिचा कंठ भरून आला. डोळे पाण्यानें भरून आले तो आनंदाचाच अतिरेक होता. मुलीचं सौख्य पाहून आईचा कंठ भरून येतो—डोळ्यांत आनंदाश्रु येतात याचा अनुभव कोणत्या माहेरवाशिणीला नसेल?

आईला आणि बाबांना मला कुठें ठेवूं आणि कुठें नको असें होऊन गेलं होतं. माणसं येत होतीं, जात होतीं व माझी विचारपूस करीत होतीं. मी इकडून तिकडे, तिकडून इकडे, आंतून बाहेर, बाहेरून आंत; बागेंतून सोप्यांत, सोप्यांतून माडीवर, भावंडांना घेऊन उगीचच सारखी हिंडत होतें. बाळक्याही एकसारखा माझ्या मागेंमागें हिंडत होता. माझी थुंकी झेलायला तो तयार होता. उगीचच कुणी माझ्याजवळ आलेलं, कुणी कांहीं तरी बोललेलं, आमच्या सामानावर कुणी बसलेलं किंवा इकडचें तिकडे करूं लागलेलं त्याला मुळींच खपत नव्हतं. मी कुठें निघालें आणि दूर वाटेंतच कुणी कुणाशीं वाट अडवून बोलत असलं म्हणजे बाळक्या पुढें होऊन ' शूः शूः बाजूला व्हा ना. वहिनीसाहेब येताहेत दिसत नाहींत का? व्हा—दूर व्हा ' असें मोठ्या आवेशानें म्हणायला पुढें येत होता. त्याच्या वहिनीसाहेब त्याला मोठ्या; माझ्या माहेरच्या माणसांना त्याचं काय? ते बाळक्याकडे पहात, माझ्याकडे पहात, हंसत आणि ' बरं तर ' म्हणून सावकाश एका बाजूला होत. बाबांना अशा गोष्टीचं विशेष कांहीं वाटत असलं तरी ते दाखवीत नसत. पण जुन्या काळच्या माझ्या आईला माझ्या वैभवाचं कोण कोडकौतुक वाटे! आपल्या मुलीपुढें अष्टौप्रहर थुंकी झेलायला दास तयार आहे—माहेरीं आली तरी हा इतमाम आहे—मग तिच्या घरीं किती असला पाहिजे या कल्पनेनं तिचं ब्रह्मांड आनंदानं भरून जाई. ती आल्यागेल्या मैत्रिणीजवळ अगदीं मोकळ्या

अंतःकरणानं, भोळ्या भावानं तसं बोलून दाखवी. कित्येकदां त्यामुळं मला अगदीं लाजल्यासारखं होऊन जाई. आईनं हें बोलूं नये, असेंसुद्धां मला वाटे. आपल्या मुलीचं आपल्याला कौतुक, जगाला काय त्याचं! लोकं ऐकायचीं–ऐकायचीं आणि मागं कुचेष्टादेखील करायचीं म्हणून आईनं तसं बोलूं नये असं मला वाटे. पण आई माझं ऐकणार थोडंच! आणि मी आईला तसं बोलूं नको म्हणून सांगणार कशी?

मी इनामदारीण झाल्यावर दिसते कशी, बोलते कशी, वागते कशी, माझ्यांत फरक काय झाला आहे, वगैरे पाहण्याकरितां व त्यावरच अनुकूल प्रतिकूल भाष्यें रचण्याकरितां मला पहायला म्हणून स्टेशनपर्यंत लोक आले होते. बरीच मंडळी तिथल्या तिथूनच पांगली. कांहीं थोडी थेट घरापर्यंत आली. शकू, वत्सला, सुमन या बरीक घरापर्यंत–नव्हे घरांत–माझ्याबरोबरच आल्या. मनोहर मात्र एकदां स्टेशनवर दिसला न दिसला कीं लगेच कुठें गुप्त झाला कोण जाणे. त्यानें माझ्याकडे किंचित् स्मित करीत पाहिलं. मींही त्याचं हंसून स्वागत केलं! पण त्या गर्दीत आम्हांला बोलायला कांहींच झालें नाहीं. मी दुसऱ्याच गर्दींत गुरफटलें तितक्यांतच तो कुठें नाहींसा झाला. मला वाटलं मला त्याच्याशीं बोलतां आलं नाहीं म्हणून तो रागावून तसाच परस्पर चालता झाला असावा किंवा मी ज्या गाडीला उतरलें त्याच गाडीनें तो कुठें कामानिमित्त गेला असावा, नाहीं तर पुन्हा दिसल्याशिवाय रहाता ना! माझ्या मैत्रिणी घरीं आल्या, माझ्या बरोबर त्यांनीं आईनं केलेल्या चहाचा आणि फराळाचा समाचार घेतला. त्या वेळीं आमचं औपचारिक विचारपुशीशिवाय कसलं दुसरं बोलणं झालंच नाहीं. बाकीच्या शेजारच्या मुली आल्या होत्या, त्या परस्पर मला पाहिल्यानंतर कुजबुजत कुजबुजत निघूनही गेल्या. माझ्या मैत्रिणींनीं पहिल्या भेटींत फारशी माझी थट्टाही केली नाहीं कीं विनोदही केला नाहीं. माझ्याशीं बोलतांना त्या एकसारख्या माझ्याकडे पहात मात्र होत्या. मी गरीबींतून श्रीमंतींत गेलें तेव्हां माझ्यांत कांहीं तसा फरक झाला आहे कीं काय, बोलण्यांत मानभावीपणा, कृतींत घमेंड, वागण्यांत गर्विष्ठपणा, आपल्यापेक्षां आपल्या मैत्रिणींना कमी लेखण्याची बुद्धि, हीं माझ्यांत शिरलीं आहेत कीं काय, हें त्या पहात होत्या कीं काय न कळे!

मी मात्र अगदीं त्यांच्याशीं पहिल्यासारखीच वागत होतें.

मैत्रिणी थोडा वेळ बसून, पुन्हा दुपारीं येऊं म्हणून कबूल करून निरोप घेऊन गेल्या. मग मी आईबरोबरच तिच्या मागोमाग घुटमळूं लागलें. ती कांहीं विचारी त्याला उत्तर द्यायचें, आपण होऊनच तिकडच्या एकेक गोष्टी सांगूं लागायचें असें आमचें चालूं झालें. बोलतां बोलतां आईच्या कामाला हातभार लावण्याकरितां 'आई, मी हें करूं का? तें करतें मी हं' असें म्हणूं लागलें तर आई मला कांहीं एक करूं देईना. माहेरीं आलेली लाडकी लेक, त्यांत श्रीमंतींत सासरीं लोळणारी. तिला काम करायला आई कशी लावील? मी कांहीं करूं म्हटलं कीं, 'जाऊं दे ग उगीच बैस, तुला काय करायचं आहे त्याच्याशीं, तुला कांहीं एक करायला नको आहे! माहेरीं मुलींनीं कामं का करायचीं असतात? सासरीं आहेतच नशीबाला कामं लागलेलीं, तिथें कोण तुम्हांला नको म्हणणार? तिथं कामाचा कंटाळा येतो म्हणूनच ना चार दिवस विश्रांतीला माहेरीं यायचं असतं—आमचं आम्हीं करतोंच सगळं—' असं आई म्हणे. मीही वेडी तेवढ्याचाच फायदा घेई. आईच्या कामाचा रामरगाडा चाललेलाच असायचा. उसंत म्हणून घटकाभर तिला नसायची. एकसारखी मी तिच्याजवळ असलें म्हणजे झालें. इकडे ती तोंडानें माझ्याशीं बोले? तर तिकडे हातानें तिचीं कामें चाललेलींच असायचीं. आईनं नको म्हटलं तरी तिचीं कामं थोडीं हलकीं करायला हट्टानें लागायचं असं कुठें माझ्या मनांत येत होतं? सासरीं चांगली श्रीमंती असली म्हणून काय झालें! काबाडकष्टाचीं नसलीं तरी इतर दुसरीं पुष्कळ कामं तिथं करावीं लागतातच. अगदींच कांहीं कुणी ऐदी बसत नाहीं आणि सासरच्या माणसांची एक प्रकारची दहशतही असतेच. त्या कारणानें सासरीं मुलींच्या मनावर न कळतांच जबरदस्त दाब असतो; तो दाब माहेरीं आल्यावर कुठून राहणार? घड्याळांतल्या कळीवरचा दाब सुटला कीं सर्रर्रर्र करून एकदांच सुटून ती मोकळी—निष्क्रिय होते—तसेंच आमच्या मनाचें! माझं तरी तसंच झालं! आईच्या बोलानें आणि वागविण्यानं माझ्या मनावरचा सासरचा दाब सुटला, माहेरचा आळसटपणा अंगांत आला, मी कुठलंच काम करीनाशी झालें. सासरचा श्रीमंती ऐदीपणा आणि मोहरवाशिणीचा

हक्काचा आळसटपणा यांची माझ्या ठिकाणीं चांगली मिळणी झाली. मी माहेरीं तशीं वागूं लागलें. माझीं लुगडीं धुणं, मी जेवलेलीं खरकटीं भांडीं विसळणं हीं कामं सुद्धां देखतां डोळा आई करीत होती व मीं खुशाल पहात होतें. आईच्या मायेला लाज नसते. तिला काय, आपली लाडकी लेक खाईल थोडें, पिईल थोडें, बसेल थोडें, निजेल थोडें, विश्रांति घेईल ती थोडी–सुख घेईल तेंही थोडेंच–असं आईच्या मायेला वाटायचंच ! पण माझ्यासारख्या शहाण्यासुरत्या मुलीच्याही ध्यानांत तें आईचं करणं कसं येत नाहीं ? आपली सेवा आईला करायला लावूं नये, असं आम्हांला कसं वाटत नाहीं ? आम्ही शहाणपणाच्या लंब्या लंब्या गोष्टी सांगतों; देशभक्तीच्या, लोककल्याणाच्या, गरीबांच्या उद्धाराच्या मोठमोठ्या बाता करतों आणि घरीं–माहेरीं अशा वागतों. आमचीं कामं वडील माणसांना–जन्मदात्या आईला—करायला लावतों; त्यांत आम्हांला कमीपणा वाटत नाहीं. ज्यांची सेवा आम्हीं करायची त्यांनाच आमची सेवा करायला लावतों ! आईनं माझ्याकरितां हें केलं पाहिजे; तें केलं पाहिजे; बाबांनीं मला तें घेऊन दिलं पाहिजे, इतकं थाटाचं माझं माहेरपण झालंच पाहिजे असं आम्हां मुलींना बिनदिक्कत वाटत असतं ! आपले चोचले पुरविण्याच्या कल्पनेपुढें माहेरची बस्तुस्थिति आम्हांला दिसते कशाला ? इतर माहेरवाशिणीचं कसं काय होत असेल तें मला माहीत नाहीं पण मी मला शहाणी समजणारी ना ? पण माहेरीं आल्यावर माझी सुद्धां वरील सारखीच गत व्हायला लागली होती. आपली बसलें तिथें बसलें, उठलें तेव्हां उठलें; मला हेंच नको, तेंच हवें; आज अमूकच होत आहे, उद्यां बरंच वाटत नाहीं; चाखतमाखतच जेवायचं; आजारीपणाचं सोंगच आणावयाचं, उगीचच कुंथायचं ! माहेरीं आजारी पडण्यांत सुद्धां मौज असते. बाबा घाबरतात, आई बावरते, सगळीजणं जवळ बसतात, एकसारखं आपलं गुणवर्णन आणि हवं नको करतात ! त्या कोडकौतुकाकरितां तरी माहेरीं आजारी पडावंसं वाटतं. मला देखील तसंच अगदीं न कळत वाटायला लागलं होतं. एकादे वेळीं उगीचच मळमळत आहे असं वाटे–खोटंच डोकं दुखल्यासारखं होई–तर अंगांत ताप भरल्याचा भास होई ! जें जें मी करीन तें तें थोडें–कारण कांहीं केलं तरी आपलं माझं कौतुक हें व्हायचंच !

कौतुक व्हायला लागलं कीं माणूस जास्तच करतं, तसंच मोठेपणा लोक द्यायला लागले कीं माणूस खोटं खरं असलं तरी तसेंच आपलं चढायला लागतं–मी मधून मधून मनाला तशी सारखी जाणीव देत राही पण मनच तें. माझ्या ताब्यांत एकसारखं थोडंच रहाणार ? सगळ्यांनीं चढविलं कीं मी आपली चढायची ! 'माणकूला मोठ्या वाड्यांत रहायची संवय झालेली–तिची मोठी मोठी दृष्टि झालेली–तिला इथं गरीबीच्या घरांत अडचणल्यासारखं होत असेल–सगळं कसं इटुकलंमिटुकलं दिसत असेल–तिला आमचं एवढं तेवढं आवडतंय थोडंच?' असें आईनं किंवा आणखी कुणीं म्हटलं कीं मला आपलं तसंच वाटायचं ?

मी माहेरीं आलें त्याच दिवसापासूनच जरी नाहीं, तरी चार दोन दिवस जातांच व आईची तशी वेड्या मायेची फूस मिळतांच माझं रंगरूप पालटायला लागलंच.

तरी पण मी पुन्हां पुन्हां मनाला ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करीच. माझी शेतवाडीकडे आणि शेतकऱ्यांकडे वळलेली दृष्टि मला तशी कुठें स्वस्थ बसूं देत होती. विषय निघाला कीं आईजवळ, बाबाजवळ, मैत्रिणींजवळ माझ्या कार्याच्या उपक्रमाचा साद्यंत इतिहास सांगें. पूर्वी त्या त्या वेळीं जरी मी पत्रांतून साग्र हकीकत लिहीच तरी पण तोंडीं सांगायची वेळ आली कीं पुन्हां तेंच सांगें. बाबांनीं किंवा आईनं माझे पराक्रम ऐकून 'आमची माणिक आहेच तशी ! नांव सार्थ आहे. आमच्या पोटीं येऊन उभय कुळांचा उद्धार करणारी आमची माणिक आहे. आम्हीं लहानपणापासूनच म्हणत होतों !' असें माझ्यासंबंधानें कुणीं म्हटलं कीं माझ्या पराक्रमाचं आवर्तन फिरून सुरू व्हायचंच !

माहेरीं शेतवाडी होती. मला मध्येंच शेतवाडीवर फिरायला जावें, त्या लोकांच्या गांठी भेटी घ्याव्यात, त्यांना विचारावें, आपल्याला त्यांना कांहीं सांगतां येईल का ? त्यांच्याकडून कांहीं नवीन माहिती मिळेल काय हें पहावें असें वाटे. मी मैत्रिणींना चला शेतवाडी पहायला जाऊं या म्हणे. बाबांना तसं सांगें. त्यावेळीं आईला आणि बाबांना माझ्यासंबंधानें जें कांहीं वाटे तें कांहीं सांगायची सोय नाहीं. मग मला जो हुरूप येई म्हणतां ! एकाद वेळीं खरेंच मी बाहेरही पडे पण मी किती झालें तरी पोरसवदा !

एकाद्या शेताच्या कडेला गेलें आणि तिथें काम करणाऱ्या कुणाला कांहीं विचारूं सांगूं लागलें तर ती मंडळी "या पोरीला काय कळतंय" अशीच समजूत करून घेऊन त्याला अनुसरूनच माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देत. बाबांच्या विषयीं बहुतेक सर्वांची चांगलीच बुद्धि असल्यामुळें माझी कोणी उघड चेष्टा करीत नसत किंवा कोणत्या प्रकारें दुखवीत नसत इतकंच काय तें! शकू, सुमन, वत्सला, शांती यांपैकीं कुणी बरोबर असल्या म्हणजे शेतामाळांत हिंडायला–फिरायला मौज येई. माझ्या बोलण्याला तर ऊत येई. त्या बिचाऱ्याही माझं बोलणं निमूट ऐकून घेत. अशा वेळीं माझ्या सासरकडची आणि तिकडच्या माझ्या कार्याची आठवण हटकून होई. दर तीन दिवसांनीं मी नियमानें तिकडे पत्रही पण पाठवीत होतें. माझ्या पहिल्या एक दोन पत्रांचीं उशीराउशीरा का होईना, पण जरा त्रोटकच उत्तरें आलीं. पण पुढेंपुढें पत्रही नाहीं आणि उत्तरही नाहीं अशी स्थिति होऊं लागली. मी मात्र नियमानें पत्र पाठवीत होतें. 'अमक्याचें काय झालें? तमकें कसें चाललें आहे? फलाण्याचं काय करायचं ठरवणं झालं? ठरवलें होतें तिकडे जायचं झालं का?' अशा तऱ्हेच्या प्रश्नांचा मारा मी प्रत्येक पत्रांत करीत असें, पण उत्तरच नाहीं तर समजायचं काय! टपालची वेळ झाली कीं बाळक्याला मी मुद्दाम पोस्टांत पाठवी. पत्र नाहीं म्हणून सांगत आला कीं मला बाळक्याचाच राग येई!

उत्तर किंवा पत्र नाहीं म्हणून मी माझ्या मनाला शंकाकुशंका मात्र शिवूं देत नसें. तिकडचा स्वभाव मला माहीत झाला होता, आळस परिचयाचा होता, इनामदारी खाक्याची पूर्ण जाणीव होती. शिवाय माझ्यावतीनं लकडा लावायला जवळ कुणी नव्हतं मग पत्र किंवा उत्तर नाहीं आलं तर नवल तरी का वाटायचं नी शंका तरी कशाला घ्यायची! एकादे वेळीं वैतागलें म्हणजे मनांत येई कीं, 'आतां गेलें म्हणजे काढीन साऱ्या हलगर्जीपणाचं चांगलं उट्टं! अशी बोलेन कीं ज्याचं नांव तें!' पण शेवटीं तिकडून दिलेल्या वचनाची आठवण होई आणि आलेला राग त्या वेळींच उतरे. उरलाच तर पत्राचे वेळीं तशा चार ओळी लिही. 'खूप रागावलें आहे, आतां नाहीं असं चालायचं' म्हणून लिहून बाळक्याजवळ पत्र टाकायला दिलं कीं असेल नसेल तोहि राग कुठच्याकुठें जायचा!

आम्हीं सुरू केलेला उपक्रम तिकडून अखंड चालविलाच असणार! तिथं गेल्यावर आणखी कांहीं नव्या नव्या उद्योगांना आरंभ केला पाहिजे; ते उद्योग काय काय करतां येतील, हें माझ्या शहाण्या मित्रमैत्रिणींच्या सल्ल्यानं ठरविणार होतें. आल्यापासून पहिले कांहीं दिवस तर असे तसेच गेले. पण एक दिवस एके ठिकाणीं खूप खूप बोलण्याकरितां सगळ्यांनीं जमायचं ठरलं. तें देखील मीं पत्रांतून लिहून कळविलं.

ठरल्या वेळीं पत्र मिळालं नाहीं तर स्वारींना काय वाटत असेल? माझा रागही येत असेल. एकादे वेळीं मुद्दामच उशीरा पत्र टाकावं म्हणजे स्वारीला राग येईल, त्या कारणानं तरी रागारागाचं पत्र येईल, असं मनांत येई पण तें मेलं मला जुळतच नसे. वाटे कीं माहेरचीं सुखं मी भोगीत असतां तिकडे स्वतःच्या सुखाकरितां कां उगीच दुःख द्या!

---

# प्रकरण चौदावें

## मनोराज्यांतील सुंदर मंदिरें

मला माहेरीं येऊन महिना होऊन गेला तसं माहेरीं रहावेना आणि सासरीं जाववेना. स्वारीचं ये असं कांहीं पत्र आलं नव्हतं. दादासाहेबांचीं एक दोन मामुली पत्रं आलीं होतीं. 'आपल्या सवडीप्रमाणें चि. सौ. रखमाची रवानगी करून द्यावी' असं एका त्यांच्याच पत्रांत ओझरतं होतं. मग मलाही माहेरीं दम निघेना. ऊंस गोड झाला म्हणून मुळासुद्धां जसा खायचा नसतो तसंच माहेर कितीही चांगलं झालं म्हणून तिथं फार दिवस रहायचं नसतं हें तर होतंच. पण माझ्या कामाची ओढ मला होती. शिवाय स्वारीचं पत्र मुळींच नव्हतं. मग मला माहेर गोड कसं लागणार? म्हणून मी आईच्या आणि बाबाच्यापुढें, मला लवकरच परत धाडा म्हणून निकडीचं बोलणं मांडलं. दोन तीन दिवसांत माझं निघायचंही त्याप्रमाणं ठरलं.

निघायच्या अगोदरच दोन दिवस—हो, त्या दिवशीं शनिवार असेल, संध्याकाळची वेळ, चांदण्याचे दिवस होते ते—पौर्णिमा किंवा चतुर्दशी असेल—चंद्र लवकरच उगवला होता—मी मैत्रिणींना बरोबर घेऊन उगीच दुसऱ्याचींच शेतें पायाखालीं घालून परत आलें होतें. आम्हीं सगळ्याजणीं आलों त्या आंगणांतच बसलों. दिवेलागण झालीच होती. चुलीपुढची तयारी पण झाली होती. मी लवकरच जाणार म्हणून आई गडबडलीच होती. म्हणून आम्हीं सगळ्याजणी बसलोंशा पाहून ती पण कांहीं तरी बैठं काम घेऊन तिथेंच येऊन बसली. इतक्यांत बाबा पण बाहेरून आले ते तसेच जोत्यावर चढून बसले. भावंडं—कुणी माझ्याजवळ, कुणी शकूजवळ, तर कुणी वत्सीजवळ आणि सुमनजवळ आपल्या आपल्या आवडी निवडीप्रमाणें आणि सोयीसवडीप्रमाणें—हळूंच लगटून बाजूला बसलीं. चिमकुल्या मांड्या घालून, कमलाकार हात करून व त्यांत आपली हनुवटी रोवून सारखी हिच्याकडून तिच्याकडे आणि तिच्याकडून हिच्याकडे उगीचच आळीपाळीनें पहात बसलीं होतीं. मोठीं माणसं बोलत बसलीं कीं मुलेंही पोक्तपणाचा आव आणून तिथं ऐकत बसायचीं, त्यांना नाहीं कुणी म्हणावं? दुखवावं कां? बाळक्या आंगणांत बावळट तोंड करून इकडून तिकडे निष्कारण हेलपाटे घालीत होता तरी माझ्याकडे त्याचें—मी केव्हां त्याला काय सांगेन म्हणून—लक्ष होतेंच. तो एवढ्यांत माहेरच्या माणसांत पूर्ण मिसळला होता. तो आईला कामाला हातभार लावी, बाबांच्या पुढें पुढें सुद्धां करी. त्याचा बावळटपणा हा सर्वांच्या करमणुकीचा एक विषयच होऊन बसला होता. आम्हीं बाहेरून आलों त्या वेळीं त्याला कांहीं तरी काम सांगायचं माझ्या मनांत होतं. पण आंत येतां येतां काय झालं कुणास ठाऊक—का बोलण्याच्या नादांत—तें मी त्याला सांगायचं विसरलेंच. कांहीं तरी मध्येंच विक्षेप आला. आम्हीं काय बोलत होतों त्याचं सुद्धां थोडा वेळ विस्मरण झालं. त्यामुळें आम्हीं आंगणांत येऊन बसलों त्या तशाच. कुणीच कांहीं बोलेना; मागलं बोलणं थांबलं होतं, पुन्हां आरंभ व्हावयाचा होता.

"माणिक," शकूला काय लहर आली कुणास ठाऊक! ती मला म्हणाली "तूं परवां सोमवारींच जाणार म्हणायचीस!—"

"हो मग! जायला नको वाटतं?" मी प्रश्नार्थकच उत्तरलें.

"तें खरं ग. पण आलीस काय आणि निघालीस काय?"

"पण मला महिना होऊन गेला येऊन?" मीं म्हटलें.

"मी कुठें नाहीं म्हणतें? आम्हांला सुद्धां तितकेच दिवस झाले आहेत बरं का बाईसाहेब?" शकू म्हणाली.

"आणि आम्हींही आलों तें केवळ तुझ्याचकरतां–तुझ्याच पत्रावरून हो!" सुमन म्हणाली.

"तेव्हां आल्यासारखी सुट्टी संपेपर्यंत तरी आमच्याबरोबर तूं रहायला हवं होतंस–सुट्टी संपली म्हणजे आम्हीं तिकडे, तूं तिकडे एकदमच गेलों असतों? नाहीं का आई?" वत्सी माझ्याकडे व आईकडे पहात म्हणाली.

"ती काय आतां धर्माची पाहुणी आहे! आतां काय आमचा तिच्यावर हक्क आहे? आली आली, राहिली राहिली! नाहीं–होय म्हणणारीं आम्हीं कोण?" त्यावर आईनें वत्सीला उत्तर दिलें.

"बाकी महिना झाला पण दिवस कसे भुर्रकन् केव्हांच निघून गेले. कळलं देखील नाहीं!" मीं आनंदून म्हटलें.

"पण इतके दिवस राहून आणखी आम्हां सगळयाजणींना पत्रें पाठवून बोलावून आणून केलेंस काय?" शकूनें विचारलें.

"कां बरें?" सुमन माझ्याकडे मिस्किलपणानें पहात म्हणाली, "ही आली–आपल्या आईबापाला चांगलंचुगलं करायला लावून बुडवलं–शेजारपाजरला बुडवलं–आपला इनामदारी डौल दाखविला–आपणां सर्वांना लोकांचे रानमाळ भटकायला लावलें–व्याख्यानांचा रोज पाऊस पाडला–आपली आत्मप्रौढी गायली–आणखी काय करायचं होतं हिनें?"

"होयच नाहीं तरी? आणखी काय मीं करायचं होतं?" मीं पण मान वेळवून तेंच म्हटलें.

"बरोबर आहे!" आतां वत्सी पुढें सरसावली," बोलण्यापेक्षां या श्रीमंतांनीं आणखी काय करायचें असतें? गरीबीबद्दलच्या या लोकांनीं नुसत्या गोष्टी बोलायच्या असतात, काटकुटीनें जखमेला लांबून औषध लावायचं असतं! यापेक्षां या श्रीमंतांनीं आणखी काय करायला हवं? होय ना ग माणिक?"

" बोला बाई काय वाटेल तें ! " मी म्हणालें. खरेंच आजपर्यंत मी त्यांनाच माझीं व्याख्यानं ऐकवलीं होतीं. त्यांचं कांहींच ऐकलं नव्हतं कीं त्यांना बोलायला फुरसद दिली नव्हती व त्यांची नुसती चौकशी केली नव्हती. त्याचं उट्टं आज त्या पुरेपूर काढणार हें मी तेव्हांच समजून चुकलें. त्याकरितांही मी माझ्या मनाची तयारी करूं लागलें.

" कां ग, गप्प कां झालीस ? बोल ना ? कर ना आपलं व्याख्यान सुरूं ? " शकू मला ढोशीत म्हणाली.

" आज माझा बोलायचा वार नाहीं. मी आज तुम्हां साऱ्या जणींचीं व्याख्यानं ऐकायचं ठरवलं आहे ! " मीं पण तसंच उत्तर दिलें. " हं. शकू, तुझं पहिल्या प्रथम व्याख्यान होऊं दे—मग सुमन बोलेल—शेवटीं वत्सी—त्यानंतर—"

" आयत्या वेळीं बाहेरचा कोण उपवक्ता येईल तो—निदान बाबांना आग्रह करूं—आईला बोलायला लावूं—" यावर सुमन हळूंच फाजीलपणानें म्हणाली. " अन् नाहींच कुणी शेवटी बोललं तर शेवटीं श्रीमंत रुक्मिणीबाईसाहेब इनामदार अध्यक्ष या नात्यानें करतीलच समारोप ! घेतीलच सगळ्यांचा समाचार ! अध्यक्ष या नात्यानें तूं व्याख्यात्याचें नांव सुचवलंच आहेस. तसंच व्याख्यानाचा विषयही सांग म्हणजे शकू खांकरत खोंकरत करील व्याख्यानाला आरंभ !—"

" माझी व्याख्यानाची कृति नसते " शकू मध्येंच म्हणाली, " आमची लाइन बोलून चालून मेडिकलची—आमचं कृतीचं व्याख्यान असायचं !"

" तेंही खरेंच ! डॉक्टरी व्याख्यानं नुसतीं काय कामाचीं ? " वत्सी म्हणाली " सुमन, तूंच आपलं कांहीं बोल कशी ! अशी लाजूं नकोस—कुणीकडून श्रीमंत बाईसाहेबांची दोन घटका करमणूक करणं आपलं काम आहे ना ! बोल तर येईल तसंच. "

" मी बोलेन " सुमन म्हणाली, " माझं काय जातें. पण माझं बोलणं पोरीबाळींना रुचण्यासारखं असायचं ! तें जर या थोरामोठ्या सर्वज्ञ श्रीमंतीणीपुढं द्यायला लागलें तर तें त्यांना रुचणार कसं आणि पचणार कुठून ?"

" झालंच तर मग ! " वत्सीनें हताश झाल्याचें सोळा आणे सोंग आणून म्हटलें. " या दोघींनीं रणांतून पळ काढला तर मग, मी तर कोण्या

झाडाचा पाला ? मला कुणी बोलायलाही लावूं नका नी मी बोलणारही पण नाहीं ! ”

“ अहाहा ! ” मला जरासें अवसान चढून मीं म्हटलें, “ तुमच्याकडून नुसतं बोलायचं होईना, तर मग तुमच्या हातून होणार तरी काय ! ”

“ अहो पण बाईसाहेब–” शकू मला घुसळीत म्हणाली, “ तुम्हीं श्रीमंत लोक नुसती बडबडच करीत असतां–तुमच्या हातून कांहीं कार्य होतं का ! श्रीमंत लोकांनीं प्रसंगीं घवघवीत बोलून घ्यावं. कृतीच्या नांवानं आवळ्याएवढं—”

“ कबूल आहे मला ! आम्हीं श्रीमंत–आम्हीं अडाणी–आम्हीं नुसते बोलके आमच्या हातून कांहीं होत नाहीं–सगळं खरं आहे पण मीं म्हणतें, म्हणून तुमच्यासारख्या चार शहाण्यांना कांहीं बोला, कांहीं आम्हांला करायला सांगा म्हणतों आहोंत ना ? पण तुमची वाचा कुठें उघडते ? ”

“ बरं जाऊं दे मागलं ! तुला काय विचारायचं आहे ? विचार आम्हीं सांगायला तयार आहोंत. ” शकूनें गंभीरपणाचा आंव म्हणून म्हटलें. मध्यंतरीं बोलतांना आम्हां सर्वांचेच बोलण्याच्या भरांत आवाज चढत होते. आईला त्यांत काय कळणार ! तिला वाटलें कीं आम्हीं एकेरीवर येऊन भांडूच लागलों आहोंत, तेव्हां ‘ अशा आरडूंओरडूं नका, अन् भांडूं नका बाई ! आपल्या गुण्यागोविंदानें बोला, खेळीमेळीनें वागा ’ असं आई म्हणाली. बाबा कसले तरी जप करीत होते पण लक्ष आमच्याकडे होतंच. आमच्या बोलण्याबद्दल त्यांना काय वाटत होतं कुणास माहित ! मुलांना आमची प्रौढ हमरीतुमरी कळेनाशी झाली असावी. कारण हंसणं खिदळणं नाहीं, कांहीं खायप्यायचं नव्हतं, तेव्हां ती मधूनच पसार होऊन बाळक्याच्या सभोंवतीं जाऊन त्याच्यामागें कसला तरी लकडा लावीत बसलीं.

आईनें सांगितल्यावर आमचा आवाज कमी झाला पण आम्हांला हंसूं आलं. “ आम्हीं कांहीं भांडत नाहीं. बोलण्याच्या भरांत आवाज मोठा होतो आहे इतकंच ! ” असं मी आईला समजावून दिलं. मग मैत्रिणीकडे वळून मी म्हटलं “ हं, काय म्हणतां ? मी विचारूं तुम्हांला ? विचारते हं ! आपण मघाशीं फिरून येतांना मी विचारलंच होतं त्यावेळीं तुम्हीं कुणीच उत्तर दिलं नव्हतं. तेंच पुन्हां विचारतें मी. त्याचं उत्तर तुम्हीं कुणीही द्या.”

" मघाशीं काय विचारलेंस ? आम्हीं नाहीं ऐकलं. विचार आतां ! "

" आपण मघाशीं फिरतांना पाहिलं — दररोज पहातोंच आहोंत — काय ती शेतीची आणि शेतकऱ्यांची दैन्यावस्था ! त्यांची सुधारणा व्हायची कशी, केव्हां ? आणि त्यांना सुखाचे दिवस दाखवायचे कुणी, आणि कधीं ? "

" बारा वर्षे रामायण वाचून शेवटीं रामाची सीता कोण म्हणून आहेच तुझा प्रश्न ! " शकू माझ्यावर उसळून म्हणाली.

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? तूं गरीब होतीस तेव्हां जें तुला सुचत होतं तें श्रीमंत होतां क्षणींच विसरलीस ! श्रीमंतीचा वाण नाहीं पण गुण चांगलाच लागला तुला ! " सुमन म्हणाली. " शेतीकरितां आणि शेतकऱ्यांकरितां तुम्हीं श्रीमंतांनीं आपलीं व्यसनें टाकलीं पाहिजेत, आळस झाडला पाहिजे, श्रीमंती सोडली पाहिजे. गरीब होऊन गरिबींतल्या सुखदुःखांची चौकशी केली पाहिजे. गरीबांकरितां तुम्हीं श्रीमंतांनीं गरीब झालं पाहिजे."

" हें कशाला तूं सांगायला हवंस ? " मी मध्येंच तिला थांबवून म्हटलं. " हें तर मी अगोदरपासूनच करायला लागलें आहे. मी त्या त्या वेळीं पत्रांतून लिहिलं आहे. प्रत्यक्षही कितीदां तरी सांगितलं आहे. मी केलं आहे, करतें आहे. "

" तूं अजून कांहीं केलं नाहींस आणि–" शकूला आतां बोलायला जोर येऊन ती म्हणूं लागली. " कांहीं करीतही नाहींस. रागावूं नकोस किंवा गैरसमजही करून घेऊं नकोस. मी काय म्हणतें तें ऐक आणि मग काय तें बोल. काय ग, नवऱ्याला मोटारींतून घेऊन उभाउभीं नुसतं शेतवाडी-वर जाऊन आलं, एकाद दुसरा शब्द त्या गरीबाशीं मोठ्या मेहेरबानीनें बोललें, इथं माहेरीं जशी आईबापाकडून कोडकौतुक करून घेते आहेस, तशी त्या गोरगरीबांकडून इनामदार म्हणून, श्रीमंतीण म्हणून, त्या लोकांची धनीण म्हणून आपल्या जीवाचं कौतुक करून घेऊन, त्यांनाच बुडवून, त्यांच्याचकडून गळयांत हार घालून घेऊन आलं म्हणजे झालं वाटतं सगळं ? हेंच ना आतांपर्यंत केलं आहेस ? का यापेक्षां कांहीं झालं आहे ? झालं असेल तर बोल ! "

" यापेक्षां जास्त कांहीं केलं नाहीं ! " मी प्रांजलपणें कबूल केलं आणि पुढं म्हटलं " पण अगदींच कांहीं नाहीं त्यापेक्षां मी सुरवात केली हें तर कबूल कराल. माझ्या उपक्रमाबद्दल तरी मला थोडी शाबासकी द्याल ! "

" जेवढं केलंस त्याबद्दल तूं अभिनंदनाला पात्र आहेसच. पण—"

" मग आतां काय पण ? " मी पुढें म्हणालें. " यानंतर मी आणखी काय करायला हवं ? आणि तुम्हीं तरी इतक्या शिकून काय काय दिवे लावणार आहांत तें कळूं द्या ?"

" सुदैवानं तूं श्रीमंत झाली आहेस. तुझ्या श्रीमंतीचा फायदा आम्हांला दे; आमच्या ज्ञानाचा फायदा आम्हीं तुला देऊं ! " शकू उद्गारली.

" अगदीं स्वार्थत्यागपूर्वक देऊं ! " वत्सीनं दुजोरा भरला.

" ऐकलंत श्रीमंत सौभाग्यवती रुक्मिणीबाई इनामदारसाहेब ! " सुमननें गंभीर आवाजानें सुरवात केली—

" हें ग काय हें ? भलताच काय चावटपणा. नुसतं ' माणिक ' म्हणतां येत नाहीं वाटतं तुला ? " मी जरा चिडल्यासारखी होऊन म्हटलें.

" अग पण सध्यां आम्हीं माणिकशीं बोलत नाहीं. श्रीमंत सौभाग्यवती रुक्मिणीबाईसाहेब इनामदाराशीं बोलतों आहोंत. त्यांच्याकडून आम्हांला काम करून घ्यायचं आहे. श्रीमंताशीं विचारविनिमय करायचा आहे. तिथं गरीब बापड्या माणिकशीं बोलून काय करायचं आहे ? " धिटुकलेपणानें सुमनच पुन्हां बोलली.

" चहाटळ आहेस झालं ! " एवढंच म्हणून मी थांबलें. पण लगेच मला पुढं बोलावें लागलें. " हं बोल पुढं काय बोलत होतीस तें ! "

" श्रीमंत रुक्मिणीबाईसाहेब, " सुमननें तेंच पालुपद चालू केलें. " आपल्या राज्यांत म्हणजे जहागिरींत–किंवा इनामी वतनांतील प्रांतांतही शकू उद्यां एम्. बी. बी. एस्. झाली म्हणजे तिला आपली मदत देऊन छोटामोठा दवाखाना स्थापून द्या. आपल्या अखिल प्रजेचं आरोग्यरक्षण ही डॉक्टरीण मोठ्या दक्षतेनें करील ! "

" तसंच–" तिला थांबवून शकूनें तिचीच री पुढें ओढली. " ही सुमन उद्यां विश्वविद्यालयाची सन्माननीय पदवीधर झाल्यावर तूं निमंत्रण आणि आश्वासन दिलंस तर हीही पण डेक्कन एज्युकेशन सोसायटींतल्या

सारख्या विद्वान् पण स्यार्थत्यागी आजन्म सेवकाप्रमाणें तुझ्याकडे एकादें विद्यालय स्थापायला येईल. तुझ्या राज्यांतल्या अडाणी प्रजेला शहाणे करून सोडायला यायला आळस करणार नाहीं! होय ना ग सुमन?"

"अक्षरशः कबुली आहे माझी!" सुमननें कबुली दिली आणि ती वत्सीला म्हणाली, "वत्से, तुझी काम करायची तयारी आहेना?"

"मी होय?" वत्सी बोलली. "मी हिच्याजवळ राहीन. हिच्या सगळ्या उत्पन्नाची देखरेख करीन. हिला उगीच उधळपट्टी करूं द्यायची नाहीं. तुमच्या कार्याकडे कबूल केलेली मदत वेळच्यावेळीं हिला पाठवायला लावीन. कमी कुठें, कां पडत आहे, जास्त उत्पन्न कशानें वाढणार आहे, याकडे लक्ष देऊन वेळोवेळीं हिला सांगत जाईन. हिला आणि खुद्द इनामदारांनाही काटकसरीचं शिक्षण मी चांगलंच देईन. हिच्याबरोबर मोटारींतून हिंडेन, तुमच्या कामावर पण माझीच देखरेख राहील. कमी-जास्त दिसलं तुम्हांला खडसावीन, हिच्या कानावर तक्रारी घालीन! एवढं होईल माझ्या हातून. यापेक्षां काय होणार आहे?"

वत्सीच्या या बोलण्याचं आम्हां सर्वांनाच हंसूं आलें. आम्हीं मोठ्यानें हंसलों. ती मात्र मुद्दाम गंभीर राहिली त्यामुळें आम्हांला जास्तच हंसूं लोटलें!

मध्यें त्यानंतर थोडं आपोआपच बोलणं थांबलें. मी इकडे तिकडे पाहिलें. आई केव्हांच स्वयंपाक घरांत निघून गेली होती. बाबा पण संध्येला गेले होते. आमच्या बोलण्याच्या भरांत तें आमच्या लक्षांतही आलें नाहीं. आम्हांला बोलतांना किती तरी बरं वाटत होतं. आम्हीं जसं कांहीं जग विसरून गेलों होतो. आम्हीं बोलत होतों त्यांपैकीं प्रत्येक गोष्ट पूर्ण झाली पाहिजे, आम्हींच पूर्णत्वाला नेली पाहिजे असं मनाला वाटत होतं. आमचं तें शिळोप्याचं नुसतं करमणुकीचं बोलणं नव्हतं, तर प्रत्यक्ष घटनाच चालली आहे, त्याकरितांच आमची छोटेखानी सभा जमली आहे अशी माझी दृढभावना झाली होती. मी त्या भावनेंत दंग झालें होतें.

थोडा वेळ मध्यें तसाच गेल्यावर शकू म्हणाली, "काय ग माणिक, आम्हांलाच बडबडायला लावलेंस. पण तूं कांहींच बोलली नाहींस. आमची परीक्षा घेतलीस वाटतं? हें पहा, तुम्हीं श्रीमंत असे असतां! लोकांकडून काढून घेतां, पण स्वतःवर वेळ आली कीं तोंडाला कुलूप घालतां. आम्हां

गरीबांच्या शब्दाला आणि स्वार्थत्यागाला तुम्हां श्रीमंतांच्या मतें कांहींच किंमत नाहीं वाटतं ? ”

“ तूं तरी हीच आहेस शकू ! ” वत्सीचा तवा अजून तापलेलाच होता. ती म्हणाली, “ अग ही बोलणार काय ? व ही बोलली तरी हिच्या हातांत काय आहे ? आपली ही सभा म्हणजे उंदरांची सभा ! मांजराच्या गळ्यांत घंटा बांधायचं ठरलं; या अध्यक्षीणबाईनीं कबूल केलं तरी प्रत्यक्ष कार्य कोण करणार ? कसं होणार ? बोलून चालून माणिक, नव्हे रुक्मिणी-बाईसाहेब, म्हणजे श्रीमंत राजाभाऊ इनामदार साहेबांच्या हातची एक सुंदरशी मधुमधु बोलणारी करमणुकीची बाहुली ! ही त्यांना सांगणार काय ? आणि ते हिचें ऐकणार काय ? रुक्मिणीबाईसाहेब पट्टाभिषिक्त राणी म्हणून इनें अष्टौप्रहर तोऱ्यांत आणि आपल्याच सुखांत दंग असा-यचं–तिकडे राजाभाऊसाहेब–प्रत्यक्ष श्रीकृष्णाचाच अवतार ते–आपल्या गोपगोपींच्या मेळ्यांत जगाला विसरून असायचे ! त्यांची हिची महिनेच्या महिने गांठ पडते आहे कशाला ? पडली तरी ही बोलते कशाला ? आणि ही बोलली तरी हिचें ऐकतें कोण ? ऐकलं तरी बोललेलं अमलांत कोणत्या युगांत कुणीं आणायचं ? एवंच काय ? पुराणांतलीं वागीं नेहमीं पुराणांतच जशीं राहतात तशींच आपलीं हीं शिळोप्याचीं बोलणीं ! का हो रुक्मिणी-बाईसाहेब, मी म्हटलें हें खेरं ना ? ”

“ वत्से, तूं भारीच फाजील आणि फटकळ आहेस ! ” सुमन म्हणाली.

“ अग, तिकडून अगदीं माणिकच्या मुठींत यायचं झालं आहे ! उगीच नाहीं कांहीं तिच्या घरीं ती म्हणेल ती पूर्व दिशा होणार आहे. तुला काय ठाऊक आहे ? ” शकू मला बरं वाटावं आणि वत्सीनं उम-जावं म्हणून म्हणाली. “आपल्या घरीं माणिकनं आपल्या शहाणपणाची छाप पाडली नाहीं असं का तुला वाटतं ? अग तसं झालं आहे, शिक्षणाचा विजय आहे म्हणून तर आपल्यांत बसून माणिक हें बोलते आहे ना ? ”

शकूचं बोलणं ऐकून मला बरं वाटलं. माझं सासरचं नांव रुक्मिणी होतं. त्यावरूनच कल्पनेचें तारांगण करून स्वारीला श्रीकृष्णाची उपमा देऊन वत्सलेनें आपल्या बोलण्यांत बेफाटपणा केला—जरी ती म्हणाली तसंच खरं होतं—तरी तें तिचें बोलणं मला किंचित् लागल्याशिवाय राहिलं

नाहीं. तेवढ्याच तिच्या बोलण्यानें, चांदणी, हरिणी, येसू, यांच्या मूर्ती क्षणार्धात झर्रकन् डोळ्यापुढें येऊन गेल्या. मन अस्वस्थ झालं! पण शकूनें तें सांवरलें. 'माझ्या घरांत मी म्हणेन ती पूर्व दिशा होणारी आहे!' असं माझ्या वतीनें शकूनं सांगितलं. मला तितकंच अवसान आलं. मला तसा भरंवसा देण्याची वेळ आलीही होती. शिवाय वत्सी मुद्दाम कुत्सितपणानें पण बोलली नव्हती म्हणून मला तिचा राग आला नाहीं.

आईचं आंतून जेवायला बोलावणं येईपर्यंत आम्हीं कांहींबाहीं बोलतच होतों. आईनं माझ्या सगळ्याच मैत्रिणींना ठेवून घेतलं होतं. मी जाईपर्यंत कुणीच मला सोडूं नये अशी आईची आणि माझी इच्छा होती. आणि मैत्रिणींनीं ती मान्यही केली होती. मैत्रिणी माझं कौतुक करीत होत्या, माझं सुख वाढवीत होत्या, मला मानीत होत्या हें पाहून आईला किती किती बरं वाटत होतं. आम्हीं जेवतांना बोलत होतों, अगोदरही बोलत होतों, नंतरही बोलत होतों. सारं बोलणंच बोलणं आणि पुन्हां तेंच तेंच! पण कुणाला नकोसं वाटत नव्हतं; कुणी कंटाळत नव्हतं! त्या नादांत आईला हातभार लावायची कुणाला आठवण राहणार? मध्येंच आठवण होई—लगेच नाहींशीही होई.

रात्रीं किती उशीरा मैत्रिणी आपापल्या घरीं गेल्या. मी बरोबर कंदील देऊन बाळक्याला सगळ्यांना पोंचवायला सांगितलं. दुसरे दिवशीं लवकर यायचं कबूल करून घेऊन मग मी त्यांना सोडलं. झोंप येईपर्यंत आईशीं बोलत होतें. तिच्याशीं बोलावयाच्या गोष्टी निराळ्या! तिच्याशीं बोलत असतांना किंवा तिचें बोलणं ऐकत असतांना सुद्धां माझ्या डोक्यांत निराळ्या कल्पना येत. मी कल्पनेचे मनोरे रचित होतें. त्याच मनोऱ्याचीं भव्य दृश्यें पुन्हां पुन्हां डोळ्यापुढें येत. त्यांत चित्त लागलं म्हणजे आई काय सांगते याकडे मध्येंच दुर्लक्ष होई. पुन्हां भानावर आलें म्हणजे 'अं? काय म्हणालीस आई?' असं विचारी. तेव्हां मी दमलें असं समजून ती म्हणे 'कांहीं नाहीं. आज बोलून बोलून दमली आहेस. नीज आतां स्वस्थ!'

नेहमीं अशाच स्थितींत मला माहेरीं केव्हां तरी झोंप लागे. आजही तसेंच झालें. मला बोलतां बोलतां झोंप केव्हांच लागली. झोंपेंत स्वप्नें पडत होतीं; स्वप्नांत माझे मनाचे मनोरे दृश्य स्वरूप घेत असल्याचें दिसत होतें.

शकूचा दवाखाना, सुमनचें विद्यालय, वत्सीची व्यवस्थित कामं–आमचं सगळयांचें एकत्र सुखाचं राहणं–सगळं सगळं कांहीं मनाजोगतं झाल्यासारखं स्पष्ट दिसत होतें. मी स्वप्नांत हंसतसुद्धां होतें. त्या सकाळीं अशाच कसल्या तरी प्रसंगानें हंसत होतें. मला कुणीसं जागं केलं, मी जागीं झालें तों समोर मनोहर–हो, मनोहरच होता तो–समोरच्या खुर्चीवर बसलेला दिसला. आईनें मला झोपेंतून जागं केलं. मनोहर तुला भेटायला आला आहे म्हणून सांगितलं आणि ती मनोहराला आणि मला चहाफराळाचं आणायला म्हणून गेली. माहेरीं मुलींचं असंच होतं, त्या सुस्तावतातच आणि अशा हव्या तितक्या वेळ आपल्या खुश्शाल निजतात. डोळयावरून हात फिरवित केंस सांवरले व मीच मनोहराकडे पाहून आणि कांहींशी मनाशीं हंसलें. त्यानें आपल्या वृत्तींत कांहींच फरक दाखविला नाहीं. तो हंसला, पण त्याच्या हंसण्यांत चिडण्यासारखं कांहीं नव्हतें. मी त्याच्याकडे स्थिर दृष्टीनें थोडा वेळ पाहिलें व काय बोलावं या विचारांत होतें तों तोच म्हणाला—

" हं! श्रीमंतसकलगुणालंकृत वज्रचूडेमंडित रुक्मिणीबाईसाहेब इनामदारसाहेब, झाली का झोंप ? "

" इश्श ! हें रे काय मनोहर ?— " मी रोखून म्हटलें.

" राहिलें. तें आवडत नसेल तर–कसं काय देवी कनकश्री ? असें विचारतों ! " मनोहर उद्गारला.

" नीट नाहीं बोलतां येत वाटतं ? तुम्हीं बहिणभावांनीं असं बोलायचा ठरावच केला आहे वाटतं एकमतानं ! " मी जरा खरीच रागावलें.

" बरं तर ! काय म्हणूं तर ? " मनोहरानें आर्जवून विचारलें.

" सरळ माणिक म्हणतां येत नाहीं का ? "

" पण मला तुला देवी कनकश्रीच म्हणावंसं वाटतं ! माणिकइतकंच मला तें आवडतं, त्याला मी काय करूं ? "

" तुला वाटेल तें म्हण ! "

" मग झालं तर ! "

" अन् मी तुला मनोहराच्याऐवजीं दुसरंच कांहीं म्हटलं तर ? "

" तूं मुखत्यार आहेस ! तूं कांहीं म्हटलंस तरी मला तें आवडेल. शिवाय श्रीमंतांना दुसऱ्याला वाटेल तीं नांवें ठेवायचा अबाधित अधि-

कार असतोच तो मी कोण काढून घेणार ? मी तुझ्याकडून नांवं ठेवून घ्यायलाच आलों आहे ? मला वाटेल तीं नांवं ठेवल्यावर तरी जाईल ना श्रीमंतांचा राग ?"

" पुरे नाहीं का झाला चावटपणा ? मी इथं आलें त्या दिवशीं स्टेश-नावर दिसलास त्यावर जो कुठं गुप्त झालास तो—"

" उद्यां तूं जाणार म्हणतांना आज उगवतों आहे."

" म्हणून त्याची अशी संपादणी करतो आहेस वाटतें."

" कां होईना. पण तूं परत जायच्या आधीं येऊन गांठलें ना तुला ! माणिक, मी रात्रीं आलों त्या वेळीं शकूकडून कळलं कीं, तूं उद्यां परत जाणार म्हणून. मग आम्हीं उजाडेपर्यंत बोलतच बसलों होतों म्हणेनास !"

मध्येंच आईनं बाळक्याच्या हातीं चहाफराळाचें पाठविलें. मला गुळणा करायला पाणी आणलं. जरा वेळ बोलणं थांबलं. मनोहर महिना-भर नव्हता म्हणून मला चुकल्यासारखं वाटत होतं. माहेरच्या सुखांत तें एक वैगुण्य वाटत होतं. त्याच्याबद्दल किती वेळां तरी मी शकूला विचा-रलं पण तो गांवाहून परत आल्याशिवाय ती तरी काय करणार ? त्याला असा अकल्पित आलेला पाहिला व मला आनंद झाला. माझ्या सुखाची परिपूर्णता झाल्यासारखं मला वाटलं. तो माझ्या सासरीं आला होता त्या वेळीं माझी त्याची धड भेटही झाली नव्हती; आम्हांला बोलायला मिळालं नव्हतं. त्या बाबतींत मी त्याची अपराधी होतें. तो ती ओळख देऊन टोमणा मारील कीं काय ही भीति वाटत होतीच. पण मी सपशेल क्षमा मागायचं ठरवलं होतंच ! त्याच्या अगोदर शकूजवळ मी ती सर्व हकीकत सांगूनही टाकली होती व तिच्याजवळ क्षमाही मागून मोकळी झालें होतें. तिनं पण मनोहराबद्दल अगोदरच निर्वाळा दिला होता. पण समोर मनो हराला पाहिल्यावर मागें घडलेला प्रकार डोळ्यापुढें दत्त म्हणून उभा राहिल्याशिवाय राहिला नाहीं !

मी गुळणा करायला उठलें तेवढ्या वेळांत वरील सर्व विचार डोक्यांत भरभर येऊन गेले. उठतांना मनोहराला म्हटलं, " हं, कर ना सुरवात–"

" तूं ये ना गुळणा करून !" तो म्हणाला. तो माझ्याकरितां थांबला. मी त्याच्याकडे टक लावून तेवढ्यांत पाहिलें. तो पण माझ्याकडे सादरतनं

पहात होता. मी गुळणा करीत असतां तो पुढें म्हणाला, " तूं इथं भेट-लीस म्हणून माणिक, मला इतका आनंद झाला म्हणतेस ! तूं आलीस आणि मी निघालों. तूं निघालीस आणि मी आलों, पण आलों म्हणूनच बरं झालं. उभाउभी कां होईना तुझी गांठ पडली ! पुष्कळ झालें. येण्या-सारखी परिस्थिति नव्हती. काम झालं नाहींच. पण तुझ्याकरितां म्हणून शेवटीं तसाच आलों. तूं गेली असतीस आणि मी आलों असतों म्हणजे मला फार वाईट वाटलं असतं ! "

मी गुळणा करून आलें. आम्हीं फराळाला सुरवात केली. मी त्याचं बोलणं अत्यंत उत्सुकतेनें ऐकत होतें. माझ्या भेटीनें माझ्याप्रमाणेंच त्याला आनंद झाल्याचें ऐकून माझा आनंद आणखी दुणावला. चहा पीत असतां तोच पुढें म्हणाला, " म्हणजे त्याचं असं–तुझ्या घरीं येऊन तुझी भेट नाहीं आणि—"

" मनोहर, स्या बाबतींत मी तुझी अपराधी आहें " मी कबूल केलें.

" छट् ! मुळींच नाहीं. तुझ्याशीं काय त्याचा संबंध आहे ? मी तुझ्या-कडे आलों नव्हतों. तुझी परिस्थिति मी ओळखीत होतों."

" पण तूं त्या भावजींच्या बरोबर आला होतास कशाला ? "

" मला ॲग्रीकल्चर कॉलेजमध्यें शिरून बी. एजी., एम्. एजी. व्हायचं आहे. पण नुसती इच्छा असून काय उपयोग ? पैशाची तरतूद झाली पाहिजे ना ? म्हणून एकादा श्रीमंत इनामदार गांठावा म्हटलं. मदत मागावी, शिकावं, त्याच्या मोबदल्यांत त्याच श्रीमंतांची शेती सुधारून द्यावी. आपला फायदा–श्रीमंतांचा फायदा करून द्यावा, घ्यावा या उद्देशानें आलों होतों. तुझा दीर–बाबूराव–मला स्नेही समजतो. चांगला आहे माणूस ! डोकेबाज आहे. त्याच्या हातीं पैसा असेल तर तो पुष्कळ गोष्टी चांगल्या करील ही माझी खात्री आहे. त्याच्या कल्पना मला माहीत आहेत. माझे हेतु त्याला ठाऊक आहेत. म्हणून तो म्हणाला माझ्या श्रीमंत झालेल्या इनामदार भावाकडे चल; जमलं तर बघूं दोघांबद्दल ! म्हणून आलों. प्रत्यक्ष पाहिला तो इनामदारी खाक्या आणि ती इनामदाराची प्रभावळ ! तो सारा डौल आणि एकंदर रागरंग ! पण अधिक वर्णन करूं लागलों तर तुला राग येईल म्हणून पुरें करतों. आतांपर्यंत जसा इतरत्र अनुभव आला तसाच तुझ्या

येथेंही. म्हणून जसा गेलों तसा परत आलों. त्या बाबतींत कांहीं बोललोंही नाहीं."

"मग अजून सुद्धां कुठें जुळलेंच नाहीं का? त्याकरितांच हिंडायला गेला होतास का?" मी सावकाश विचारलें.

"होय, त्याच उद्योगांत होतों; काहींनीं बोलावलं होतं, गेलों. पण शेवटीं सर्व ठिकाणीं नकारघंटाच ऐकला, आलों परत!" असे निराश उद्गार सुद्धां मनोहरानें सहजपणें काढले. मला वाईट वाटलें. मनांत आलं, मनोहराला शिक्षणाला जर आपल्याला साह्य देतां आलं—स्वारी माझें ऐकायला लागली आहे—हें सांगितलं तर ऐकेलही—तर मनोहराचा केवढा आपल्याला फायदा होईल. शेतीची सुधारणा, ती नवीन तऱ्हेनें पिकाऊ करण्याला साह्य, त्या लोकांवर प्रत्यक्ष देखरेख—त्यांच्या आपल्यांतला हा सुशिक्षित दुवा जर आपल्याला जोडतां आला, तर केवढं तरी प्रचंड कार्य होणार आहे! मग हें कां आपण करूं नये? शकूची शिक्षणाची सोय झाली आहे. मनोहराची व्हायची आहे. याच्याकरितां आपण स्वार्थत्याग करूं. शकू आपल्याकडे डॉक्टर म्हणून येणार, सुमन येणार, वत्सी येणार! तसाच मनोहराचा कायमचा लाभ झाला तर—आम्हीं सर्व मिळून राहिलों—केवढें तरी भव्य काम आमच्या हातून होईल. केवढी जनसेवा होईल! असे किती तरी विचार भराभर मनांत येऊन गेले! मन तुडुंब झालं आणि माझ्यानें रहावेना. मी मनोहराला म्हटलें, "मनोहर—"

"काय?" एवढेंच म्हणून तो माझ्याकडे पाहूं लागला.

"तूं भावजींच्याबरोबर एकदां आला होतास तसाच पुन्हां येशील?"

"कां? तूं इनामदारांच्या जवळ शब्द टाकणार आहेस माझ्याबद्दल?"

"हो. तसा प्रयत्न करावा म्हणत्यें!"

"मग यायला काय हरकत आहे? काम माझं आहे. आपल्या कामाकरतां हजार हेलपाटे घालायला लाज कसली?" मनोहर म्हणाला, "आणि तूं मला असं कांहीं विचारशील असं मला अगोदर थोडं वाटलंही होतं!"

"असं का? तें कसं काय?" मी उत्सुकतेनें मनोहराला विचारलें.

"शकूनें मला सांगितलं ना? तूं आपल्या पराक्रमानें आपल्या घरीं पश्चिमेला सूर्य उगवायला लावूं लागली आहेस म्हणून!" मनोहर उत्तरला.

" म्हणजे ?—" मी हंसून विचारलें.

" म्हणजे काय ? आजकाल श्रीमंत इनामदारांची बुद्धि सत्कार्याकडे वळवावयाची म्हणजे पश्चिमेला सूर्य उगविण्याइतकंच कठीण आहे तें ! पण तूं तें केलं आहेस ! आनंद आहे मला. तूं शकूला, सुमनला, वत्सीला आपल्याकडे नेणार आहेस–ठीक आहे. परमेश्वरी इच्छा असेल आणि तुझ्या प्रयत्नाला यश यायचं असेल तर माझी तयारी आहे. इनामदारांनीं माझ्या शिक्षणाला मदत केली, तर स्वार्थत्यागपूर्वक मी आजन्म तुझ्या-साठींच झटेन ! तुमच्याजवळच राहून तुमचा आणि माझा उत्कर्ष करून घेईन ! "

" मग मीं उद्यां जायचं ठरविलं आहे, उद्यांच येशील माझ्याबरोबर ? "

" हो, आनंदानं ! " मनोहरानें पटकन् उत्तर दिलें. मनोहर माझ्या-बरोबर यायला कबूल झाला. मला गगनांत मावेना इतका आनंद झाला. माझी शंभर टक्के खात्री होती कीं स्वारीला मी मनोहरच्या संबंधानें समजा-वून सांगितल्यावर ऐकणं झालंच पाहिजे म्हणून ! सगळ्यांचेंच ज्यांत कल्याण आहे तें ऐकणं कां होणार नाहीं ?

किती–किती गोष्टी माझ्या मनासारख्या होत चालल्या होत्या ! किती–किती मी माझ्या मैत्रिणींना आणि मित्राला आश्वासनें देत सुटलें होतें. प्रतिक्षणीं माझ्या भव्य मनोरथांची उंची एकसारखी वाढत वाढतच चालली होती. आम्हीं त्या आनंदांत आहोंत–त्याबद्दलच बोलत आहोंत तोंच शकू आली, सुमन आली, वत्सी आली. पुन्हां त्याच गोष्टींची फिरून एकदां उजळणी झाली ! मनोहराला आनंद झाल्याचें पाहून मला किती आनंद वाटला ! आम्हीं सगळींजण एकत्र येणार, राहणार, कार्य करणार, सग ळ्याच कल्पना किती आनंदकारक, उत्साहजनक, आशापूर्ण, भव्य, सुन्दर होत्या नाहीं का ? आणि त्या का फार दूर होत्या–आहेत ? उद्यां मी सासरीं गेलें कीं एकेका गोष्टीला आरंभच होणार होता !

---

# अण्णाचें अंतरंग—

## प्रकरण पंधरावें

### जाळ्याची अचूक फेंक

"चला ऽ ऽ अण्णासाहेब परत. आतां यापुढें तुमचा आमचा सामना !"

राजाभाऊंनीं सहज पण असा एक सणसणीत प्रेमाचा परिचित गुद्दा माझ्या पाठीवर ठेवून देत म्हटलें. 'अहाहाऽ' तोंडानें करीत मी हंसलों आणि म्हटलें, "राजाभाऊसाहेब, फार दिवसांनीं आपला हा प्रेमाचा प्रसाद मिळाला बोवा आपल्याला ! फार फार आनंद झाला आज ! माझी पाठ या गुद्याच्या देणगीला विसरली होती म्हणून देणगी मिळतांना जरा कचरली ती; पण आपले हात माझ्या पाठीला विसरले नाहींत हें विशेष वाटलें. हाताचा दानशूरपणा पहिल्याइतकाच घवघवीत आणि ठसठशीत आहे हें अगदीं अनुभवानें सांगतों मी" असें म्हणून मी उसन्या हंसण्याचा प्रयत्न करीत आहें, इतक्यांतच लागोपाठ आणखी पांच सात गुद्दे राजभाऊंनीं माझ्यावर

अगदीं उत्कट प्रेमानें लादलेच. माझा जीव तोंपर्यंत अर्धमेला व्हायच्या बेताला आला परंतु तें सर्व मोठ्या धैर्यानें मला सहन करणें भागच होतें. कोणत्याशा साधुमहाराजाची गोष्ट मी ऐकली होती कीं, दर्शनाला येणाऱ्या भक्ताला त्या साधुमहाराजानें दगड धोंड्यांनीं मारायला सुरवात केली आणि शिव्यांच्या लाखोलीला आरंभ केला म्हणजे त्या भक्ताचा भावी काळ उत्कर्षाचा आला आहे असें ठाम समजावें! तेंच तो गुरुमहाराज शरणागतासंबंधानें गोड गोड बोलूं लागला, त्याच्याकडे पाहून नुसता हंसूं लागला म्हणजे समजावें त्या भक्ताचीं शंभर वर्षें पुरीं लवकरच भरणार म्हणून! तशांतली आमच्या राजाभाऊंची गत होती. आजचे हेच त्यांचे गुद्दे आमच्या भावी चलतीचे सूचक होते. मध्यंतरीं त्यांच्या गुद्यांचा रतीबही बंद झाला होता आणि त्याबरोबर आमच्यावरची त्यांची कृपादृष्टिही मिटली होती. आज गुद्द मिळाले. शिव्यांचीही सुमनवृष्टि मिळण्याचा भरंवसा होता म्हणून आमच्या अभ्युदयाची आम्हांला खात्री होती. गोपाळभय्या मोटारीकडे अगोदरच जलदीनें पुढें गेल्यामुळें तो गुद्यांतून तर वांचला होता. मला त्याच्या भाग्याबद्दल धास्ती वाटली पण मी लगेच मनांत आणलें कीं गुद्दे नसले ह्मणून काय झालें? मोटारींतून जातांना राजाभाऊंकडून शिव्यांचा प्रसाद प्रसंग साधवून देऊं म्हणजे त्याच्याही भाग्योदयाबद्दल निष्कारण हुरहूर राहणार नाहीं!

राजाभाऊंचे माझ्या पाठीवर गमतीनें गुद्यावर गुद्दे चढूं लागले तसा मी उघड्या मैदानांत भर स्टेशनवर खूप मोठमोठ्यानें ओरडूं लागलों. तेव्हां "अण्णा, लेका, गाढवा, घोड्या, बोकडा, बैला, म्हशीच्या प्राणनाथा असा आग लागल्यासारखा ओरडतोस काय? मी काय तुझा जीव घेतों कीं काय? सहज गमतीनें करमणुकीखातर पाठीवर थाप मारतों आहे तर गुरासारखा ओरडतो आहेस–" अशी पूर्वकल्पित शिव्यांची पुष्पांजली मला मिळाली. गुद्द्यांचा प्रसाद चालू होताच. आतां मला बरें वाटलें. माझ्या भावी भाग्योदयाबद्दल माझी खातरजमा झाली. मी राजाभाऊंना तसें स्पष्ट त्याच वेळीं बोलून दाखविलें.

सौभाग्यवती श्रीमंत वहिनीसाहेबांना त्या दिवशीं आगगाडींत बसवून दिल्यावर आम्हीं घरीं परत जायला निघालों त्या वेळची ही गोष्ट आहे.

वहिनीसाहेबांचा वियोग त्या दृष्टीआड होतांच राजाभाऊंना स्वाभाविक वाटूं लागला आणि त्या वियोगाचें अंशतः परिमार्जन व्हावें म्हणून राजाभाऊंनीं आमच्या पाठीची आणि त्यांच्या हातांची दोस्ती सुरू केली. मी जास्त आरडाओरडा करूं लागलों. तेव्हां त्यांनीं मी उगाच ओरडूं नये म्हणून मनांतलें गुपित हलकेच माझा कान चांगला लांब करून त्यांत सांगितलें. " मूर्खा, अजागळा, मठ्ठा, तुमच्या वहिनीसाहेब गेल्या, मनाला करमेना म्हणून तुझ्याशीं जरा हें करतों आहे —"

" अहो, पण श्रीमंत– " मी जरा आंग चोरीत आणि दूर पळत म्हणालों, " वहिनीसाहेब माहेरीं गेल्या तर त्यांची जागा मी का भरून काढूं ? त्यांची सर या जन्मांत मला कशी येणार ! आणि तुमच्या करमणुकीला मी समर्थ कसा होऊं ?"

" चल गाढवा ! " करीत उत्तरादाखल राजाभाऊंनीं माझ्या पाठीवर आणखी एक जोराचा गुद्दा ठेवून दिला.

आम्ही बाहेर मोटारीजवळ आलों. राजाभाऊ मोटारींत जाऊन बसले. गोपाळभय्यानें इंजिनांत पाणी घातलें व तो पुढें बसला. राजाभाऊ खरेंच अस्वस्थचित्त झाल्यामुळें त्यांनीं मलाच गाडी चालविण्याचा हुकूम फर्माविला. ड्रायव्हर आणलाच नव्हता. स्टेशनवर येतांना ऐटींत राजाभाऊंनींच मोटार हाकली होती. त्या वेळीं वहिनीसाहेबांचं कौतुक चाललं होतं. पण परत जातांना तसं काय असणार ! म्हणून त्यांनीं मला मोटारचें सुदर्शन चक्र हातीं धरायला लावून सारथी बनविलें. आज्ञेबरहुकूम आम्हीं पुढें विराजमान झालों. गाडी चालू झाली.

चालतां चालतां सहज माझ्या मनांत एक कल्पना आली. लगेच शुभं च शीघ्रं म्हणून मनाचा कांहीं एक निश्चयही करून टाकला. एकदां गोपाळभय्याकडे पाहिलें तसेंच मागें वळून पाहिलें, राजाभाऊ मागें रेलले होते. त्यांच्या दोन्हीं हातांची गोफण मानेमागें होती. स्वारीनें डोळे मिटून घेतले होते. बहुधा वहिनीसाहेब परत येईपर्यंत कालक्रमणा कशी करावी असाही विचार त्यांना सतावीत असेल. तें एक दृष्टीनें मला बरेंच वाटलें. आमच्या पथ्यावर पडलें तें. राजाभाऊंचा काल आनंदांत घालविण्याची जबाबदारी आतां ओघानें आमच्याकडे आली. त्यांच्याकरितां आणि खरेंच

बोलायचें झालें तर त्याच्यापक्षां आमच्याकरितांच आह्मांला ती जबाबदारी संभाळणें जरूर होतें. मधले कांहीं दिवस राजाभाऊंना वहिनीसाहेबांनीं अगदीं बंदिखान्यांत घालून अष्टौप्रहर आपला पहारा ठेवला होता, आपली हुकमत चालविली होती व त्यांना आमच्या दृष्टीपासून दूर केलें होतें. आज त्या प्रत्यक्ष दूर झाल्या– कशा कां होईना, किती थोडे दिवस कां होईना पण– आपखुषीनें दूर झाल्या होत्या. आह्मांला ही सुवर्णसंधीच मिळाली होती. वहिनीसाहेब आणखी कांहीं काळ राजाभाऊंपासून दूर न होत्या, तर माझी, गोपाळभय्याची आणि आणखी कितीकांची तरी धडमत नव्हती. आह्मांला देशोधडीलाच लागणें भाग पडणार होतें. पण थोड्या अवकाशांतच आमच्या पूर्व पुण्याईमुळें देवानें आमच्याकडे पाहिलें. वहिनीसाहेब दूर झाल्या; राजाभाऊंचा बंदिवास संपला; त्यांच्यावरचा पहारा उठला; राजाभाऊ पूर्ववत् आणि सहीसलामत आमचे आमच्या ताब्यांत मिळाले. वहिनीसाहेब दूर झाल्यामुळें ते जरासे अवस्थ झाले होते हें स्वाभाविकही होतें. तो कांहीं दिवसांच्या संवयीचा एक परिणाम होता. परंतु राजाभाऊंची ती क्षणिक अस्वस्थता घालविण्याचा रामबाण आमच्याजवळ होता. त्याच औषधाची उपाययोजना तात्काळ राजाभाऊंच्या प्रस्तुत प्रकृतीवर करावी आणि त्यांना ताबडतोब ताजेतवाने करावे असें माझ्या मनांत आलें. मला हायसें वाटलें– नव्हे एक प्रकारचा खूप उत्साह आला. वहिनीसाहेबांची माझ्या मनावर दहशत बसली होती. त्यांचा जबरदस्त दाब माझ्या मनावर बसला होता. तो जरा दूर होतांच माझ्या मनानें एकदम उड्डाण मारलें. मन आणि मनापक्षांही गाडी मोकाट सुटल्यामुळें स्टेशनपासून परत गांवापर्यंत आम्हीं हां हां म्हणतां आलों. आम्हीं गांवांत शिरलों. काय झालें कुणास ठाऊक, का गोपाळभय्यानें कोपरखळी दिल्यामुळें, गाडी सरळ रस्त्याची बाजूच्या रस्त्यानें निघाली. गांवांत शिरल्यावर जरा पुढें जाते न जाते तोंच समोरून वैरणीनें भरलेल्या गाड्या अरुंद रस्ता भरगच्च अडवून पुढें आल्या, व बाजूच्या बोळांतून लगबग करीत गायीगुरांचें एक खिल्लारही आडवें आलें. बरं तर बरं, नाहीं तर त्या वेगांत त्या वेळीं, त्या ठिकाणीं माझ्याकडून एकाद्या जनावराचा घात व्हावयाचा ! गोपाळभय्या तितक्यांत ओरडून "अरे, अरे, अण्णू, अण्णू, थांब, थांब जरा" असें

म्हणाला. मी चपळाईनें, खर्र्रर्र करीत ब्रेक दाबला म्हणूनच गाडी उभी राहिली. गाडीचा थांबवितांनाच कर्णकर्कश आवाज झाला व गुरांना पळविण्याकरिता जोरानें मोटारचा पोंगाही पण मी दाबला. त्यासरशीं राजाभाऊ खडबडून सांवरून बसले. डोळे उघडून आणि पुढें वांकून "काय? काय झालें रे अण्या? काय आहे?" असें मला विचारताहेत, तों त्यांना समोरचें रस्त्यांतलें दृश्य दिसलें. आणखी दुसरीकडे वळून सहज पाहातात तों–तों काय? चांदणीच्या दारासमोर आपली गाडी उभी! गाडीचा आवाज आणि पोंगा ऐकून चांदणी सहज पण घाईनें काय झालें म्हणून पाहण्याकरितां दार उघडून बाहेर आलेली! दोघांचें नेत्रमीलन झालें. आमचें दोघांचेंही त्या दृश्याकडे तितक्यांत लक्ष गेलें! 'ऑं? हें काय? ही इष्टापत्ति अचानक कशी उद्भवली?' असें मी स्वतःशींच उद्गारलों. तितक्यांत माझें लक्ष राजाभाऊंकडे गेलें. ते चांगलेच गडबडलेले होते. त्याची दृष्टि अजून चांदणीवर खिळली होती! चांदणी किंचित् मागें सरकली पण तिनेंही राजाभाऊंवरची नजर ढळवली नव्हती. ती आनंदानें हंसत होती!

तिची कल्पना झाली असावी राजाभाऊ आज मुद्दाम आपल्याकडे आले.

आम्हीं या वाटेनें कसे आलों व कां याचें माझें मलाच कोडें पडलें.

राजाभाऊंकडे पाहिलें त्या वेळीं त्यांनीं माझ्याकडे पाहिलें. त्यांना वाटलें मी मुद्दामच त्यांना इकडे चांदणीकडे घेऊन आलों.

कसें झालें आणि काय झालें पण हें असें झालें इतकें खरें!

"यावं! यावं म्हटलें इनामदारसाहेबांनीं! बारा वर्षांनीं गरिबाची आठवण झाली म्हणायची एकदांची!" चांदणी राजाभाऊंना उद्देशून म्हणाली. "यावं ना आंत! यायचं ते यायचें मग असें दाराबाहेर रस्त्यावरच गाडींत कशाला बसून राह्यचं! नायकिणीच्या घरापुढं, असं दिवसा इनामदारासारख्या श्रीमंतांनीं राहूं नये म्हटलं. लोक तरी काय म्हणतील?"

समोरच्या गाड्यांची रांग अजून संपायची होती, एक म्हसरूं तर गाडीकडे मोहरा करून समोर उभं होतं. राजाभाऊंचा नाइलाज झाला. त्यांनीं माझ्याकडे 'काय करायचें?' अशा अर्थीच पाहिलें.

"मी काय सांगूं राजाभाऊ? चांदणी बोलावणारी आहे, तुम्हीं जाणारे आहांत! म्यां मैत्रेयानं मध्येंच कां लुडबूड करावी. अनायासें या बाजूनें

आलों आहोंत तर चलावें पांच मिनिटें " मी सल्ला दिली. चांदणीच्या घरीं पाऊल टाकायचं नाहीं, अशी शपथ तर नाहीं ना वहिनीसाहेबांच्या जवळ घेतलेली, असें किंवा वहिनीसाहेब परत येईपर्यंत या चांदणीवहिनी राजाभाऊंना रंजवितील ना योग्य प्रकारानें, असें बोलून जाणार होतों. परंतु तसं बोलण्याची ती वेळ नव्हती. शिवाय थोडक्यावरच भागलेंही. माझी सल्ला मानवली म्हणा किंवा चांदणीला पाहिल्यावर स्वारी आपसुखच विरघळली म्हणा, मुकाट्यानें गाडींतून स्वारी चांदणीच्या घरांत शिरली. मी मनांत म्हटलं हें एक बरंच झालं. सुरवातीलाच हा शुभशकुन झाला म्हणायचा! राजाभाऊंच्या पाठोपाठ मी व माझ्यामागें गोपाळभय्या तिच्या घरांत गेलों.

राजाभाऊ फारा दिवसांनीं आणि अकल्पित घरीं आल्यामुळें चांदणीला जितका आनंद झाला तितकीच तिची धांवपळ उडाली. बैठक साफ करायची, तक्के टेकायला ठेवायचे, तबकांत पानतंबाखूचें आहे–नाहीं पहायचें, यांत दहा पांच सेकंद तिची नुसती त्रेधा उडून गेली, पण जातीवंतच ती! तेवढ्यांत तिनें सगळीकडे ठिकठाक केलं, सिगारेटची पेटी बाहेरून विकत आणायला गोपाळभय्याला आर्जवून सांगितलं, जवळचे पैसे त्याच्या हातांत दिले व बाहेरच्या दारापर्यंत तो गेला इतक्यांत 'आलें अं!' करीत आणखी कांहीं सांगायला म्हणून ती त्याच्यामागें धांवली. राजाभाऊ माझ्याकडे आणि त्या घरांत चोंहीकडे उगाचच पहात होते. मी त्यांच्यांशीं कांहींच बोललों नाहीं; मला हंसू येण्याचा रंग होता तें आवरण्याच्या प्रयत्नांत मी दक्ष होतों.

चांदणी आली; बरीच दूर बैठकीच्या कोंपऱ्याजवळ बसली, पट्ट्या करण्याकरितां तिनें तबक ओढून घेतलें व बाजूला पिकदाणी होती ती तेवढ्यांत डाव्या हातानें उचलून राजाभाऊंसमोर ठेवून दिली. सुपारी कातरणें, पानाच्या देठीं काढून ती मांडीच्या बाजूला पुसणें, चुन्याची डबी उघडून पाहून चांगला चुना आहे कीं नाहीं पहाणें, या क्रिया होत असतां मधून मधून चांदणी वर मान करून राजाभाऊंकडे पाही, पुन्हा खालीं पाही, किंचित् हंसे, तर पुन्हां तिच्या नाकाचा शेंडा आणि गाल लाल झाल्यासारखे दिसत. राजाभाऊ कांहींच बोलत नव्हते; नुसते तिच्याकडे आणि तिच्या

सहजसुंदर हालचालीकडे एकाग्रतेनें पहात होते. कित्येक दिवसांत तिच्याकडे न येण्याचा अक्षम्य अपराध त्यांच्याकडून झालेला होता, त्याची जाणीव होऊन त्यांना काय, केव्हां, कसें बोलावें हें सुचत नसावें! चांदणी काय बोलेल आणि काय नाहीं याबद्दलही धास्ती उत्पन्न झाल्याचा संभव होता; मलाही तशी थोडी धास्ती होतीच. म्हणून राजाभाऊ दुसरीकडे पहात असतां संकेतार्थीं मी चांदणीकडे पाहिलें. ती उमजली. तिनेंही डोळ्याच्या खुणांनींच मला भ्यायचं कारण नाहीं म्हणून सांगितलें. मग मला धीर आला. दुभतं जनावर नाठाळ असलं तरी त्याला चुचकारून घ्यावं लागतं, तसेंच श्रीमंत लोकांना आम्हांसारख्याकडून चुचकारल्याशिवाय गत्यंतर नसतं हें मला—माझ्यापेक्षांही चांदणीला—चांगलंच माहीत होतं. मग ती राजाभाऊंना कशी दुखवील? त्यांच्यावर कशी रागावेल? कांगावखोरपणानें रागवावयाचें झालें तरी त्या वेळा कोणत्या हें चांदणीसारख्या बायका चांगलेंच जाणतात!

“हं, काय अण्णासाहेब,” पानाची पट्टी हातानें करीत असतां चांदणी बोलूं लागली “इनामदारसाहेबांची स्वारी आज इकडे वाट कशी चुकली! गरीबाची आठवण पुष्कळ दिवसांनीं कशी झाली?”

“मला कशाला विचारतेस? समोर श्रीमंत बसलेच आहेत त्यांनाच तूं विचार कीं!” मीं मिस्किलपणानें मुद्दामच उत्तर दिलें.

“तुम्हीं काय न् इनामदारसाहेब काय, मी विचारलंच आहे. कोणीही उत्तर दिलं तरी चालेल मला.” चांदणी पानांचीं टोकं, पट्टी करून त्यांत दुमडीत, हलकेच वर पहात म्हणाली.

“चांदणी,” राजाभाऊंना राहवेना; त्यांना बोलण्याची हुक्की आली. “मी पुष्कळ दिवसांत इकडे फिरकलों नाहीं हें खरें, पण त्याला कारणंही तशींच होतीं. माझ्यामागें कामाचा लकडा इतका होता! अण्णाला विचार, त्याला माहीत आहे सगळं.”

“अग, इनामदारांच्या मागें देशभक्तीचीं कामें लागलेलीं—”

“अण्ण्या, लेका, गाढवा, नीट बोलशील का!” मी थट्टा करीत आहे असं वाटून राजाभाऊ मजकडे वळून ओरडले.

" ऐक चांदणी, खरें सांगायला लागलों तरी इनामदारसाहेब असे रागावतात, मग काय खोटंच सांगूं? शेतवाडीवर, गोरगरीब शेतकऱ्यांची स्थिति पहायला आणि त्यांची स्थिति सुधारायला, एकसारखे आपण जात नव्हता? मी त्याला सहज मस्करीनें देशभक्तीचीं कामं म्हणालों इतकंच! आपल्याला आवडत नसेल तर सोडून देतों तो विषय! चांदणी, मी कांहींच बोलत नाहीं. तूं आणि श्रीमंत परस्पर पाहून घ्या." मी जरा रागानेंच बोललों. मी खराच रागावलोंसें पाहून समजूत करण्याच्या इराद्यानें राजाभाऊंनीं माझ्या खांद्यावर हात टाकला.

" मला माहीत आहे—नेहमींच गोपाळभय्या आणखी अण्णासाहेब इनामदारसाहेबांच्या बद्दल सगळं सांगतच असतात. नवीन कामेंच निघालीं म्हणजे तितकं हें व्हायचंच मला त्यांत आनंदच वाटला. अगोदर काम अन् मग उरल्या वेळांत हौसामौजा असंच असावं माणसाचं! मीं कांहीं श्रीमंतांना ह्यानं विचारलं नाहीं बरं! आपलं सहज विचारलं! श्रीमंतांनीं रागावण्याचं कांहीं कारण नाहीं." चांदणीनें बोलत बोलत केलेली पट्टी राजाभाऊंना दिली, मुजरा केला व ती जाग्यावर जाऊन बसली. गोपाळभय्या सिगारेटची पेटी घेऊन तितक्यांत आला. ती पेटी तिनें त्यांच्यापुढें केली. त्याच्या हातांत आणखी दोन तीन कागदाचे पुडे होते. त्यानें चांदणीला कानाजवळ तोंड आणून 'चहा का कॉफी?' असें कायसेंसें हलकेच विचारलें आणि तिनेंही आम्हां दोघांकडे पहात 'मला वाटतं चहाच बरा या वेळेला!' असें म्हटलें. चहापान होईपर्यंत आम्हांस बसावें लागणार हें मग उघडच झालें.

" मी आपली विनोदानं विचारतें हो, राग मानायचा नाहीं अं!" चांदणी मान वेळीत, हंसत म्हणाली. " देशभक्तीच्या कामांतून या अशा वेळीं इकडे यायला वेळ कसा मिळाला?"

" वेळ कुठला मिळाला? तुझ्या दारासमोर अचानक गाडीला समोरून बैलगाड्यांनीं आणि बाजूनें गुराढोरांनीं अडथळा आणून तुझ्यावर उपकार केला आहे." मी तिला सांगितलें. " बाकी खरोखरच इतके दिवस श्रीमंतांचा कामाखालीं पिट्टा पडत होता. इकडे का इकडे पहायला क्षणाची फुरसद नव्हती, प्रत्यक्ष मी पहात होतों ना?"

" पण मी तें नाकबूल का करते आहे! कामांत असल्याबद्दल मला आनंदच वाटत असे; वाईट वाटे पण तें दर्शन घडत नव्हतं म्हणून, इतकंच!" जरा गंभीर होऊन, तोंड उदास करून, डोळ्याच्या कडा ओल्या करून ती म्हणाली. क्षणांत हजार हावभाव आणि बोलण्याच्या नाना तऱ्हा करायला नायकीणींना कुणी शिकवावं का लागतें?

चांदणीच्या चार दोन गोड शब्दांनीं आणि तेवढ्या वेळांतल्या गोंडस हावभावांनीं राजाभाऊ पार विरघळले. चांदणीकडे फिरकलों नाहीं ही घोडया-एवढी चूक केली असें त्यांचें त्यांना वाटूं लागलें. त्यांची वृत्ती लगेच प्रसन्न झाली. थोड्या वेळापूर्वींची त्यांची अस्वस्थता पार कोठच्या कोठें पळाली. चांदणी आपल्या अक्षम्य अपराधाबद्दल टाकून किंवा रागावून कशी बोलली नाहीं, पहिल्या इतक्याच प्रेमळपणानें कशी बोलते याबद्दल राजाभाऊंना अचंबा वाटला.

" चांदणी, मी तुझ्याकडे कित्येक दिवसांत फिरकलों नाहीं तों आज आलों, पण तूं माझ्यावर रागावली कशी नाहींस? मला वाटलं तूं खूप रागावणार, संतापणार, शिव्यांची लाखोली वाहणार. म्हणून मला जरा–"

" काय? काय म्हटलंत इनामदारसाहेब?" चांदणी मध्येंच राजाभाऊंना थांबवून म्हणाली " मी आपल्यावर रागावणार? मी शिव्याशाप आपल्याला देणार? ऐका! इनामदारसाहेब, मी नायकीण असलें तरी अगदीं ही नाहीं. एक करते आणि दहा जणींवर येतं तशांतली गत झाली म्हणायची! आपल्या अन्नदात्यावर कोण मेल्या उलटत असतील त्या असोत, आपल्यावर प्रेमाचं छत्र धरणाऱ्याला कोण शिव्याशाप देत असतील त्या असोत, पण श्रीमंत, मी तशांतली नाहीं बरं का? श्रीमंतांनीं घरीं यायचं का टाकलं–मला कळेना. माझ्या हातून कांहीं चुकलं–कसला अपराध झाला का कांहीं श्रीमंतांना माझा संशय आला—"

फुरसद मिळायचा अवकाश चांदणीनें एकदम सरबत्ती सुरू केली. मध्यें फक्त आवंढा गिळण्यापुरतीच ती थांबली. कुणालाच तिनें नंतर तोंड उघडूं दिलें नाहीं. तीच पुढें बोलूं लागली " विचारा हवं तर अण्णासाहेबांना नी गोपाळभय्याला–मी रडरड रडलें, माझ्या नशिबाला दोष दिला, यल्लमाची वर्षाची वारी चुकली म्हणून असं झालं म्हणून कळेना. सत्यनारायण

बोलून करायचा विसरलें, म्हणून श्रीमंतांचं दर्शन मला दुर्लभ झालं—इनामदारांचे पाय मला अंतरले म्हणून समजेना. मी ह्यांना खोदूनखोदून दररोज विचारी, हे माझी समजूत काढीत, मी माझ्यावरच रागावे, माझ्याच नशिबाला बोल लावी. यल्लमाची प्रार्थना करी कीं माझ्या धन्याला सुखांत ठेव, आज अवकृपा झाली असली तरी पुन्हां मला चांगला काळ दिसेल, पुन्हां स्वारीचें दर्शन मला घडेल."

चांदणी बोलतां बोलतां गहिंवरूं लागली, रडूं लागली, पदरानें डोळे पुसूं लागली. नाक शिंकरून शिंकरून तिच्या नाकाचा शेंडा चांगलाच लालभडक झाला! श्रीमंत राजाभाऊ चांदणीच्या त्या चौफेर माऱ्यानें चारीमुंडे चीत झाले! ती जरा थांबून आपले हुंदके प्रयासानें आवरीत होती. ती संधि साधून मी एकदां चांदणीकडे आणि पुन्हां राजाभाऊंकडे वळून म्हटलें "राजाभाऊ मी आपल्याला सांगतों, चांदणीचं तुमच्यावर खरंखुरं प्रेम आहे. ती नायकिणीच्या पोटीं जन्माला आली आहे इतकंच. नाइलाज आहे हिचा तिच्याबद्दल. पण तें लक्षांत घेतलं नाहीं तर राजाभाऊ, मी अगदीं छातीठोक सांगतों कीं, नायकीण होऊन अशी एकनिष्ठा—आम्हीं पुष्कळ ठिकाणीं पाहिलं पण याला तोड नाहीं—चांदणीची आपल्या ठिकाणची निष्ठा, मला वर्णनच करून सांगतां येणार नाहीं, तुलना करण्यासारखी नाहीं. चमत्कारिक दिसेल तें, पण वेळ आली आहे म्हणून बोलतोंच, माफ करा. वहिनीसाहेबाशीं आपलं धर्मविधीनें लग्नच झालं आहे, पण त्यांची आपल्या ठिकाणीं जितकी जाज्वल निष्ठा आहे त्यापेक्षां हिची अणुमात्रही कमी नाहीं एवढं मी अनुभवानें सांगूं शकतों. वहिनीसाहेब लग्नानें धर्मपत्नी झाल्या आहेत आणि चांदणीचं धर्मविधीनें लग्न झालेलं नाहीं, इतकाच काय तो फरक—"

मी थांबलों. माझ्या बोलण्यानें चांदणीला चांगलंच अवसान आलें. गोपाळभय्यानें चहाचे पेले आम्हां सर्वांपुढें आणून ठेवले पण त्याकडे आमचें लक्षच गेलें नाहीं. चांदणी लगेच पुढें म्हणाली—

"हा माझ्याबद्दल परस्परच निर्वाळा ऐकावा. श्रीमंत, आपल्याला खोटं वाटेल, ओघाला आलं म्हणून सांगतेंच–आपण घरीं यायचं टाकल्यापासून पोटभर अन्न घेतलं नाहीं कीं पाणी प्यालें नाहीं; चांगलं चुगलं

ल्यालें–नेसलें नाहीं. यल्लमाला नवस बोललें, सत्यनारायण करीन म्हटलं. नाहीं पगारपाण्याची चौकशी केली, नाहीं दारीं येऊन धरणं धरून बसलें, नाहीं वेडेवांकडे निरोप धाडले! गाणं नाहीं, बजावणं नाहीं, करमणुक नाहीं, आराम नाहीं, चैन नाहीं, कांहीं नाहीं. आपले कुठले पाहुणे आले होते त्या रात्रीं काय नाचगाणं झालं तेवढेंच! त्यावर तंबोऱ्याला गवसणी घालून तो कोपऱ्यांत ठेवला आहे तो तसाच, तबला तिथेंच. ती पेटी उघडली नाहीं, त्या दिलरुब्यावरचं आच्छादन काढलं नाहीं कीं कांहीं नाहीं. पहा हवं तर! कलावंतांची कलासाधनं श्रीमंतांची पाठ फिरल्यावर कोपऱ्यांत दीनपणानें कशी धूळ खात पडलीं आहेत तीं!"

या तऱ्हेनें चांदणीनें कांहीं एक बोलायचं शिल्लक ठेवलं नाहीं. नुसत्या फैरीवर फैरी झाडल्या; पण त्या प्रेमानें–द्वेषानें नव्हे कीं वैतागानें नव्हे!

"बस्स! चांदणी, पुरे कर! मला ऐकवत नाहीं आणि सहनही होत नाहीं. तुझ्या बाबतींत मीं फार मोठी चूक केली होती; आतां ती दुरुस्त करीन!" राजाभाऊंनीं ताडदिशीं सांगितलें.

"यल्लामा पावली मला!" चांदणी आनंदून उद्गारली. "आज माझ्या घरांत प्रकाश पडला, महोत्सव घडला! सत्यनारायण प्रसन्न झाला! श्रीमंत, देशभक्तीचीं मोठमोठीं कामं आपण खुशाल करावींत, मी आड येणार नाहीं. पण गरीब दासीला असं अंतर देऊं नये इतकीच पायाजवळ विनंती आहे माझी!"

"ए चांदणी, इनामदारसाहेबाना आतां जास्त छेडूं नकोस. त्यांनीं तुला अंतर दिलं नव्हतं आणि नाहीं. उद्यांपासून ते आपलीं सगळीं देशभक्तीचीं कामं तुझ्या इथं बसून करूं लागतील. मग तर नाहींना तुझं बोलणं!" मी मध्यें बळेंच म्हणालों. ती हंसली, राजाभाऊही हंसले.

पुढें ठेवलेले चहाचे कप निवून चालले होते याची आतां कुठें आम्हांला आठवण झाली. त्या भरांत गार झालेला चहासुद्धां चांगलाच लागला.

पांच मिनिटांकरितां आलों तों किती वेळ बसलों! हें असं व्हायचंच होतं. असं झालं नसतं तर एकदोन दिवसांतच असा मुकाबला मी युक्तीनें घडविणारच होतों. आतां राजाभाऊंचें ठाणें चांदणीकडे हें ब्रह्मदेवच बोलून चुकला होता. चहा पीत असतां मला पुन्हां एकदां हलवून खुंटा बळकट

करावासा वाटला आणि मी म्हटलें " राजाभाऊ, अगदीं त्रयस्थ दृष्टीनें बोलायचं म्हणजे चांदणीच्या बाबतींत आपण खरोखरच चूक केली होती. तिला फशीं पाडल्यासारखं केलं होतं. नायकीण असून ती नीट राहिली. हीच एकादी दुसरी असती तर तुमचं लक्ष उडालं असं पाहातांच एकदम चालती झाली असती! नाहीं तर गांवांतच तुमची नाचक्की करण्यासारखंही तिला वागतां आलं असतं!"

" पण त्या गोष्टी आतां कशाला? वाहिली ती गंगा आणि उरलं तें तीर्थ! माझ्या घरीं यायचं झालं, दर्शन द्यायचं झालं यांत सारं कांहीं मी भरून पावलें. येत्या गुरुवारीं मी सत्यनारायणाची थाटाची पूजा बांधणार."

" अण्ण्या, दादासाहेबांच्याजवळ काय वाटेल ती थाप मार. पण उद्यां संध्याकाळच्या आंत चांदणीच्या घरीं पांचशें रुपये पोंचले पाहिजेत समजलास? हें झालं नाहीं तर तुला त्याच्याबद्दल फटके खावे लागतील!" राजाभाऊंनीं बेछूटपणानें हुकूम फर्मावला. एकदां शिखरावर चढल्यावर मनुष्य काय बोलूं लागेल आणि कसा वागूं लागेल याला कांहीं सुमार आहे का?

पुन्हां पानपट्ट्या झाल्या, अवांतर गप्पासप्पाही सुरूं झाल्या. उंदराला मांजर साक्ष या न्यायानें मला चांदणी आणि चांदणीला मी पोषक होईल असें बोलत होतों. आमच्या चलतीचा काळ सुरूं झाला अशी आमची खात्री झाली. उठूं या, उठूं या म्हणतां म्हणतां आणखी अर्धा पाऊण तास गेला. सावज चांगलेंच आणि पुरें जाळ्यांत अडकलें, आतां त्यांतून सुटायची सावजाची प्राज्ञा नव्हती. आम्हीं शेवटीं निघायला म्हणून उठलों. तितक्यांत चांदणीनें कशाला कीं पण आंत चलायला राजाभाऊंला खूण केली! ती पुढें निघाली आणि राजाभाऊ मागें निमूटपणें गेले. मी आणि गोपाळभय्या जायला म्हणून दारापर्यंत आलों पण तेथेंच राजाभाऊंची वाट पाहात उभे राहिलों.

राजाभाऊंना आंत बराच वेळ लागला. मग दोघेही पण हंसत हंसत बाहेर आले! माझ्याजवळ येतांच राजाभाऊ म्हणाले, " अण्ण्या, माझा एन्लार्जमेंट आंत लावलेला पाहिलास का? फार छान साधला आहे नाहीं!—कुणी तयार केला म्हणालीस, चांदणी?"

" पुण्याचे फोटोग्राफर एस्. जी. नाईक यांनीं करून दिला आहे तो ! " चांदणीनें सांगितलें, " इतके दिवस त्याच दर्शनावर मी समाधान मानीत होतें. "

" बाकी, ते पुण्याचे नाईट अँड डे फोटोग्राफर लहर लागली म्हणजे पोज फार सुन्दर देतात आणि फोटोसुद्धां अतिशय आर्टिस्टिक काढतात. पुण्याला जाऊं तेव्हां त्यांच्याकडून कांहीं फोटो मुद्दाम काढून घेतले पाहिजेत ! " राजाभाऊ बडबडले. ' पण, चांदणीनें माझा फोटो अशा रीतीनें ठेवला असेल ही मला कल्पनाच नव्हती. बरं चांदणी, आम्हीं येवों आतां. जरी इथून पाऊल उचलत नाहीं तरी गेलें हें पाहिजेच ना ?"

" ऐका, पण मी नाहीं का म्हणतें आहे ? पण मी विचारलं त्याचं कांहींच उत्तर मिळालें नाहीं अजून ! तें सांगावं अन् खुशाल जावें."

राजाभाऊ हंसले. त्यांनीं मला खांद्याला धरून हलवित म्हटलें, " ए, चांदणी म्हणते आज संध्याकाळीं जेवायला आलंच पाहिजे."

" मग ? "

" मग काय सांगूं ? "

" मी नको म्हणूं कीं काय ? अन् मीं सांगितलं तर तुम्हीं ऐकणार थोडेच, तुम्हीं ऐकलें तर ही माझ्यावर डोळे फाडील ना ? " मी हंसून म्हटलें; होकारार्थी राजाभाऊंनीं मान उडविली. मीं विचारलें, " रात्रीं जेवायला यायचं म्हणजे ? अं, अं. " मी हंसलों, राजाभाऊ हंसले व चांदणीही पण हंसली ! बरं बरं म्हणत आम्हीं सर्व गाडींत चढलों, व चांदणी दारांत येऊन उभी राहिली. तिला या वेळीं कोण विलक्षण आनंद झाला होता !

गाडी चालतां चालतां मी खवचटपणानें म्हटलें, " चला, मी काळजींतून मुक्त झालों ! माझ्यावरची जबाबदारी एकदम कमी झाली ! "

" म्हणजे काय ? " राजाभाऊंनीं विचारलें.

" वहिनीसाहेब माहेराहून येईपर्यंत इनामदारसाहेबांचं कसं होणार याची काळजी होती. ती जबाबदारी होती त्यांतून पार पडलों म्हटलें ! " हें ऐकतांच राजाभाऊंनीं एक गुद्दा जोरानें मारला व गाडी चालू झाली.

# प्रकरण सोळावें

## पितापुत्रांची खडाजंगी

राजाभाऊंनीं चांदणीच्या घरीं पुन्हां पाऊल टाकलें तो सुमुहूर्तच म्हटला पाहिजे. कारण जायला आरंभ झाला तो झालाच. अक्षरशः तीन त्रिकाळ इनामदारांची बैठक चांदणीच्या घरीं पडूं लागली. धनुष्यावर बाण लावून त्याची दोरी जितकी खेंचावी, तितक्या जोरांत बाण पल्ल्यावर जातो—अगदीं आरपार जाऊं शकतो. तसेंच राजाभाऊंचें चांदणीच्या बाबतींत झालें म्हणायला हरकत नाहीं. इनामदारांचं खरं जग, खरं विश्रांतिस्थल, इथें होतें. वहिनीसाहेबांच्या ताब्यांत त्यांचें मन मारून मुटकूनच राहिलें होतें म्हणाना! संधि साधतांच पाळीव पोपट पिंजऱ्यांतून हटकून पळतो, तशीच गत राजाभाऊंची होती. सुशिक्षित आणि उच्च विचारसरणीच्या वहिनीसाहेबांचे आचारविचार कायमचे राजाभाऊंच्या गळीं उतरणें दुरापास्त होतें हें आमचें भाकीत होतेंच. वेळ येतांच तें खरें ठरलें. आम्हींही अनुकूल कालाची वाटच पहात होतों. आमच्या मनाप्रमाणें झालें; आमचें काम झालें. आतां सांपडलेलें सावज आमच्या तावडींत कायमचें कसें राहील याची दक्षता बाळगणें आवश्यक होतें. राजाभाऊंना तर दुखावल्यासारखं होऊं नये व आपला तर कार्यभाग होत रहावा अशी दृष्टि ठेवावीच लागत होती.

त्या दिवशींच असें झालें ना कीं, आम्हीं चांदणीच्या घरांतून बाहेर पडलों; आतां चांदणीचा विषय चालू ठेवणें प्रशस्त नव्हतें म्हणून मी होऊनच, राजाभाऊ बोलूं लागायच्या आधींच म्हणालों, " राजाभाऊ, हें झालें खरें, पण या नादांत गुंगून आपल्याला शेतवाडीकडच्या कामाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. वहिनीसाहेबांनीं महत्त्वाची जबाबदारी आपल्यावर टाकली आहे व ती आपण शिरावर घेतली. आतां निदान वहिनीसाहेबांच्या करितां तरी ती कामगिरी दूर सारतां उपयोगी नाहीं. "

" हो—हो तर—तें काय म्हणून दूर करीन ? " राजाभाऊंकडून उत्तर मिळालें खरें पण त्यांत त्यांचें अंतःकरण मात्र दिसलें नाहीं. अंतःकरण

चांदणीनें चोरल्यावर त्यांच्या जवळ तें राहणार कुठून आणि मग मला तें दिसणार कसें? पण मी आपलें कर्तव्य बजावीत होतोंच.

त्या रात्रीं ठरल्याप्रमाणें सर्वांचा जेवणाचा–खाण्यापिण्याचा, मजा–मज-लसीचा समारंभ झाला. त्या दिवशींच काय मग दररोजच तें सुरू झालं; अगदीं पहिला मजा येऊं लागला.

राजाभाऊंना नवी मोटार घ्यायची आहे, त्याला पांचशें रुपये विसार आजच भरावयाचे आहेत, म्हणून राजाभाऊंच्याच आज्ञेवरून सफाईदार थाप दादासाहेबांच्याजवळ ठोकून पांचशें रुपये आणले व चांदणीकडे दिले. तिची दिवाळी झाली. आमची गुप्त पाती त्या मिळकतींत होतीच; तसें केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. पण चांदणी आपल्या शब्दाला इमाने इत-बारें जागत असे. ती आमचा हिस्सा बिनबोभाट बाजूला काढून ठेवी. राजा-भाऊंची पडत्या फळाची आज्ञा झाल्यावर नेहमीं नवी शक्कल लढवून दादासाहेबांच्या जवळून पैसे काढून चांदणीकडे पोंचवायचा सपाटा पहि-ल्यापेक्षां मोठ्या प्रमाणावर आम्हीं सुरू केला.

असें करतांना कधीं कधीं तो प्रकार जाचक होई, अपमानास्पद होई. त्या वेळीं जरा वाईट वाटे. हा जाच, ही अपमानास्पद स्थिति कशानें बंद होईल असें एकादे वेळीं जोरानें मनांत येई. त्या बाबतींत अजून उपाय सुचत नव्हता. मैत्रीचें पांघरूण बिनधोकपणाच्या दृष्टीनें अपुरें पडत होतें. प्रसं-गच मनुष्याला अक्कल सुचवतो म्हणतात तसेंच याही बाबतींत माझें झालें. मला अक्कल सुचली. मी त्याप्रमाणें अक्कल चालवून मनाप्रमाणें करून घ्यावयाचा संकल्पही पण केला.

ती गोष्ट अशी झाली—

एक दिवस चांदणीकडेच आम्हीं गप्पा मारीत बसलों होतों. राजाभाऊ होतेच. बसलों असतांना टपालांतून चांदणीचीं दोन तीन पत्रें आलीं. त्यांत पुण्याचे नाईक फोटोग्राफरचें पत्र व त्याबरोबर राजाभाऊंच्या एन्लार्ज-मेंटचें बिल आलें होतें. तिनें तें वाचलें व माझ्या हातीं दिलें. माझ्या हातून जवळ जवळ राजाभाऊंनीं हिसकावूनच तें घेतलें व वाचलें. तें एक बरेंच झालें; त्यांनीं चांदणीला विचारलें, "काय? त्या एन्लार्जमेंटचें बिल अजून भरायचें आहे! बरेच दिवस होऊन गेले आहेत ना?"

त्यावर चांदणीनें होकारार्थी फक्त मान हलविली. राजाभाऊ मजकडे वळले आणि म्हणाले, " अण्ण्या, हें बिल आजच्या आज चुकतें झालें पाहिजे. दादासाहेबांकडून आजच व्यवस्था कर!" मी मान डोलविली. माझ्याखेरीज दादासाहेबांसारख्या खविसापुढें जाण्याचें कठीण कर्म कोण करूं शकणार होतें? आणखी राजाभाऊंला काय वाटलें कोण जाणे! त्यांनीं विचारलें, " नाईक फोटोग्राफर कसा काय आहे रे?"

" तुमच्या एन्लार्जमेंटवरून तुम्हींच ठरवा? मीं म्हटलें.

" आपण बोलावलं तर येईल का तो इकडे?"

" न यायला काय झालं? धंदा आहे. भरपूर आणि कायमचं काम मिळालं तर धंदेवाल्याला आलंच पाहिजे. मला कुणीं तरी सांगितलं कीं कांहीं राजेरजवाड्यांची नाइकांना कायमची गिऱ्हाइकी आहे."

" मग ठरलं तर!" राजाभाऊ एकदम निश्चयात्मक स्वरांत म्हणाले, " अण्ण्या, आपणही त्याचे कायमचे ग्राहक होऊं, पसंत आहे आम्हांला त्याचं काम! आज पत्र लिहा. बिल पाठवाच. जातां येतांचं भाडं देऊं म्हणून लिहा, पण एकदां यायला लिहा. समक्षच काय तें ठरवूं. नाहीं तर बिलाबरोबरच आगाऊ जाण्यायेण्याबद्दल कांहीं रक्कम पाठवूनच द्या म्हणजे कसला प्रश्नच राहणार नाहीं. प्रत्यक्ष भेटींत कायमचं जुळलं नाहीं तरी आल्यावर बरेंचसें काम त्याला मिळाल्याशिवाय राहणार नाहींच."

इत्यर्थ इतकाच कीं, राजाभाऊंनीं बिलाचे पैसे व जाण्यायेण्याचा खर्च म्हणून चांगली दीड दोनशाची रक्कम नाइकांकडे पाठवायला म्हणून आजच्या आज–नव्हे आतांच्या आतांच–दादासाहेबांकडून आण असें मला फर्मान सोडलें. मी तसाच उठलों आणि वाड्याकडे कामगिरीवर निघालों. शनिवार होता त्या दिवशीं. वेळेच्या आंत पोस्टांत मनीऑर्डरीची वगैरे व्यवस्था व्हावयास पाहिजे होती.

वेळ न गमावतां मी वाड्यांत गेलों. पहिल्या दरवाजांतून आंत जातों तों कुणी तरी कडाक्यानें भांडत आहे, अगदीं खडाजंगी चालली आहे, असें ऐकायला आलें. जरा कान दिला तेव्हां बाबूराव–राजाभाऊंचे सख्खे वडील बंधू–मोठ्यानें आणि त्वेषानें बोलत आहेत असें लक्षांत आलें. ज्या दिवशीं वहिनीसाहेब माहेरीं गेल्या त्याच दिवशीं बाबूरावांची स्वारी सह-

कुटुंब-सहपरिवार वाड्यांत डेरेदाखल झाली होती, हें सांगायचें राहिलेंच होतें. त्यांच्या एका विशेष तऱ्हेच्या स्वभावामुळें आणि तऱ्हेवाईक वागणुकीमुळें त्यांचें आमचें मुळींच क्षणभर देखील सुतगुत जमत नसे. म्हणून त्यांचा उल्लेख झाला नाहीं इतकेंच! त्यांची आणि सर्वांची वाड्यांत नेहमीं खडाजंगी चालत असे. ते राजाभाऊंना दटावीत, दादासाहेबांशीं तर दररोज उघड सामना करीत. कोणाशीं म्हणजे पटे असें नाहींच. आमच्याशीं ते बोलत नसत, मिसळत नसत, आम्हींही दूरूनच 'हँः हँः नमस्कार!' तर 'हँः हँः नमस्कार' एवढ्याचपुरता त्यांच्याशीं संबंध ठेवीत असूं. वाड्यांत ते वावरत असतां आपण राजाभाऊंचे वडील बंधु म्हणजे राजांचेहि राजे आहोंत—आपणच इनामदार आहोंत, या चालीनें चालत व तशाच थाटानें वाड्यांत वागत असत. त्यांच्या तिस्मारखानी तऱ्हेला राजाभाऊ सुद्धां भीत-वचकत, आणि त्यांच्याशीं आदबीनें वागत. म्हणून भावाभावांचें तसें मेतकूटही कधीं जमत नसे. त्यांचा सुभा न्यारा, यांचा सुभा वायला असा प्रकार असे. अलिकडे जे ते येत असत, सध्यां जे ते आले होते, ते राजाभाऊंकडून कांहीं स्वतंत्र उद्योग करायला भांडवल मागायला म्हणन! गृहस्थ डोक्याचा, उद्योगी आणि चिकाटीचा यांत कांहीं शंका नव्हती. आल्यापासून त्यांनीं दादासाहेबांच्या-वडिलांच्या-मागेंच रकमेचा लबदा लावला होता असें कळलें होतें. पण त्याची दाद लागली नव्हती. तेंच प्रकरण आज एकेरीवर आलें होतें. तशांतच घरांत-बायकांतूनही-कांहीं प्रकरण चिघळलें होतें. वहिनीसाहेब नव्हत्याच; थोरल्या बाईसाहेब घरांत लक्ष घालीत नव्हत्याच; येसू तर जरा 'अहं' च होती, शिवाय राजाभाऊंवर स्वपराक्रमानें वजन ठेऊनच होती, त्या जोरावर ती बाबूरावांच्या बायकोला बोलली होती वाटतं. तें एक आगींत तेल ओतल्यासारखें झालें होतें. त्या सर्वांचा परिपाक म्हणनच बाबूरावाच्या तोंडाचा पट्टा चालू होता.

मी वाड्यांत गेलों त्यावेळीं बाबूराव न्हाव्यापुढें बसले होते. त्यांची अर्धी हजामत झाली होती. ते बोलण्याच्या जोरांत आल्यामुळें बिचारा न्हावी पुढें स्वस्थ बसला होता. दादासाहेब दातांची कवळी तोंडांतून काढून पाठीमागच्या कोनाड्यांतील बाटलींत ठेवून देऊन, ढकलत ढकलत सावकाश

येरझारा घालीत होते. मधून मधून ते डाव्या हाताच्या तर्जनीच्या टोंकापासून आंगठ्याच्या अग्रापर्यंत गंभीरतेनें नाक आणि मिशा यांच्यामध्येंच हाताचा चंद्राकार फिरवीत होते. " अरे पण, बाबूराव माझं ऐकशील तर खरं! मी काय या इस्टेटीचा मालक का आहे ? तूं मला मागणार कसा? आणि मी होय म्हणन देऊं कोणाच्या मालकीची रक्कम? याचा तूं विचार करीत नाहींस. आणि तुझ्यासारख्यांनीं उगाच आयतं मिळण्याची आशा कां धरावी? डोकं चालवावं, कष्ट करावेत. अफाट जग आहे, पैसे मिळवावेत. मग हवं तसं वागावं, आम्हीं काय नाहीं म्हणतों आहोंत ? " वगैरे चार गोष्टी ते बाबूरावाला सांगत होते.

" बस्स करा दादासाहेब!" बाबूराव जरा उसळूनच म्हणाले. " मला भलती भाषा नको आहे! मी इथें माझी बायकामुलं राजाभाऊच्या दारीं-ओसरीं लावायला आणलीं नाहींत! माझी बायको म्हणजे कांहीं वाड्यांतली मोलकरीण नव्हे किंवा स्वयंपाकघरांतील स्वयंपाकीण नव्हे कीं तिनें वाटेल त्यांचें वाटेल तें बोलणं ऐकून घ्यावं. आम्हीं इथें कांहीं या होळीच्या होळकरासारखे जगे म्हणन राहिलों नाहीं!"

" पण असं म्हणतो कोण तुम्हांला ? "

" कोणाची म्हणायची माय व्याली आहे पाहूं द्या ना ? " बाबूराव दादासाहेबांना थांबवूनच म्हणाले, " तसें म्हणणाऱ्या एकेकाचीं थोबाडं काढून टाकीन! एकेकाच्या कानाचे गड्डे उपटून हातांत देईन. ठाऊक नाहीं! दादासाहेब, राजाभाऊप्रमाणेंच मीही तुमच्याच पोटीं जन्म घेतला आहे. राजाभाऊला दहा हजारांचा धनी केल्याची फुशारकी मी हजारदां ऐकली आहे तुमची. तुम्हीं त्याच्या इस्टेटीवर मॅनेजर असाल, कोण वाटेल ते असाल, मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य आहे का? मी तुमचाच मुलगा आहे ना? "

" बाबूराव, काय म्हणावं तुला ! "

" तें कांहीं नाहीं. मला दोन हजार रुपये रोख पाहिजेत. माझ्या-संसाराकरितां तुम्हीं ते दिलेच पाहिजेत आणि तेही आजच्या आज! या वाड्यांत पाणी प्यायला राहाची माझी इच्छा नाहीं. संध्याकाळीं बायकामुलांना घेऊन मी जाणार! "

" अरे, पण दोन हजार रुपये कुठले आणूं मी ? " दादासाहेब एवढे कर्दनकाळ ! पण बाबूरावाच्या तोफखान्यापुढें गोगलगाय झाले होते. धड त्यांच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. स्वारी खूपच गडबडली होती. मी गेलों खरा पण मला मुकाट्यानें स्वस्थ ऐकत उभं राहण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें ! संतापाच्या भरांत बाबूरावांनीं आम्हांला होळीचे होळकर, जगे, म्हणून अगदीं बोट दाखवून शेलकीं विशषणें दिलीं होतींच. डोकें भिरभिरायची वेळ त्या वेळींच आली पण उपयोग काय होता ? मुकाट्यानें ऐकून आणि सहन करून घ्यावें लागलेंच. दादांनीं दोन हजार रुपये कुठले आणूं म्हणतांच बाबूरावानें पुन्हां सरबत्ती सुरू केली. " कुठले आणणार ? एवढ्या इस्टेटीचे मॅनेजर म्हणवता ना ? दहा हजारांच्या उत्पन्नाच्या इनामदाराचे वडील आहांत ना ? आणि दोन हजार रुपये कुठले आणूं म्हणून विचारतां ? तुमच्या त्या मुलाच्या इस्टेटींतून या मुलाला द्या. राजाभाऊला सांगा, दोन हजार रुपये बाबूच्या उद्योगाला दिलेच पाहिजेत म्हणून—"

" म्हणजे तुम्हीं घरच्याच म्हातारीचे काळ म्हणायचे ! " दादाही पण तशा स्थितींत कुत्सितपणानें बोललच.

" मग काय जगाला लुबाडूं ? " बाबूरावांनीं विचारलें.

" व्यवहारच आहे तो ! आपल्याच घरावर दरवडा घालण्यांत शहाणपणा नसतो ! " दादांचा कुत्सितपणा अजनही चालूच होता.

" पण मी या घराला आपलं घर म्हणतच नाहीं. लोकांचंच समजन दरवडा घालतों. मग तर झालं ! माझंच घर असतं तर दोन हजारांच्या रुपड्याकरितां इतकी उरस्फोड कां करावी लागती ? वाड्यांतली दीडदमडीची येसूसारखी सटवी माझ्या बायकोला उर्मटपणानं कां बोलती ? "

" हा काय माझा अपराध ? " दादा जरा जोर धरून विचारूं लागले.

" होय. हा तुमचा अपराध ! राजाभाऊ श्रीमंत झाला म्हणून त्याला अंगाशीं धरतां, मी गरीब राहिलों म्हणन मला दूर लोटलं ! हा तुमचा अपराध नव्हे तर काय लोकांचा ! पण अवांतर बाबी पाहिजेत कशाला ? मला दोन हजार रुपये द्या, मी चालता होतों कसा ! रिकामी भगभग मला नको आहे. "

दादांच्या येरझारा चालूच होत्या. बाबूरावांनीं पुन्हां आपलं डोकें न्हाव्याच्या ताब्यांत दिलं. तो पाणी लावूं लागला. आपण असली भलती शोभा पाहात राहणें बरें नव्हे असं मला वाटूं लागलं. जरा वेळ बोलणं थांबलं होतं, तेवढ्यांत मी दादांच्या पुढें झालों आणि म्हटलें " अडीचशें रुपये पाहिजेत."

" काय?" दादा माझ्यावर एकदम ओरडले. मीं काय म्हटलें तें त्यांनीं ऐकलें पण ऐकतांच ते जास्तच रागावले. चिरंजीवावरचा आपला राग त्यांनीं माझ्यावर काढला.

" अडीचशें रुपये पाहिजे आहेत, फोटोग्राफरचं बिल पाठवावयाचं आहे!" मी मुळींच न डरतां पहिल्यासारखेंच फिरून म्हटलें.

" फोटोग्राफरचें बिल? कसलें फोटोग्राफरचें बिल?" दादा पुन्हां रागानें माझ्यावरच ओरडले, " फोटोग्राफरचें बिल मला माहीत नाहीं! जा, कांहीं एक मिळणार नाहीं, वाटेल त्यानें यावें आणि हवं तें सांगून—"

" पण माझं बिल नव्हे, राजाभाऊंचें आहे. त्यांनींच सांगितलं आहे. आजच पाठविलं पाहिजे असं राजाभाऊंनींच बजावलं आहे." पहिला शांतपणा न सोडतां मी त्यांना समजावून सांगितलें. राजाभाऊंचें नांव सांगतांच दादा एकदम थंड पडले. त्यांचा चेहरा बदलला व शब्द नरम आला. पलीकडे लिहीत बसलेल्या कारकुनाला त्यांनीं अडीचशें रुपये काढायला फर्मावलें.

बाबूरावांना पुन्हां बोलण्याची उकळी फुटली. न्हाव्याच्या हातांतून डोकें काढून घेऊन ते दादांना म्हणाले, " द्या, द्या, लाडक्या लेकाला चैनीला अडीचशें रुपये द्या. त्याचेच त्याला द्यायला तुमचं काय दुखतं? त्याचे त्याला द्यायला तुमच्या जिवावर येतंय, तर आम्हांला काय तुम्हीं देणार? नाहीं, त्याच्या चैनीला द्याल, त्याच्या व्यसनाला द्याल पण आम्हां गरीबांच्या संसाराला हातभार लावायला तुमच्या हातून कवडीदमडी नाहीं सुटायची! द्या, द्या, लाडक्या लेकाच्या चैनीला अडीचशें रुपये द्या."

कारकुनानें नोटा काढल्या व मी त्या मोजून घेत होतों; दादा फिरतच होते. 'काय आणि किती आपल्या वडिलांना बोलतां हें?' असें बाबूरावांना म्हणायचं माझ्या मनांतही आलं. बाबूराव बोलून थांबले. न्हावी त्यांच्याकडे पहात होता, बाबूरावांना काय वाटलें कोण जाणे, ते म्हणाले

" पाहतोस काय तोंडाकडे, या मिशा आज ठेवायच्या नाहींत. काढायच्या आहेत ! काढ अगोदर मिशाच."

मी ऐकलं व थक्कच झालों. खेडवळ न्हावी–स्तंभितच झाला तो ! त्याला पुन्हां बाबूरावानें ओरडून सांगितलें मग मला राहवेना. न्हाव्यानें मिशीवरून पाण्याचा हात फिरवला. मी त्यांच्याकडे आणि दादाकडे पहात म्हटलें, " बाबूराव, बाबूराव, काय हें ? "

" दिसत नाहीं काय हें ? मिशा काढतों आहे—हे आमचे वडील. वडील असून नसल्यासारखेच आहेत आम्हांला. ते श्रीमंत चिरंजीवांचे वडील आहेत. त्यांचें कल्याण अकल्याण त्यांना पहायचं आहे. गरीब मुलं उपाशी तडफडून मेलीं तरी चालतात त्यांना ! त्यांना मुलांच्या प्राणाची किंमत नाहीं तर मला मिशांची प्रतिष्ठा नाहीं !" बाबूराव बोलले. पुन्हां न्हाव्यावर ओरडले व काम चालू झालें. पुढें आणखी बोलायची छातीच नव्हती माझी ! दादांचें तोंड मात्र त्या वेळीं पहाण्यासारखं झालं होतं, अंग लटलटत होतं, ओठ थरथरत होते व त्यांना मुलापुढें बोलवेना. आम्हीं एरव्हीं दादांना कितीही नांवें ठेवीत असूं पण या वेळीं मात्र मला सुद्धां त्यांची कींव आली.

मी अडीचशें रुपयांच्या नोटा घेऊन तेथून कसाबसा निघालों. पितापुत्रांचा संवाद ऐकून मी थक्क झालों होतों. विशेषतः पुत्राच्या वर्तनानें मी अगदीं हतबुद्धच व्हावयाच्या बेताला आलों. पण दोघेही खरे खंबीर ! चिरंजीव बोलता रहात नव्हते तर वडील कोणत्याही शब्दानें होकार भरीत नव्हते. मी बाहेर पडण्याच्या वेळीं दादा पुटपुटले, " शिकस्त आहे चिरंजीवाच्या अकलेपुढें आणि शहाणपणापुढें ! "

" नमस्कार आहे आपल्या वडीलपणापुढें " हजामत चालू असतांच बाबूरावही म्हणाले. मला चमत्कारीकही झालें आणि हंसूही आलें !

मी तेथून झटकलोंच. नंतर काय काय झालें कोण जाणे. मनांत विचार येणं अपरिहार्य होतं. पितापुत्रांची खडाजंगी कानांत घुमत होती, मस्तकांत सणसणत होती. वाटलें, खरेंच बाबूरावांची तरी काय चूक आहे ? आम्हीं त्रयस्थसुद्धां मित्रपणाचा बादरायणी संबंध लावून मनसोक्त इनामदारांच्या संपत्तीवर मजा मारीत आहोंत. मग बाबूरावांचा अगदींच हक्क कां असूं नये ?

यावर लगेच विचार बदलला. हक्क आहे आणि राजाभाऊ तो पाळता-तही. बाबूराव सहकुटुंब सहपरिवार येथें येऊन राहतात त्यांना कोण नको म्हणतो ? तसेंच त्यांना उद्योग करायचा नसेल आणि कायमचें मुलामाणसां-सुद्धां वाड्यांत रहावयाचें असेल तर त्याला तरी राजाभाऊ नाहीं म्हणतील थोडेच ! मग त्यांनीं कां राहूं नये—अशी अरेरावी कां करावी ?

पण तशा विचारांना मी डोक्यांत फार वेळ थारा दिला नाहीं. कारण माझा त्याच्याशीं संबंध नव्हता आणि फायदा तोटाही नव्हता. इनामदा-राची श्रीमंती एकट्या इनामदारांच्याच सुखसोयीसाठीं, चैनीसाठीं नसावी; त्यावर आतेष्टांचा, नातेवाइकांचा, मित्रादिकांचा थोडा तरी हक्क असावा; असे कसले तरी भलतेच विचार डोक्यांत सण्याचा प्रयत्न करीत होते. घुसलेही असते, त्यानें डोक्याला तकलीफ झालीही असती. पण बाबूरा-वांनीं आम्हांवर सहज जातां जातां ज्या दुगाण्या झाडल्या होत्या, त्याच्या झिणझिण्या त्यापेक्षांही भयंकर जाणवत होत्या. त्यामुळें वाटलं या जगांत आपण आपल्यापुरतं पहावं, दुसऱ्याची पंचाईत आपल्याला पाहिजे कशाला ? तिकडे दादा खड्ड्यांत पडोत नाहीं तर बाबूराव आडांत पडोत. आपल्याला त्याची काळजी नको. सध्यां आपल्याला आपल्या पोळीवर तूप ओढून घेतां येत आहे, तें कायमचं कसं होईल याबद्दलच विचार करावा म्हणजे झालें. हा विचार येतांच पितापुत्रांच्या खडाजंगीचें मला हंसू येऊन तो एक पोरखेळ वाटूं लागला. त्याच विचारांत मी चांदणीच्या घरीं आलों. मला उशीर लागण्याचं कारण राजाभाऊंनीं विचारलं. अर्थात् झालेली कुळकथा साद्यंत सांगावी लागली. तें ऐकून राजाभाऊंचें तोंड चांगलेंच आंबट झालें. तिथेंच बसून मनीऑर्डरीची आणि पत्राची व्यवस्था करूं लागलों. मी तेथें येण्यापूर्वींच नुकताच सगळ्यांचा चहा झाला होता. मला चहा करून द्यावासें चांदणीला वाटलं म्हणून ‘ अण्णासाहेबाला चहा करून आणतें अं ! ” असें म्हणून ती आंत निघून गेली.

पत्र लिहित असतांच मी राजाभाऊंना म्हटलें, “ खूप आहेत बोवा तुमचे बाबूराव तरी ! ”

“ आहेत खरे ! ” राजाभाऊ म्हणाले. “ पण त्याला करायचं काय ?”

“ म्हणजे काय ! तुम्हीं त्यांना नीट सांगायला पाहिजे. ”

"आपली नाहीं छाती! तो दादासाहेबांना जुमानीत नाहीं तर माझी काय पत्राज ठेवणार आहे?" राजाभाऊ धास्तावल्या शब्दांत म्हणाले. "तो घरांतून केव्हां निघून जाईल असं मला झालं आहे!"

"राहिनात का ते घरांत खुशाल म्हणा. पण त्यांनीं वडिलांना अद्वा-तद्वा बोलूं नये एवढंच माझं म्हणणं! मुलामाणसांसुद्धां आनंदांत खाताहेत, पिताहेत, सगळं कांहीं ठाकठीक चाललं आहे, त्यांना तुम्ही एवढंच सांगायचं कीं सुखासमाधानानें रहा पण कोणाला बोलूं नका."

मी साळसूदपणानें सांगायला गेलों, त्यावर राजाभाऊ जरा घाईनेंच म्हणाले, "छे! छे! मी दादासाहेबांना सांगणार आहें, बाबूला दोन हजार रुपये द्या, पण त्याला सुखासमाधानानं जाऊं द्या. दोन हजार रुपये गेले तरी चालतील पण ती पीडा वाड्यांत नको आहे मला!"

"कां? म्हणजे काय?" मी कुतूहलानेंच विचारलें.

त्यांनीं साशंक होऊन इकडे तिकडे पहात हलकेच म्हटलें, "या नात-लग लोकांची भारी अडचण होते. आमच्याच वाड्यांत आम्हांला मोकळे-पणानें वागायची मला चोरी होते. आमच्या वहिनीला मी येसूशीं बोललेलं खपत नाहीं. तिनें माझ्याशीं बोललेलं आवडत नाहीं. माझ्याच वाड्यांत राहते आणि माझ्यावरच पाळत ठेवते! एकाचं दोन करून नवऱ्याला सांगते, येसूला वाटेल तसं टोचून, खोंचून बोलते. तेव्हां आहे कीं नाहीं माझ्याच वाड्यांत मलाच वागायची चोरी? म्हणून ठरवलं आहे दोन हजार गेले तरी बेहेत्तर, परत बोलीच्या अटीवर द्यायचे. परत आले ठीक, नाहीं आले उत्तम, पुन्हां मागायचे नाहींत, द्यायचे नाहींत. कांहीं झालं तरी सख्खा भाऊ आहे! पण ती ब्याद घरीं नको."

पुढें कांहीं तरी आणखी ते बोलणार होते पण इतक्यांत चांदणी चहा घेऊन बाहेर आली व तें बोलणें तितकेंच राहिलें.

राजाभाऊंच्या शेवटच्या बोलण्याचा एकदम माझ्या डोक्यावर कांहीं निराळाच परिणाम झाला. कांहीं झालं तरी तेल तूप एकच असतं, आंतडं आंतड्याकडे ओढायचंच, रक्त रक्ताला ओळखायचंच! तेव्हां बाबूराव अखेरपर्यंत यांच्या उरावर बसत राहणार आणि यांना त्यांना हक्कानें साह्य

करीत रहावें लागणार! रक्ताच्या नात्यागोत्याचा संबंध किती झाला तरी वेगळाच आहे. आम्हीं केवढ्याही फुशारक्या मारल्या तरी राजाभाऊंचे आम्हीं डकविलेले मातीचे कुल्ले आहोंत; केव्हां गळून पडूं याचा नेम नाहीं! उद्यां वहिनीसाहेब परत आल्या कीं त्या शिरजोर होणार, बाबूराव कायमचं ठाणं ठेवणार, वहिनीसाहेब आस्ते आस्ते आपल्या माहेरच्या माणसांना चरायला मोकळं रान करून देणार. पुन्हां आमची सद्दी संपली कीं आम्ही दूर भिरकावले जाऊन भुकेकंगाल ते भुकेकंगालच राहणार! चांदणीचं मोहरं अखेरपर्यंत उपयोगी पडण्यासारखं खास नाहीं, आपल्याला इथं जर कायमचे पाय रुतवायचे असतील, या तळ्याचं पाणी हक्कानें चाखण्याची सोय हवी असेल तर आहे या भांडवलावर अखेर निभणार नाहीं. तसं व्हायला बाबूरावासारखं भाऊ तरी झालं पाहिजे नाहीं तर दुसरं कसलं तरी नातं जोडलं पाहिजे.

मग काय करावें? उगीचच विचार यायला लागले ते कांहीं थांबेनात. त्या खडाजंगींतून विचाराला किती तरी फाटे फुटले. इतका विचारांचा पसारा रात्रीच्या आमच्या खाण्यापिण्याच्या मजलसींत सुद्धां पसरत नसे.

इनामदारांचं उत्पन्न म्हणजे गुळाची ढेप आहे, तिला चोहींकडून मुंगळे चिकटायचेच, त्यांत नात्यागोत्यांतल्या मुंगळयांची कायमची मिरास! तेव्हां आपल्याला नातेंगोतें निर्माण केलें पाहिजे हें स्वाभाविकच ठरलें.

माझी एक अनाथ मावशी होती. तिला एक उपवर मुलगी होती. मुलगी बुद्धीनें बथ्थड व मनानें मूर्खच होती, पण रूपानं मात्र चांगली होती. माझ्या डोक्यांत ताड्दिशीं कल्पना आली. आपल्या मावसबहिणीचं घोंगडं राजाभाऊंच्या गळयांत घालतां आलं तर? राजाभाऊंला बुद्धिमान् बायकोची काय जरूरी आहे? त्याला रूप पाहिजे. मावशी काळजींतून मोकळी होईल, बहिणीला खातंपितं स्थळ मिळेल. मी बायकोचा भाऊ, लोण्यापेक्षां मऊ, हा मला अधिकार येईल, वहिनीसाहेबांना शह होईल. आपण मातीचे कुल्ले राहणार नाहीं. बाबूरावाचे किंवा दादांचे, उपटसुंभ, होळीचे होळकर खोळभोक, अलबतेगलबते, असले शब्द ऐकून घ्यावे लागणार नाहींत. शरमायला नको व अपमान व्हायला नको. गुळाच्या ढेपेला लागण्याचा हक्काचा अधिकार मला प्राप्त होईल. असें मनांत येई पण—

राजाभाऊ व्यसनी आहेत, ठोंबे आहेत, चंचल आहेत, दुर्वर्तनी आहेत, मावसबहिणीच्या जन्माचं मातेरं होण्याचा संभव आहे–हंः! या विचारांत कांहीं अर्थ नाहीं. आपलं वांगं भाजण्याकरितां कुणाचं घर पेटणार आहे हें पाहण्यांत मतलब नाहीं. बाबूरावाला काय वाटेल, वहिनीसाहेबांच्या जन्माचं काय होईल, चांदणी काय म्हणेल, असले मूर्ख विचार करण्यांतच मूर्खपणा आहे. हजार लटपटी करायच्या, मावसबहिणीला कांहीं तरी निमित्तानें इथं आणायची, राजाभाऊंच्या दृष्टीला घालायची, व एकेक सूतोवाच करायला लागायचं. सवतीवर द्यायला मावशी तयार होईल कीं नाहीं हा प्रश्नहि मनापुढें आला पण इनामदारांच्या श्रीमंतीकडे पाहून आणि स्वतःची गरीबी लक्षांत आणून मावशी तयार झालीच पाहिजे या विचारानें प्रश्नाचें उत्तर मिळालें. समाधान झालं. इनामदार लोक दोन दोन तीन तीन लग्नं करतात. लोकही त्यांना मुली देतातच ना? श्रीमंतीपुढें सारे लटपटतात. शिवाय ज्याचं त्याचं नशीब ज्याच्या त्याच्याबरोबर असतं. नाहीं तर एका श्रीमंतीशिवाय राजाभाऊंजवळ कोणता सद्गुण वांया जातो आहे? कोणती बुद्धि उतास चालली आहे? बहीण आपल्या स्वरूपावरच हें ऐश्वर्य पटकावणार नसेल कशावरून? तिच्या जन्माचं सार्थक होईल. माझ्या जन्माचं काम होईल असेंही माझें दुसरें मन मला वारंवार सांगे. परंतु—

मी मावशीला वळवीन, मावसबहिणीला इथं आणीन पण राजाभाऊंच्या मनाची तयारी कशी करायची? त्यांचं लक्ष कसं वेधावयाचं? त्यांच्या मनांत दुसऱ्या लग्नाचं वेड कसं भरवायचं? हा पेंच पडला. पण माझं डोकं चांगलंच भडकलं होतं त्यामुळें ताबडतोब तो पेंच उलगडला. वहिनीसाहेबांना अजून मूल कुठें झालं होतं? एवढ्या इस्टेटीला मूल नाहीं म्हणजे काय गोष्ट आहे? हें राजाभाऊंच्या मनांत भरवलें कीं झालं काम! मग थोरल्या वहिनीसाहेब आड येणार नाहींत. दादासाहेब कोणत्याही प्रकारें अडथळा करणार नाहींत आणि राजाभाऊंच्या मनाची ताबडतोब तयारी होईल.

दादांच्या आणि बाबूरावांच्या खडाजंगींतून विचाराला सुरवात होऊन विचारांची मजल येतां येतां येथपर्यंत आली. प्रत्येक गोष्ट करण्याचा दृढ

निश्चयच झाला. एकेका उद्योगाला लागायचं मीं ठरवलं. पोस्टांत पत्र टाकायला व मनीऑर्डर करायला गेलों त्याच वेळीं मावशीलाही एक कार्ड मी एक दोन दिवसांत जरूरीच्या कामाकरितां भेटायला येत आहे म्हणून घाईघाईनें खरडून टाकलें.

दादासाहेबांचा आणि थोरल्या वहिनीसाहेबांचा अडथळा दूर करण्याची क्लृप्ती निघाली पण खुद्द वहिनीसाहेबांना हें कळलें तर काय होईल ? त्या आणि त्यांचा परिवार करून विरोध केल्याशिवाय कसा राहील ? हा विचार येऊन गेल्याशिवाय राहिला नाहीं. त्याला उत्तर इतकंच होतं कीं काम अत्यंत गुप्तपणानं, सावधगिरीनं आणि वहिनीसाहेब माहेराहून परत यायच्या आंत झालं पाहिजे, त्या येतील त्या वेळीं तें त्यांच्या आटो क्याच्या बाहेर गेलेलं पाहिजे म्हणजे मिळवलं.

माझ्या मनांत हे विचार आले आणि खरोखरच त्याच क्षणापासून मी पुढल्या उद्योगाला लागलों. मात्र त्या क्षणापासून, मित्र होतों त्याचा शालक होणार ही कल्पना येण्याबरोबर राजाभाऊंकडे पाहण्याची माझी दृष्टि खाडकन् बदलली, हें सांगण्यासारखं आहे इतकं मात्र खरं !

---

# प्रकरण सतरावें

## आमच्या सद्दीचा उदय

माझी बहीण राजाभाऊंच्या गळयांत बांधून इनामदारांना लुबाडायला हक्काचे मानकरी व्हावयाचें, ही कल्पना येऊन त्याप्रमाणें लगेच उद्योगाला लागायची वेळ, वहिनीसाहेब माहेरीं गेल्या दिवसानंतर बऱ्याच काळानें आली होती. परंतु तोंपयत राजाभाऊंच्या वर्तणुकीचा वारू बराच बेफाम झाला होता. जवळ जवळ त्याची लगाम माझ्या हातून सुटण्याच्या बेतांत होती आणि त्याला कारण प्रथम माझा मीच होतों. मीच त्यांना

चांदणीकडे नेलें, तिथला कार्यक्रम पूर्ववत् चालू करायला मीच कारणीभत झालों होतों आणि आणखीही बराच मूर्खपणा अति शहाणपणानें मींच केला होता. वहिनीसाहेबांचें शल्य आम्हांला आहे हें कारणाशिवाय राजाभाऊंच्या लक्षांत येऊन घोंटाळे माजूं नयेत म्हणून मी बाह्यतः वहिनीसाहेबांच्याच बाजूचें धोरण धरलें होतें. जरी आमच्या चैनीवर, सुखावर आणि ऐष-आरामावर वहिनीसाहेबांनींच घाला घातला होता, राजाभाऊंना आमच्या-पासून दूर करून, आमच्यांत त्यांना पूर्ववत् मिसळतां येऊं नये म्हणून त्यांच्यावर जागता पहारा ठेवून, आम्हांला कःपदार्थ करून टाकलें होतें, आम्हां-कडे पाहाण्याची वेळ आली असतां हेटाळणीनेंच पाहिलें होतें व तुच्छतेनेंच वागविलें होतें तरीही प्रसंगाशिवाय विरोध कशाला दाखवा, व आम्हीं उभयतां पतीपत्नींचें सदैव चांगलेंच पाहातों—उभयतां आम्हांला पूज्यच आहेत, असें हर प्रयत्नानें दाखविण्याची प्रत्येक वेळ मी जाणून जून कधींच दवडली नव्हती.

वहिनीसाहेब माहेरीं पोंहोचतांच, त्यांचें तिकडून पहिलें पत्र राजाभाऊंना आलें तें त्यांनीं मला दाखविलें. गुप्त रहस्य किंवा प्रणय असली कसलीच भानगड त्यांत नव्हती. फक्त हातीं घेतलेल्या कामांत दुर्लक्ष करूं नये—शेतकऱ्याना, गरीबांना, त्यांच्याकरितां आणि आपल्याहि चांगल्याकरित पुष्कळ वचनें दिलीं आहेत, तीं ते लोक येतील त्या वेळीं पुरीं करावींत वगैरे दिव्य संदेश होता ! राजाभाऊंनीं मला पत्र दाखविलें आणि मलाच विचारलें "काय करायचें याचें? काय लिहायचं या पत्राला उत्तर?" मी काय लिहायचं तें सांगितलं इतकंच नव्हे तर त्यांच्याकडून लिहून घेतलें व मी स्वतः पत्र पोष्टांत टाकण्याइतकी दक्षता दाखविली. दुसऱ्या पत्राच्या वेळीं राजाभाऊ चांदणीच्या नादांत एकदम बरेच रंगले. एकाद्या रोगाचा प्रसार जसा हां हां म्हणतां देशच्या देश व्यापतो, तीच अवस्था राजाभाऊंच्या मनाची होती. वहिनीसाहेबांच्या बाब-तींतली परवांची आस्था काल राहिली नाहीं व कालची लहर आज उरली नाहीं. दुसऱ्या पत्राचें उत्तर ते लिहायला तयार होईनात, 'काय शिंची रोजरोज कटकट ? रोजरोज पत्रांत लिहायचें काय आणि दररोज आम्हीं करणार काय ?' असें म्हणून त्यांनीं वहिनीसाहेबांचें दुसरें पत्र

माझ्या अंगावरच टाकून दिलें. दुसरें पत्र मी लिहिलें, राजाभाऊंना वाचून दाखविलें, त्यांची फक्त सही घेतली आणि टपालांत टाकलें. आमच्या इकडच्या चालू झालेल्या चैनीला आणि ऐषआरामाला धोका लवकर पोचूं नये म्हणून अशी आस्था दाखविली!

पत्राचा कारभार असा झाला पण खरोखरच वहिनीसाहेबांनीं स्वतःच्या शहाणपणानें उठविलेली शेतकऱ्यांची आणि गरीबांची भुतावळ दररोज नव्या दमानें वाड्यांत घुसून मानगुटीवर बसूं लागली होती तें मला मुळींच पसंत नव्हतें. कुणी शेतांत विहीर काढून जिराइताचें बागाईत करण्याकरितां धरणं धरी, तर कुणी अमक्या शेतांत मोठी ताल फुटली आहे तिला भराब घालण्याकरितां म्हणून पैशांची मागणी करी; कुणी शेतांत फुलबागा आणि फळबागा करायला वहिनीसाहेबांनीं आज्ञा दिली आहे, कामाला सुरवात झाली आहे, मजूरांचा पगार पाहिजे, तो न्यायला आलों आहे तेवढा द्या, म्हणून दारांत येऊन बसे. एकजण येई, सांगे मी आपलं वंशपरंपरेचं कुळ आहे, जन्मभर पुढेंही राह्यची इच्छा आहे पण मला लोकांचं कर्ज आहे तें फेडण्याची तरतूद करावी, पोराचं लगीन करायचं आहे, लग्नाला कांहीं रक्कम द्यावी, कागद लिहून घ्यावा, नाहीं तर शेत सोडून मुलुखाला जाणं भाग आहे, अशा हजार तऱ्हेनें शेतकरी आणि गरीब लाचारी वाड्यांत धरणं धरून बसूं लागले. जो येई तो प्रथम वहिनीसाहेबांची चौकशी करी, मग दादासाहेबांकडे जाई. त्यांनीं हुसकून लावलं म्हणजे वाड्यांतून हुसकलेला प्राणी निराश होऊन परत न जातां लोचटपणानें राजाभाऊ चांदणीकडे बसलेले असत तेथपर्यंत हुडके काढीत येई. लांबलचक रामराम ठोकून दिलेल्या वचनांची आठवण देई आणि मागणी करी. येणाऱ्या प्रत्येक माणसाचें ठराविक शब्द 'वहिनीसाहेबांनीं सांगितलं आहे–इनामदार साहेबांनीं मान्य केलं आहे म्हणून आम्हीं आलों आहोंत' असे असत.

राजाभाऊंना आतां येणाऱ्या लोकांचा बैदा होऊं लागला. त्यांची कल्पना 'आम्हीं सांगितलें, कबूल केलें, कबूल आहे. पण म्हटल्या बरोबर म्हटल्याप्रमाणें लगेच वागलं पाहिजे असं थोडंच आहे? शिवाय सगळींच वचनं पाळण्याकरितां दिलेलीं असतात असं तरी कुठें आहे!

बैठकीला रंग आणण्याकरितां तसं म्हणावं लागतं आणि हे गरीब शेतकरी लेकाचे बोललेलं सारं खरंच समजतात!' अशी असे.

आणि राजाभाऊंचें हें म्हणणं खरेंच नाहीं का ? जगांत चोहींकडे असंच नसतं का! मला राजाभाऊंची ही विचारसरणी मान्य होती पण त्या बाबतींत अगोदर राजाभाऊ बोलतच नव्हते आणि आपण होऊन तोंड घालण्याची मला आवश्यकता नव्हती. पण एक दिवस प्रसंग आला आणि बोलावं लागलं. ती एक और गंमतच झाली—

रोजच्याप्रमाणें संध्याकाळीं चांदणीच्या घरीं मी आणि राजाभाऊ असे कॅरम खेळत बसलों होतों. चांदणी, सोड्याच्या बाटल्या आणणें, गरम चिवडा–ताजीं भजीं मागवणें, सिगारेटच्या पेट्या बोलावणें, ग्लासांची जमवाजमव करणें, आदल्या दिवशींची शिल्लक किती आहे ती पाहणें यांत गंतली होती. आमचा खेळ रंगांत आला होता व चांदणीची बहुतेक मांडामांड होत आली होती. तिनें कांदे चिरले व बैठकीच्या बाजूला एक कसलेंसें मोठें थोरलें इंग्रजी वर्तमानपत्र पसरलें. तिची तयारी झाली म्हणून ती खेळ संपवायचा तगादा करूं लागली. खेळ संपत आलाच होता, पण गोपाळभय्याला राजाभाऊंनीं कुठंसा पाठविला होता तो यावयाचा होता. राजाभाऊंचें गोपाळभय्याकडे एरव्हीं लक्ष नसलें तरी वेळेला ते त्याला कधीं विसरत नसत. त्यांना तो करमणुकीला, वाटेल तें बोलायला, त्याची हवी तशी फजिती करायला अवश्य लागे. 'बर्फाशिवाय व्हिस्कीला मजा नाहीं' असं एकच प्याल्यांत जें वाक्य आहे, तें राजाभाऊ आणि गोपाळभय्या यांच्यासंबंधांत तेवढ्यापुरतें तंतोतंत लागू पडण्यासारखें होतें. सांगायचं कारण इतकंच, गोपाळभय्या यावयाचा होता आणि त्याच्याकरितां आम्ही थांबलों होतों. चांदणीनें पेले भरायला देखील सुरवात केली, इतक्यांत गोपाळभय्या आला. दारांतच त्याला चांदणीनें पाहिलें आणि आम्हांला म्हटलें "हं. पुरे झाला तो खेळ. गोपाळभय्या आला ना ? आतां कां मग बैठकीला उगीचच्या उगीच उशीर ?"

चांदणीचं वाक्य पुरं होत आहे नाहीं आणि आम्ही कॅरम बोर्ड बाजूला करून उठतों आहों नाहीं, तोंच गोपाळभय्या आणि त्याच्या पाठोपाठ चांगले चार पांच लब्धप्रतिष्ठित आडमुठे मरगट्टे आंत आले !

आमची सर्वांची क्षणभर त्रेधाच उडाली. लपवायला जागा नाहीं, बाजूला सारायला वेळ नाहीं! गोपाळभय्या तर समोरचा देखावा आणि मागचीं माणसं पाहून जागच्याजागीं ऑ करून राहिला. मी तितक्यांत सांवरलों, राजाभाऊंनीं अवसान धरलें, व मी " कोण आहे? कशाला आंत आलांत? चालते व्हा अगोदर " असें ओरडलों. ते मरगट्ठे शेतकरी जमिनीला हात लावून रामराम करण्यास वांकताहेत तोंच " लाथा मारून हाकून द्या यांना! गोप्या, गाढवा—" अशी राजाभाऊंनीं गर्जना केली. डोळ्याचें पातें लवण्याच्या आंत गोपाळभय्याची लाथ वांकलेल्या मरगठ्यांच्या डोकींत बसली. त्यांची मान वर होण्याच्या आंत ते दाराच्या बाहेर एकदम ढकलले गेले व पुढें होऊन मी आंतून कडी लावली. गलथान गोपाळभय्या राजाभाऊंच्या लाथाबुक्क्यांचा यथास्थित प्रसाद घेत होता! नेहमीं असेंच चाले. राजाभाऊंची कल्पना झाली कीं, त्या लोकांना गोपाळभय्यानें बरोबर आणलें. गोष्ट खरीहि होती! पण चांदणीकडील कार्यक्रम आज इतक्या लवकर होणार असेल ही गोपाळभय्याला काय कल्पना? आमची रोजची कांहीं ती वेळ नव्हती! पण कॅरम खेळण्याच्या नादांत राजाभाऊंना काय लहर लागली कोण जाणे, त्यांनीं चांदणीला बैठकीचा कार्यक्रम आज जरा लवकर उरकण्याची निकड केली. राजाभाऊंच्या लाथाबुक्क्यांची बिचाऱ्या गोपाळभय्याला मेजवानी मिळाली खरी! मी पुढें होऊन दोघांना दूर केलें. चांदणीही राजाभाऊंना बाजूला घ्यायला धांवली व तें प्रकरण तितक्यावरच मिटलें.

नंतर आमच्या कार्यक्रमाला मुकाट्यानें आरंभ झाला. पण मजलस मुकाट्यानें झाली तर मौज कसली? पण सुरवात कोणी करायची हा प्रश्न होता. चांदणी एकेक जिन्नस एकेकापुढें सारी व ' हं ' एवढेंच म्हणे.

थोडा वेळ तसाच गेला. राजाभाऊंना आपली चूक कळली म्हणा कीं त्यांना स्वस्थ बसणें बरें वाटेना म्हणून म्हणा, त्यांनींच शेवटीं तोंड उघडलें. " गोपाळभय्याची, उगीचच लेकाची कणीक तिंबली मीं!"

" बरोबर आहे. त्याचा कांहींच अपराध नव्हता. " चांदणी उद्गारली.

" खरं आहे. ही शेतकऱ्यांची ब्याद माझ्यामागें आमच्या शहाण्या राणीसाहेबांनीं लावली आहे? केऱ्याचं प्रायश्चित्त नाऱ्याला मिळालं आज!"

राजाभाऊ बोलले आणि आपणच हंसले. हंसण्याला कारण रंगांत येण्याशिवाय दुसरें कांहींच नव्हतें.

आतां मला बोलावेसें वाटलें. मीं म्हटलें, "राजाभाऊ, आम्हांला बोलायचं कांहीं कारण नाहीं म्हणा, पण विषय निघाला आहे म्हणून बोलतों. वहिनीसाहेबांनीं ही ब्याद आपल्यामागें लावली आणि आपण लावून घेतली आहे हें खरें ना ?"

"हो, मग ?"

"यापासून फायदा काय तुमचा ?" मी जरा जोरानें विचारलें.

"फायदा कसला आला आहे? राणीसाहेबांचें तें एक लोककल्याणाचं, देशभक्तीचं वेड आहे झालं."

"आणि वेड असून उघड्या डोळ्यांनीं तें तुम्हीं अंगाशीं घेतां ?"

"मग करायचं काय तर ? एकदां राणीसाहेबांजवळ होय म्हणून चुकलों आहे ना ? तेवढ्याकरितां करायचं दुसरें काय ? मला मनापासून आवडत नाहीं आणि नकोही आहे तें, हें तुला ठाऊक नाहीं वाटतं ?"

"मग सोडून द्या."

"मग धरा काय ? तूं तरी सांग."

"मी सांगतों. तुम्हांला लोककल्याण, देशभक्ति असंच कांहीं तरी करायचं आहे ना ?"

"मला कांहींच करायचं नाहीं. मला फक्त हें करायचं आहे !" राजाभाऊंनीं तोंडाला ग्लास लावीत हंसत म्हटलें, "मला करायचं आहे तें आमच्या रुक्मिणीकरितां ! ती शहाणी आहे ना ? तसं कांहीं तरी केल्याशिवाय तिला बरं वाटत नाहीं."

"लोककल्याण, देशभक्ति तुम्हांला काय करायची ती खुशाल करा ना ! तुम्हांला नको कोण म्हणतो ? क़ाय ग चांदणी ?" आमच्या चर्चेला जोरानें आरंभ झाला. मी हात राखून काम चालविलं होतं पण चांदणी माझं चालूंच देत नव्हती. मी बोलण्याच्या नादाला लागलों कीं, ती आपला माझा ग्लास भरायचीच ! आजच्या बोलण्यांत माझा एक हेतु साधायचा होता. वहिनीसाहेबांचा कार्यक्रम बाजूला लोटून राजाभाऊंना मला मोठ्या खर्चाच्या देशभक्तींत ढकलायचं होतं. तसं केल्याशिवाय त्यांचा

मुबलक पैसा आम्हांला उधळायला मिळणार नव्हता. आज त्या धोरणानं अगदीं मनाची पक्की सावधगिरी राखून मी बोलत होतों. मी पुढें म्हणालों, "राजाभाऊ, तुम्हांला देशभक्तीच करायची आहे ना? मग अशा दारिद्र्यांत शिरून, निनांवीं, निगांवीं कसली देशभक्ति करतां? ज्यांत कांहीं लौकिक होईल, चार मोठ्या लोकांच्या तोंडीं नांव होईल, वर्तमानपत्रांत तुमचा फोटो येईल, अशी कांहीं देशसेवा करा. कबूल करूं आम्हीं! भिकाऱ्याला देऊन काय आणि फाटक्याला शिवून काय सारखंच! तसेंच या आडमुठ्या शेतकऱ्यांचं! यांना जों जों आश्रय द्याल तों तों ते लेकाचे जास्तच डोक्यावर बसतील आणि तुम्हांला लुबाडतील. शंभर वर्षें घालविलीं आणि पन्नास कुबेर भिकारी केले म्हणून ही अडाणी शेतकऱ्यांची जात का सुधरायची आहे? अहो, हें अनादि कालापासून असंच चालत आहे. पूर्वीं शेतकरी दरिद्री होता, आज आहे आणि पुढेंही अनंत कालपर्यंत तो तसाच राहणार! अशा दरिद्र्यांना तुम्ही किती आणि कसे पुरे पडणार? सांगा, मी म्हणतों हें पटतं कीं नाहीं बोला."

"बरोबर–बरोबर आहे–अण्णा–बरोबर आहे–काय चांदणी?" राजाभाऊ बोलतांना चांचरूं लागले होते तरी पण थोडी जाणीव त्यांना अजून होती. तशाही स्थितींत ते माझें बोलणें लक्षपूर्वक ऐकत होते. "लेका, गाढवा, उंटा, अण्ण्या, इतके दिवस मग तूं कां बोलला नाहींस?"

"पण राजाभाऊ आपण तरी मला कुठें विचारलं होतंत? जेव्हां तेव्हां अण्ण्या, गाढवा, गद्ध्या म्हणायचं–तुला काय कळतंय म्हणायचं–मग मी कसा बोलणार?" माझी जीभ किंचित् चांचरायला लागली होती, पण मी नेटानें बोलत होतों. बोलतांना पुढ्यांतल्या खमंग तेलकट चिवड्यावर, तिखट भज्यावर आणि कांद्यांच्या फांकीवर ताव मारायचं काम चालूंच होतं. मधून मधून सिगारेट पेटवणं, त्याच्या ठिणग्या आपल्या नाहींतर दुसऱ्याच्या अंगावर उडवणं, चटका लागूं नये व कपड्याला भोंकं पडूं नयेत म्हणून ठिणगी विझविण्याकरितां फटकर चपराक मारणं हे आमचे व्यवसाय एकसारखे चाललेलेच होते.

"बोल अण्ण्या, शेतकऱ्यासारख्या दरिद्र्याला सोडून देऊं का? आमच्या ऐन मजलसीच्या वेळीं येऊन आमच्या रंगाचा बेरंग करतात लेकाचे!

उद्यांपासून त्यांना एकदम बंदी! एकदम मज्जाव! मग आम्हीं आतां काय करावं तें तूं बोल. तूं आमचा आतां गुरुजी, भाऊ, बाप, देव, बायको, तूं बोल! तुझं आम्हीं ऐकणार!" राजाभाऊंची स्वारी ब्रह्मानंद चाखीत होती.

त्यांना काय सुचवावें याबद्दल सिगारेटच्या सोडलेल्या धुरांच्या ढगाकडे पहात डोकें खाजवून मी विचार करतों आहे तोंच "खरंच सावकार, तुम्हीं कुठें कसले मेंबरबिंबर कां होत नाहीं?" चांदणीनें मध्यें उगीच कांहीं तरी म्हणूनच विचारलें.

मी ताड्दिशीं तेवढ्याच फायदा घेतला. झट्दिशीं वळलों आणि आवेशानें म्हणालों, "ऐका राजाभाऊ, चांदणीचा सल्ला ऐका! सत्रा आणे सल्ला आहे. शाबास चांदणी, हुशार आहेस तूं! राजाभाऊंना राग येईल पण आतां मी बोलतोंच."

"बोल, बोल, अरे दोस्त, तुझ्यावर रागवणार? आणि मी? वाः! काय गोष्ट आहे?" माझ्या हनुवटीला हात लावून, तोंड वर करून, अगदीं जवळ तोंड आणून राजाभाऊ मोठ्या लाडांत येऊन बोलले.

"ही चांदणी—एक अशिक्षित बाई—पण तिला तुम्हीं मेंबर व्हावंसं वाटतं, मोठे व्हावं अशी तिची इच्छा! तुम्हांला सुचत नाहीं, आम्हांला सुचत नाहीं. आमचं राहूं द्या पण शहाण्यासुरत्या आमच्या वहिनीसाहेबांना हें सुचलं नाहीं. त्यांचं शहाणपण या बिनशिकलेल्या चांदणीच्या शहाणपणापुढें रद्द आहे. वहिनीसाहेब तुम्हांला एक यःकश्चित् शेतकरी व्हायला सांगतात, अडाण्यांत घुसडतात, तुम्हांला अडाणी समजतात, अडाण्यासारखे वागवतात—"

"अरे जा रे, आतां तिचं कोण ऐकणार? मी अडाणी असलों तरी श्रीमंत आहे, इनामदार आहे." राजाभाऊ मोठ्यानें ओरडले.

"मग झालें तर!" मी त्यांची साथ केली. "वहिनीसाहेब तुम्हांला इनामदाराचा शेतकरी करीत आहेत, तर ही चांदणी तुम्हांला इनामदाराचे सरदार व्हावयास सुचवीत आहे. म्हणून मी म्हणतों, अगदीं ठांसून सांगतों, वहिनीसाहेबांच्यापेक्षां ही चांदणीच श्रेष्ठ आहे. या बाबतींत तिचाच सल्ला ऐकला पाहिजे!"

“ काय आहे चांदणीचा सल्ला, बोल चांदणी. ”

“ आपण मेंबर झालं पाहिजे ! ” चांदणीच्या ऐवजीं मींच सांगितलं.

“ कशाचा मेंबर ? ”

“ म्युनिसिपालिटी, जिल्हा लोकल बोर्ड, असेंब्ली, वाटेल तिथें आपल्याला मेंबर होतां येईल. आपण इनामदार आहांत, श्रीमंत आहांत, तुम्हीं इलेक्शनला उभे राहिलांत कीं सर्व लोक तुम्हांला निवडून आणायला साह्य देतील. कलेक्टर मोठ्या हौसेनं आणि प्रेमानं साह्य करील.”

“ आणखी काय काय आम्हीं होऊं शकूं ? ”

“ आणखी ? आणखी काय ? इनामदार लोकांचा संघ निघाला आहे. इनामी वतनासंबंधानें, हक्क संरक्षणासंबंधानें संघाचे प्रयत्न चालू आहेत. आपण इनामदार आहांत, आपल्याला त्यांत घुसतां येईल. तिथं आपलं नांव गाजवितां येईल, देशभक्ति साधेल, लोककल्याणाचा नगारा बडवितां येईल. ” मलाहि बोलायची विलक्षण स्फूर्ति झाली.

“ अरे पण गद्ध्या, ” पुन्हां डोक्याचें चक्र फिरून राजाभाऊंना मध्येंच दुसरी लहर लागून ते विचारूं लागले, “ अण्ण्या, मी अडाणी आहें, मला बोलतां येत नाहीं, धड वाचतां येत नाहीं, विशेष कांहीं समजत नाहीं. मग म्युनिसिपालिटींत–जिल्हा बोर्डांत–कौन्सिलांत आणि आमच्या इनाम-दार संघांत शिरून आम्हीं कसले दिवे लावणार ? बोलणार काय आणि करणार काय ? ”

“ त्याचा वाद आतां नको आहे ! त्यांत शिरल्यावर काय करतां येईल हा पुढचा प्रश्न आहे ” मला आतां त्यांना व मला सांवरून घेणें भाग होतें. कारण तारूं भडकण्याच्या बेतांत आलें असें नक्की वाटूं लागलें. म्हणून मी म्हणालों “ राजाभाऊ, पुढला विचार आपण नंतर करूं. मी विचार करून नंतर सविस्तर सांगेन. पण आतां एवढें सांगतों कीं आपण श्रीमंत आहांत, पैसा टिचला कीं बोलणारीं आणि बोलायला लावणारीं—शिकवणारीं विद्वान माणसं बाजारांत सध्यां पैशापासरी मिळतात; त्याची काळजी आपल्याला नको ! शिवाय सगळ्या ठिकाणीं मी आहें ना ! इतकीं रोज वर्तमानपत्रं वाचतों, वाचून दाखवतों तीं काय उगीच ? मला सगळें कांहीं माहीत आहे. कौन्सिलांत गेलांत तरी प्रत्यक्ष कांहीं करावं लागणार नाहीं.

इनामदार संघांत तसंच ! फक्त तुम्हीं राजाच्या जांवयासारखं नटून इकडून तिकडून मिरवायचं, तिथल्या खुर्च्या सुशोभित करायच्या, बस्स ! तिथलीं कामं, करणारे करीत असतातच ! श्रेय आणि मोठेपणा मात्र तुमच्या पदरीं शीग भरून पडणार ! ”

“ असं आहे ? ठीक आहे ! मग ठरलं तर ! आतां त्या उद्योगाला उद्यांपासून लागावयाचंच ! ” राजाभाऊंचा त्या बैठकीला एकदम निश्चय झाला. मी मार्ग सुचविल्याबद्दल त्यांनीं माझं अभिनंदन केलं, आनंदानें मला मिठी मारली व चांदणीला पण शाबासकी दिली.

पुन्हां चालू कार्यक्रमाकडे आम्हीं वळलों. मुख्य विषय संपलाच होता. अवांतर गप्पासप्पांचा आरंभ झाला; हंसणें, खिदळणें, थट्टामस्करी यांची लयलूट झाली. तशीच गोपाळभय्याची चेष्टाहि मनमुराद झाली !

दुसऱ्या दिवशीं कालचें बोलणें विसरलें जाईल—कारण ती वेळच तशापैकीं—अशी माझी कल्पना होती पण माझ्या कल्पनेच्या विरुद्ध झालें. कौन्सिलमध्यें शिरण्याचा, इनामदार संघांत जाण्याचा राजाभाऊंचा निश्चय पक्काच झाला. त्याबद्दल दुसरे दिवशीं गंभीरपणानें त्यांनीं मला विचारलेंच. काय करावें लागेल, सहाय्याला कुणाला घेतां येईल, आपल्याकडे मागें आलेल्या पाहुण्यांना बोलावलं तर कांहीं उपयोग होईल कीं काय ? या सर्वांबद्दल त्यांनीं विलक्षण उत्सुकतेनें चर्चा चालू केली. मलाहि मग नाहीं म्हणतां येईना. शिवाय त्यांत माझें कांहींच नुकसान नव्हतें; उलट फायदाच होता. नॉमिनेशनचा अर्ज देण्यापासून तयारी करायची म्हणजे खर्चाची पिशवी मोकळी ठेवायची ! एजंट नेमणें, गाड्या पळवणं, पार्ट्या देणं, प्रतिपक्षाचीं मतें फोडणं, वाटेल तें करावं लागणार ! पाण्यासारखा पैसा उधळायचा पण राजाभाऊंना कौन्सिलांत निवडून आणायचं एवढं ठरल्यावर मग काय ? स्वार्थ आणि परमार्थ भरपूर साधत आहे मग मी काय म्हणून मागें घेणार ? मीहि जोराची संमति दिली. पण हा नवा उद्योग खर्चाच्या दृष्टीनें दादासाहेबांना कितपत रुचेल, सौभाग्यवतीला कसा काय आवडेल, त्यांना कळवायचं झालं तर कसं काय कळवायचं ? हे प्रश्न राजाभाऊंनीं काढलेच. त्यावर ‘दादासाहेब तुमचे वडील असले तरी नोकर आहेत. तुमची मुखत्यार कारकीर्द आहे, तुम्हीं आपल्या अधिकारांत चाहील तें करूं शकतां.

पैसा खर्च केल्याशिवाय मोठपणा मिळणार कसा ? दादासाहेबांना आवड-णार नाहीं, पण ते चिरंजीवाच्या मोठेपणाच्या आड तरी कां येतील ? शिवाय खर्च कांहीं भलत्याच कामांत होत नाहीं. तीच गोष्ट वहिनीसाहे-बांची ! वर्तमानपत्रांत आपलं नांव, फोटो येऊं लागले, आपली जाहीर-पत्रकें, प्रतिज्ञापत्रकें, आपल्या भावी पराक्रमाच्या आरोळ्या, पूर्वार्जित श्रेष्ठ-पणाचीं वर्णनें चोहोंकडून एका सुरांत, एका दमांत येऊं लागलेलीं वहिनी-साहेबांनीं पाहिलीं, वाचलीं, ऐकलीं म्हणजे त्यांना काय वाईट वाटेल ? त्या काय नाखूष होतील ? तुम्हांला हें कसें सांगायला चुकलों कीं शेतकऱ्यांत शिरण्याच्या दरिद्री कल्पनेपेक्षां, व वळ ना फळ अशा वाळूंत इमा-रती रचण्यापेक्षां कौन्सिलांत शिरून, मोठें होऊन, केवढें तरी लोककल्याण आणि देशभक्ति होणारी आहे ! तें काय वहिनीसाहेबांना नकोसें होईल ?' असें मीं सांगितलें. राजाभाऊंची पुरेपूर खात्री पटली. या वेळीं वहिनीसाहे-बांचं माहेराहून तिसरं कीं चौथं पत्र आलं होतं. उत्तर लिहायला लावावं आणि त्यांत या भव्य कल्पनेचा पसारा कळवावा असं मला वाटलं, राजा-भाऊंनाही वाटलं पण गडबडींत तें मग कांहीं झालंच नाहीं. पुन्हां मनांत आलं कीं खाजगी पत्रांतून कळविण्यापेक्षां जाहीररीत्या वर्तमानपत्रांतून परस्पर कळेलच. त्याचा आकस्मिक आनंद वहिनीसाहेबांना केवढा तरी होईल. तें तसेंच होऊं द्यावं असं आळशी राजाभाऊंनाही वाटलं म्हणून वहिनीसाहेबांना पत्रही गेलं नाहीं आणि उत्तरही धाडण्यांत आलं नाहीं. उद्योगाला लागल्यावर खाजगी पत्रं पाठवायला वेळ कुठून मिळणार ?

राजाभाऊंच्या आज्ञेप्रमाणें मी एकेक त्या माहितीच्या व कार्यांच्या मागें लागलों. मोठेपणाचा चाळा व नाद मोठा वाईट असतो. दूर आहे तोंपर्यंत ठीक, पण एकदां का कानांत वारं शिरलं कीं भडकलंच मनाचं वासरूं ! राजाभाऊंचेंहि तसं झालं. माझंहि तसंच झालं. वाड्यांत कळलं तेव्हां दादांनीं कुरकूर केली, थोरल्या वहिनीसाहेबांनींही नको म्हणून सांगितलें पण मग ऐकणार कोण ? आम्हीं चिथावणारे म्हणून पाठीमागें आणि तोंडावर दादा आमची षोडषोपचार महापूजा बांधूं लागले. त्याच सुमारास बाबूराव सहकुटुंब वाड्यांत बसलेच होते. दिवसेंदिवस दादांचें किंवा कोणाचेंच बोलणें मला सहन होईनासें झालें होतें. मी अलीकडे सहसा

वाड्यांत जायचीहि टाळाटाळ करूं लागलों होतों व घरींच असें. उरलेला वेळ चांदणीच्या येथें; तेथें मग राजाभाऊंची भेट होईच. गोपाळभय्या स्वभावतःच आडमुठा आणि मूर्ख असल्यामुळें वाड्यांत आपल्याविरुद्ध कोण काय बोलतो आणि तें वाईट का चांगलें हें त्याला कळत नसे. तो ऐकत नसे; ऐकलं तरी मनावर घेत नसे; म्हणून वाडा—चांदणीचं घर—आणि माझें घर यामध्यें कोष्ट्याच्या कांडीप्रमाणें कामाकारणें गोपाळभय्यालाच आम्हीं उपयोगाला आणीत होतों.

अशाच दरम्यान बाबूराव आणि दादा यांच्यामधला खडाजंगीचा प्रसंग घडला. बाबूराव नाहीं होय म्हणतां म्हणतां परतीच्या शर्तीवर दीड हजार रुपये घेऊन गेले. माझ्या बहिणीबद्दल मला कल्पना आली होती व मी त्या उद्योगाला लागलों. आतां निवडणुकीच्या संबंधींच्या खर्चाची सारी सूत्रें माझ्याच हातीं असावींत असं मला वाटायला लागलं. राजाभाऊंचा कितीहि खर्च व्हावयाचा असला तरी होऊं द्या, पण तो माझ्या हातून. त्यांत काय लभ्यांश व्हायचा असेल तर माझा—मलाच एकट्याला—असें मला वाटूं लागलें व मी तशी तजवीज ठेवूं लागलों.

त्यानंतरची वहिनीसाहेबांचीं येणारीं पत्रें वाड्यांतून गोपाळभय्याच्याकडून अगोदर माझ्याकडे मी आणवूं लागलों. राजाभाऊंच्या हातीं तीं पत्रें पडणें मला प्रशस्त वाटेना. मी वाची; मीच फाडून टाकी. ना देवा, ना लेवा. इकडचें तिकडे नाहीं; तिकडचें इकडे नाहीं. वहिनीसाहेब पत्रांतून आपल्या मैत्रिणींचीं वर्णनं लिहित. त्यांच्या चाललेल्या भाषा, आपण त्यांना सुचवीत असलेले मार्ग, भावी काळीं त्यांच्या ज्ञानाचा आपल्याला होणारा उपयोग, त्यांच्याबाबत आपल्या मनांत येणारे विचार, आपल्याकडील कार्याचें स्वरूप वगैरे वगैरेही असेच. पण पत्राचीं उत्तरें नाहींत म्हणून केव्हां रागाचं तर केव्हां रुसव्याचं, केव्हां लाडाचं तर केव्हां काळजीचं, केव्हां संतापाचं तर केव्हां कळवळ्याचं, केव्हां भीतीचं तर केव्हां जरा अधिकाराचं असं पत्र लिहिलेलं असायचं. आपणच लिहायचं आणि आपणच त्याचं निराकरण केलेलं असायचं. 'पत्र नाहीं, उत्तर नाहीं तेव्हां अकल्पित येऊन मला चकित करायचं व्हायचं आहे कीं काय? दररोज मला तसं वाटतं पण शेवटीं निराश होतें. आणखी

वाटतं मीच कामं मागें लावलीं आहेत, दमून जायचं होत असेल, पत्रं वाचायला नी लिहायला वेळ मिळाला तर पाहिजे. वाटतं पत्र नाहीं आलं तरी चालेल पण कामांत व्यत्यय नसला म्हणजे झालें. मला पत्र नाहीं म्हणून एकदम निघून यावेंसें वाटतं. प्रकृति तर ठीक आहे ना?' हें आणि असेंच, प्रत्येक पत्रांत किती तरी प्रकारांनीं सुंदर अक्षरांत अंतः-करणाच्या तळमळीनें लिहिलेलें असे. दुसऱ्याचीं, त्यांतून प्रेमळ पती-पत्नींची, खाजगी गुप्त पत्रें वाचूं नयेत हें खरें. मी वाचलींहि नसतीं; राजाभाऊंनीं दिल्याशिवाय पूर्वी कधीं आपण होऊन वाचीतहि नव्हतों, पण आतां माझी मावसबहिण वहिनीसाहेबांची सवत व्हावयाची होती. मला तो उद्योग करायचा होता. मग तीं त्यांची पत्रें वाचल्याशिवाय, मधल्यामध्येंच फाडून टाकल्याशिवाय आणि जितका वहिनीसाहेबांच्या बाबतींत आठवणीसारखा कमी संबंध येईल तितक्या बाबतींत खबरदार राहिल्याशिवाय मला दुसरें गत्यंतर काय होतें?

वहिनीसाहेबांचीं येणारीं पत्रें निर्धास्तपणें, निर्विकारपणें मी चिंध्या करून फेंकून देत असें. आमच्याहि बहाद्दर इनामदारांना आपल्या सौभाग्यवतीचें स्मरण तसें फारसें कुठें होत होतें? आपल्या पाठीमागची कांहीं दिवस पीडाच टळली आहे अशा समजुतीनेंच जणूं काय ते वागत होते व माझ्या तें फायद्यावरच पडत होतें.

परंतु वहिनीसाहेब माहेरीं किती दिवस राहतील व इकडे केव्हां येतील याचा मुळींच नेम नव्हता. माझी कारवाई फळाला यायच्या आंत जर त्या आल्या तर आमचं सर्वच ऑफस् होणार होतं! निदान तशी धास्ती तरी होतीच! म्हणून जितकी त्वरा करतां येईल तितकी करून मावसबहिणीला घेऊन येऊन इनामदारांच्या नजरेखालीं घालून, राजकारण जितक्या लवकर रंगारूपाला आणतां येईल तितक्या लवकर तसें करणें भाग होतें.

इकडे राजाभाऊंनीं इलेक्शनला उभें राहावयाचें मनांत आणून तें काम जवळजवळ धसाला लावलेलें! रोज जा इकडे, जा तिकडे, याला पत्र लिही, त्याला निरोप धाड, याला विचार, त्याला पाचार असा उपक्रम सुरू झालेला. मेंबर होण्यांत मोठेपणा असतो, काम कांहीं नाहीं केलें तरी चालतें, पण मोठेपणांत कमतरता नसते, हें वेड माथ्यांत शिरल्यावर राजा-

भाऊ स्वस्थ बसणार कसे? निवडून येण्याचें व मेंबर होण्याचें बाशिंग केव्हां कपाळाला चिकटतें असें राजाभाऊंना व्हावयाला लागलें. तें बाशिंग त्यांना लागलें तरी माझी हरकत नव्हती. मला माझ्याकरितां, माझ्या मावसबहिणीला स्वीकारण्याकरितांही त्या बाशिंगाचा उपयोग व्हावयास पाहिजे होता. अगोदर इनामदार आणि नव्या मनूंतल्या मोठेपणाला अनुसरून माझ्या मावसबहिणीचा नवरा कौन्सिलचा मेंबर झाला तर दुधांत साखरच पडल्यासारखें तें होणार होतें! इतकेंच काय, पण अगोदर हा विवाहसमारंभ उरकला आणि मग इलेक्शनची धामधूम सुरू झाली, तर त्यांत भाग घ्यायला, धडपडावयाला, राबावयाला शंभरपटीनें माझ्या अंगांत शक्ति त्यामुळें येणार होती.

त्याप्रमाणें मीं विचार केला. एक दिवस मध्येंच ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांना जाऊन भेटून इलेक्शनच्या बाबतींत, त्यांची सल्लामसलत घेण्याकरितां, त्यांचा पाठिंबा मिळविण्याकरितां, सरकारी अधिकाऱ्यांच्या गांठी घेण्याकरितां आणि त्यांच्याकडून सहानुभूति व सर्व प्रकारची माहिती मिळविण्याकरितां पुण्याला जायचें म्हणून निमित्त करून राजाभाऊंच्याच परवानगीनें आणि खर्चानें मी निघालों आणि पुण्याला जायच्या अगोदर माझ्या मावशीच्या गांवाला गेलों. तीन चार दिवस तेथें राहिलों. मावशीबाईला सर्व सांगितलें, तिची समजूत घातली व तिला धीर दिला. तिनें सवतीवर मुलगी कशी देऊं म्हणून अडथळा आणला. पण नवरा तरुण, श्रीमंत, देखणा आहे, हौशी आहे, शिवाय मुलगी खात्या गवाणीला बांधली जाईल, ती आपल्या पराक्रमानें आणि अक्कलहुशारीनें सवतीच्या ताटाखालचं मांजर न होतां, सवतीलाच आपल्या ताटाखालचं मांजर करील असें सांगितलें! कशीबशी समजूत घातली व कबुली मिळविली. येतांयेतांच औंधकर ज्योतिष्याकडून बहिणीची एक जन्मकुंडली करून आणली. परत यावयाच्या अगोदर मध्येंच एक पुण्याला हेलपाटा घातला पण तसा कुणालाच भेटलों नाहीं! भेटायचं होतं कुणाला? आणि विचारायचं होतं काय? इलेक्शनला उभें राहाण्यासंबंधीची मामुली माहिती साधारण त्या व्यवसायांत असणाऱ्या कोणाकडूनही मिळण्यासारखीच होती. तेवढ्या-

करितां पुण्याच्या पुढाऱ्याला तसदी देण्याची जरूरी मला वाटली नव्हती. गेलों आणि आलों. येतांना बहिणीला मात्र घेऊन आलों. वहिनीसाहेबांच्या येणाऱ्या पत्रांवर देखरेख ठेवायला व तीं वाचून पूर्वीच्याच पत्राप्रमाणें त्यांची विल्हेवाट लावायला जातांना गोपाळभय्याला बजावण्यास मी विसरलों नव्हतोंच. त्या येणार असल्याचेंच पत्र असलें तर तेवढें राजाभाऊंना दाखवावें असें म्हटलें होतें पण तेंही फाडलें गेलें असतें तर त्यांत कांहीं बिघडलें असतें असें नाहीं. परंतु मी बहिणीला घेऊन येईपर्यंत वहिनीसाहेबांचें कसलेंच पत्र आलें नव्हतें.

दोन दिवसांनीं राजाभाऊंना सहज म्हणून आमच्या घरीं नेलें. तेही आले. आमच्या आईला चहा करावयाला सांगितला, फराळाचेंही केलें. तें होईपर्यंत आमच्या पुण्याकडच्या आणि इलेक्शनसंबंधाच्याच गोष्टी चालल्या होत्या. माझी बहीण चहाफराळाचें घेऊन बाहेर आली. नवखी, देखणी, तरुण पोर पाहातांच राजाभाऊंचे डोळे अपेक्षेप्रमाणें तिच्यावर खिळलेच. नंतर ते माझ्याशीं बोलत होते; माझ्या बोलण्याला होकारही देत होते पण डोळे आणि कान त्यांनीं माझ्या बहिणीकडे लावले! मी त्यांना सांगितलें, "ही माझी मावसबहीण! कालच आली आहे. तिचं लग्न व्हावयाचं आहे. स्थळ पहायला मावशीनें मलाच सांगितलं आहे." चहा पीत, फराळाचें खात आणि माझ्या बहिणीकडे पाहात, "असं का? हो का? मग!" एवढेच शब्द राजाभाऊ उच्चारीत होते पण बहिणीकडे निरखून पाहाण्यांतच ते सर्व विसरले होते. बायकांना, तरुणींना पाहिलं कीं राजाभाऊंना असं होतच असे. त्यांचा स्वभावच होता तो! माझी बहीण चहाफराळाचं ठेवून आंत निघाली पण मला पुढील कार्यभाग साधावयाचा असल्यामुळें मी तिला आंत जाऊं दिली नाहीं; तिथेंच थांबविलें. ती थांबली व राजाभाऊंना मनमुराद न्याहाळायला भरपूर अवसर मिळाला.

मी माझी तोंडाची टकळी सुरू केली, "राजाभाऊ, मी आपल्याला सांगतों, माझी बहीण गरिबाच्या पोटीं जन्माला आली आहे पण एकाद्या श्रीमंतानें पत्करावी असं तिचं रूप आहे हें आपण पाहातांच आहांत! बरं, हिचं रूपच आहे असें नाहीं तर हिची जन्मकुंडली पाहून पंडित भगूरकर ज्योतिष्यांनीं सांगितलें कीं ही मुलगी ऐश्वर्यात पडलीच पाहिजे. हिच्या पोटीं

सरदार दरकदार जन्म घेतील. कुंडलींत फक्त एकच वाईट दिसत आहे, हिला श्रीमंत वर मिळेल पण प्रथम वर कांहीं मिळणार नाहीं. सवतीवर पडणार ही! बस्स, उपरांत कुंडली हजारांत नाहीं अशी मिळणार! त्यांच्याचप्रमाणं कृष्णशास्त्री भिडे ज्योतिषी यांचें मत आहे. झालेंच म्हटलं तर आपले ते कोल्हापुरचे नारायणशास्त्री अष्टेकर ज्योतिषीसुद्धां म्हणाले कीं या मुलीच्या पायात लक्ष्मी आहे, यश आहे, मोठेपणा आहे, संतति आहे, ही ज्याची होईल त्याचा सर्व बाजूंनीं भाग्योदय करणारी होईल. पण करायचं काय? माझी मावशी पडली गरीब. मी हा असा. माझ्यावर तर जबाबदारी आली. मी करणार काय आणि होणार काय? मी तरी कशाला काळजी करूं म्हणा. तिच्या नशिबांत असेल तसें होईल! बाकी खरं सांगा हं, राजाभाऊ, माझी बहीण दिसायला कशी आहे? ए, इकडं कर तोंड जरा; हां अस्सं! ज्योतिष्यांचीं भविष्यं खरीं होण्यासारखी आहे कीं नाहीं, बोला?"

मी सांगितल्यावर बहिणीनें तोंड वळविलें. ती हंसली. जरा भोळसरच ती, तिला हंसूं आलेंच! राजाभाऊदेखील हंसले. नंतर थोड्या वेळानें आमची ती बैठक संपली. त्यानंतर लागोपाठ त्या आठवड्यांत चारपांच वेळां राजाभाऊ आमच्या घरीं न बोलवितांच आले! त्यांनीं मग एक दिवस बहिणीला वाड्यात नेलें, थोरल्या वहिनीसाहेबांना दाखविली आणि दिवसभर ठेवूनही घेतली!

माझी सद्दी जोरावर येत होती. कल्पना यावयाला आणि ती खरी ठरूं पहायला लागली ना? राजाभाऊंनीं माझ्या बहिणीशीं लग्न करायचं ठरवलं. मला तसं सांगितलें. वाड्यांत जाहीर झालें, दादांना कळलं, थोरल्या वहिनी-साहेबांनींही कशी तरी पण मान्यता दिली. मी ओढून चंद्रबळ आणलं पण मग राजाभाऊ मनांत आल्यावर माझं थोडंच ऐकताहेत? दादा-साहेबांनीं ती माझी बहीण म्हणून प्रथम कसून विरोध केला, खूप आकांड-तांडव केलं, पण त्यांचं तरी मानायला कोण बसलं होतं? वहिनीसाहे-बांना, लग्न झाल्यापासून आतांपर्यंत दोन तरी मुलं व्हावयास पाहिजे होतीं, थोरल्या वहिनीसाहेबांना नातवंडांचीं तोंडं पाहण्याची भारी हौस आणि उत्कंठा लागली होती, व याच एका आशेनें राजाभाऊंना थोरल्या

वहिनीसाहेबांनीं, या लग्नाची परवानगी दिली. त्यांचं म्हणणं असं पडलं— ' आमच्या पांच पिढ्या ओळीनं दत्तकाऱ्याच झाल्या आहेत. राजाभाऊंनीं मुलाकरितां म्हणून एकाच्या ठिकाणीं पांच लग्नं केलीं तरी हरकत नाहीं, कांहीं कुणाला खायला कमी नाहीं, पण एकदां आमच्या या राजाभाऊला मुलगा होऊन तो वाड्यांत खेळला-बागडला पाहिजे !' भोळीं बिचारीं जुन्या काळचीं माणसं ! असें त्यांनींच म्हटल्यावर दुबळ्या दादासाहेबांचं काय चालणार ? ते गप्पच बसले. फायद्याची आणि मोठेपणाची गोष्ट म्हणून त्यांना इलेक्शनला उभे राहण्याला दादाची संमति होती, पण दुसऱ्या लग्नांत त्यांना लभ्यांश कांहीं दिसत नव्हता म्हणून त्याला त्यांनीं विरोध केला. दुसरी विरोध करणारी व्यक्ति, वहिनीसाहेब ! पण त्या खुशाल अजून माहेरच्या आनंदांत गर्क होत्या; त्यांना दादही नव्हती. आणि मीं तेवढेंच साधविलें होतें. त्यांतल्या त्यांत आमच्या सुदैवानें आणखी एक विशेष झालें. इलेक्शनच्या प्रत्यक्ष कार्याला थोडा अवधि होता. त्या अगोदरच लग्नसमारंभ उरकून घ्यायचा असं ठरलं. फारच चांगलं झालं! आतां लग्नासंबंधानें आणि राजाभाऊंच्या इलेक्शनसंबंधानें खटपट करायला, अंग झाडून काम करायला मला पहिल्यापेक्षां हजारपटीनें हुरूप आला होता ! कां नाहीं असं होणार ? अण्णाची प्रतिष्ठा राजाभाऊंच्या वाड्यांत कायमची प्रस्थापित होण्याचें निश्चित झालें होतें ना ?



# मनोहराचे ढासळते मनोरे !

## प्रकरण अठरावें

### सारे अपशकुनच !

माणिक माहेराहून सासरीं गेली त्याला आज जवळजवळ पांच सहा महिने होऊन गेले होते. ती गेली त्या दिवशीं तिच्याबरोबरच तिच्या सासरीं श्रीमंत राजाभाऊ इनामदारांना भेटायला मी जाणार होतों. तसें ठरलेंहि होतें. माणिकनें माझ्याविषयीं सर्व कांहीं राजाभाऊंना समजावून सांगावयाचें, त्यांच्या योग्य त्या अटी कबूल करावयाच्या आणि आपल्या शेतकीविषयक शिक्षणाला इनामदारांच्याकडूनच मदत मिळवावयाची ! तशी मदत मिळेल अशी माणिकची खात्रीहि होती. तिचा विश्वास नव्हता तोंपर्यंत—म्हणजे राजाभाऊंच्या स्वभावाचा अंदाज लागेपर्यंत—आपल्या माहेरच्यांनीं आपल्या सासरीं येऊं सुद्धां नये असें तिला मनापासून वाटत असे. तशा स्थितींत मीं एकदां बाबुरावाबरोबर तिच्याकडे गेलों असतां ती

माझ्यासमोर आली नाहीं कीं मलाहि तिच्यापुढें जाऊन बोलण्याचें धाष्टर्य झालें नाहीं. पण माणिकची माणिकला खात्री येतांच तिनें आपण होऊन आपल्या सासरीं यायला आग्रह केला व पतिराजाकडून माझ्या शिक्षणाची तरतूद अवश्य करतें असा भरंवसा दिला. सासरची परिस्थिति माणिकनें स्वपराक्रमानें मनासारखी पालटली होती. माणिकच्या आश्वासनानें मला नवा हुरूप आला. श्रीमंतांकडे पोंचण्याचा आपल्याला योग्य मार्ग मिळाला. आता आपलें कार्य झालेंच पाहिजे, अशी माझी खात्री पटली. मी माणिक-बरोबरच तिच्या घरीं जावयाचें ठरविलें. पण त्यावेळीं गेलों मात्र नाहीं. त्यावेळीं गेलों नाहीं पण आज जवळजवळ सहा महिन्यांनंतर तिच्याकडे जावयाची पाळी आली होती. त्यावेळीं सुद्धां न जाण्याचें कारण अगदीं ऐन वेळीं असें झालें—

माणिककडून ज्या दिवशीं मला आश्वासनाचा पहिला आधार मिळाला त्याच दिवशीं मुंबईच्या माझ्या एका मित्राचें मला एक आकस्मिक पत्र आलें शेतकीविषयक एकादा विशेष विषय घेऊन अभ्यास केलेल्या विद्यार्थ्याची येथें साधारण स्वतंत्ररीत्या परीक्षा घ्यावयाची व त्यांत सर्वोच्च गुण मिळविणाऱ्या विद्यार्थ्याला ‘ ॲग्रिकल्चरल रीसर्च स्कॉलरशिप ’ देऊन पर-देशांतील उच्च प्रतीच्या शिक्षणाकरितां लागल्यास जादा साहाय्य द्यावयाचें आहे, अशा तऱ्हेची सरकारी सहीशिक्क्याची जाहीर नोटीस छापल्याचें माझ्या मुंबईच्या मित्रानें माझ्या निदर्शनास आणून त्यांत मला भाग घेण्या-विषयीं सुचविलें होतें. मलाही तें ताबडतोब पटलें. मला माझ्याबद्दल दांडगा आत्मविश्वास होता. आपण सदर सरकारी शिष्यवृत्ति हम-खास मिळवूं शकूं; त्यामुळें स्वावलंबनावरच आपल्या शिक्षणाची सोय होत आहे व तशी संधि आपण होऊन चालत आली. मग माणिकला कां कोडें घाला ? असें स्वाभाविकच वाटलें. मी आनंदानें माणिकला ती हकी-कत सांगितली. “ तूं होय म्हणतांच माझें नशीब अनुकूलतेचा सोपान कसें झपाझप चढूं लागलें पाहा. ही तुझीच पुण्याई ! ” असेंही मी प्रांजल-पणानें माणिकसमोर कबूल करण्यास कचरलों नाहीं. माझी शिक्षणाची स्वतंत्र सोय होत आहे, माझ्याच पायावर मला उभें राहतां येत आहे, हें ऐकून माणिकलाही अत्यंत समाधान वाटलें व अतिशय आनंद झाला.

" माझा तुला उपयोग होत नाहीं तरी उद्यां तुझ्या परीक्षा झाल्यावर तुझ्या ज्ञानाचा उपयोग माझ्याकडे येऊन तूं मलाच दिला पाहिजेस हं ! " असें माणिकनें हंसत हंसत म्हटलें. मला त्यांत आनंदच वाटला. माझा संकल्प तसा होताच. मी, माझी बहीण शकू, सुमन, वत्सला, या सर्वांनीं मिळून आगेमागें माणिकची इनामदारी वेढावयाची, तिच्या प्रांतांत आम्हीं सर्वांनीं जाऊन स्थाईक व्हावयाचें, तिथल्या लोकांना आपल्या ज्ञानाचा फायदा द्यावयाचा, त्यांना शहाणे, सुखी, निरोगी, संपन्न व्हावयाला सर्वतोपरी मदत करावयाची, त्यांत आयुष्य व्यतीत करावयाचें व त्याकरितां लागेल ती आर्थिक मदत माणिकनें द्यावयाची असें अगोदर ठरलेलें होतें.

त्या दिवशीं माणिक मला म्हणाली "मनोहर, विलायतेंतून शिकून आल्यावर तुला आमच्याचकडे आलें पाहिजे हं ! नाहीं तर पैशाच्या आशेनें उत्तर हिंदुस्थानांतल्या एकाद्या बड्या राजामहाराजांच्याकडे वशिले लावून जाशील आणि आम्हीं व आमच्या निकृष्ट शेतीवाडी पहिल्यासारख्याच स्थितींत राहूं. तर तसं करूं नकोस ! शिक्षणसंपन्न झाल्यावर केवळ पैशावरच दृष्टि ठेवून भागणार नाहीं; स्वार्थत्यागपूर्वक आपल्या ज्ञानाचा उपयोग करण्याची तयारी पाहिजे तुझी ! मग येणार ना आमच्याकडे ? तुझ्या ज्ञानाचा उपयोग, आमच्या शेतवाडीवर प्रयोग करून देशील ना आम्हाला ? "

" माणिक, हें काय विचारतेस ? मी केव्हां झालों तरी तुझाच आहें. मी आपलें सर्व आयुष्य, सर्व ज्ञान तुझ्या सान्निध्यांत, तुझ्या शेतीवाडीकरितांच वेंचीन. हें तूं विचारण्याचें तरी कारण काय ? आणि मी तरी अगोदर तोंडाची वाफ कशाला दवडूं ? " मीही प्रांजलपणानें म्हटलें.

त्यानंतर आणखी किती तरी बोलणीं झालीं. दुसऱ्या दिवशीं माणिक सासरीं गेली. लगेच मी व शकुंतला मुंबईस गेलों. मी शिष्यवृत्ति मिळविण्याच्या मार्गाला जारीनें लागलों. आम्ही गरीबीनें एकेच ठिकाणीं अडचणींत राहून काळ कंठीत होतों. परीक्षा झाली. शिष्यवृत्ति मिळण्याइतके गुणही मला मिळाले. जवळजवळ माझ्याच इतके दुसऱ्या एका मागासलेल्या जातींतल्या विद्यार्थ्यालाही गुण पडले. त्या कारणानें सरकारच्या ठरलेल्या प्रागतिक धोरणाप्रमाणें मीं पांढरपेशा जातींतला म्हणून मला मिळणारी शिष्यवृत्ति मागासलेल्या जातींतल्या त्या विद्यार्थ्यालाच मिळाली.

मी तसाच कोरडा राहिलों. वेळ गेला, उत्साह गेला आणि शेवटीं माझ्या खडतर नशिबाचा वेताळ पाहिला तो पुन्हां पूर्वपदावर आला! त्या दिवशीं मला अत्यंत वाईट वाटलें. बिऱ्हाडीं येऊन पोटभर रडलों. शकु-बाई परत येईपर्यंत मी एकटाच होतों. माझे सर्व शिक्षणाचे मार्ग बंद झाल्याची प्रचीती आली. एकही मार्ग शिल्लक दिसेना. कांहीं आठवेना. निराशेची मगरमिठी मानेभोंवतीं आवळून बसल्याची खात्री पटली. त्यावेळीं रडलों-किती रडलों—हें पुष्कळांना खरें वाटणार नाहीं. कित्येक ऐकून हंसतीलही. पण जे माझ्या मनोवृत्तीचे असतील आणि माझ्याप्रमाणें परि-स्थितीनें आपलें स्वरूप ज्यांना दाखविलें असेल त्यांना बरोबर कल्पना येईल. शकू कॉलेजांतून आली तेव्हां तिला तें कळलें. तिलाही अत्यंत वाईट वाटलें. आम्हीं दोघांनीं अनेक प्रकारांनीं मनाचें समाधान करण्याचा प्रयत्न केला—धीर धरण्याचे मार्ग शोधून पाहिले. किती तरी वेळ त्यांत गेला. त्या दिवशीं मला जेवण सुचलें नाहीं, गेलें नाहीं. माझ्यासारखीच शकूचीही अवस्था झाली होती. मीं अगदीं वैतागून म्हटलें, "बस्स झालें नशिबाशीं झगडणें, ठोकतों कॉलेजाला आणि शिक्षणाला रामराम आणि जातों कुठें तरी भटकत दुनियेंत! गरीबाचा वाली जर जगांत कुणी राहि-लाच नाहीं, बुद्धि असून रानांतल्या सुवासिक फुलासारखी तिची अनवस्था व्हावयाची हें ठरलें आहे तर मग—"

मी असें बोलत असतांच शकूला माणिकची आठवण झाली. ती एक-दम आनंदानें ओरडली-"मनोहर, वैतागूं नकोस. निराश काय म्हणून होतोस? मार्ग शिल्लक नाहीं कां म्हणतोस? गरीबाला वाली नाहीं म्हणून कां समजतोस? अरे, आपली माणिक आहे ना? तिनें तुला साह्य द्यायचं पूर्वींच कबूल केलें आहे ना? मग झालं तर! नाहीं स्कॉलरशिप मिळाली तर नाहीं. होती एक संधि, साधण्याचा प्रयत्न केला, नाहीं मिळाली तर तेवढ्यावरून आपल्या बुद्धीची नालायकी कांहीं ठरली नाहीं किंवा आपली माणिक कांहीं कुठें गेली नाहीं! बरं, त्या वेळेला तिनें कबूल केलें होतें आणि आतां ती नाहीं म्हणेल असेंही नाहीं!"

शकूनें माणिकची आठवण काढली आणि पुन्हां निराशेंतून आशा जन्माला आली! माणिकचं नांव निघतांच आनंदाचे रोमांच आले व

मनाला हायसें झालें. सहा महिन्यांपूर्वीची तिची भेट व त्या वेळीं आमचीं झालेलीं बोलणीं आतां मला आठवलीं.

"हो! खरंच! माणिक आपल्याला होय म्हणाली आहे नाहीं का? तो प्रयत्न आपण करून पाहूं! शकू, तूं बरी आठवण केलीस. पण काय ग—" मी मनाशीं कांहीं विचारांची जुळवाजुळव करीत असतां शकशीं बोललों, "अलिकडे माणिकचें आपल्याला पत्र नाहीं आणि आपण तरी तिला कुठें पत्रें पाठविलीं आहेत? मग?"

"मग काय!" शकूनें मध्येंच विचारलें व म्हटलें "तुझ्या माझ्या अभ्यासाच्या गर्दींत आपल्याला तिला पत्रें पाठवितां आलीं नाहींत—ती आपल्या गोरगरीबांच्या कार्यांत दंग असेल—तिला पत्रें पाठवायला झालें नसेल म्हणून काय झालं?"

"मग आतां मी तिकडे जावयाचें म्हणजे आगाऊ तिला मी एक पत्र टाकूं का तूं टाकतेस?" मीं शकूला विचारलें.

"कशाला?" ती म्हणाली, "तूं कांहीं कोणी गव्हर्नर नव्हेस कीं तुझ्या सरबराईकरितां माणिकला आगाऊ सूचना पाहिजे. बरं तीही कांहीं पत्राशिवाय तूं आलासच कां असें तुला खास विचारायची नाहीं. जशी मी तशीच ती! तूं केव्हांही आणि कसाही गेलास तरी तिला सारखाच आनंद होईल. ती त्या वेळींही साहाय्य करायला तयार होती, आजही तूं तिथें गेलास तरी तितक्याच तत्परतेनें तयार राहील!"

या प्रकारचें आम्हां बहीणभावांत बोलणें झालें. मी निराशेला झुगारून दिलें, पुन्हां बळ बांधलें आणि माणिकच्या गांवीं जावयाला निघालों. कार्यभाग व्हायचा हें अगदीं सूर्यप्रकाशाइतकें स्वच्छ होतें.

सहा महिने मध्यें गेले होते. मनांत सुष्ट व दुष्टही विचार येत होते. आजपर्यंत निराशेच्या निखाऱ्याचे चटकेच जास्त बसल्यामुळें माणिककडून माझें प्रत्यक्ष कार्य होईपर्यंत माझा भरंवसा टिकाऊ कुठें होत होता?

मुंबईहून निघतांना शकूच्या संमतीनें आणि पसंतीनें माणिककरितां जरीच्या कांठाचा, रेशमी, पोपटी रंगाचा सुन्दर खण घेतला. पोलक्याला कापड घ्यावें म्हटलं पण शकू म्हणाली, "इनामदारांच्या घरीं तें पसंत पडायचें नाहीं. त्याच्यावर टीका होईल. तें कांहीं शहर नव्हे." म्हणून तें तसेंच

राहिलें. थोडीशी फळफळावळ सुद्धां घेतली. सुका मेवाही घ्यावा लागला. फळफळावळ घेतांना मोसंबीं, संत्रीं, चिकू, डाळिंब, अंजीर यांच्याबरोबर मी मुद्दाम थोडेसे चांगले पेरूसुद्धां घेतले. शकूनें 'हे पेरू रे कशाला, मनोहर?–' म्हणून विचारतां मीं तिला म्हटलें "वा:! लहानपणापासून माणिकला मनापासून पेरू फार आवडतात हें विसरलीस वाटतें? ज्याला जें आवडतें त्याला तें न्यावें!" त्यावर शकू हंसली, मी हंसलों. करडी भरली, ट्रंक भरली आणि मी निघालों. देवाला आणि थोर–पूज्य व्यक्तींच्या दर्शनाला रिक्त हस्तें जाऊं नये म्हणतात. वास्तविक श्रीमंत माणिकला आणि त्यांच्या एवढ्या मोठ्या खाक्यांत माझें हें नेणें काय होय!

आगगाडींत असतां ज्या वेळीं मन अस्थिर होई, पुन्हां निराश होऊन घायकुतीला येई, तेव्हां समोर ठेवलेल्या करंडीकडे लक्ष जाऊन माणिकची मूर्ति आठवे. तिचें हंसरें तोंड दिसे; सतेज, प्रेमळ, मायाळू असे डोळे समोर येत! 'हें रे काय? हें कशाला आणलंस, मनोहर!' अशा तऱ्हेनें ती हंसून म्हणत आहे असें ऐकायला येई. पण ती फळफळावळ स्वतः उचलून पहात, आनंदानें तुडुंब भरली आहे असें दिसे. पुन्हां तिला माझी थट्टा करण्याची हुक्की आली आहे असें दिसून येई. ती म्हणे, 'मनोहर, तूं अशी लांचलुचपत देऊन का आमच्याकडून कामें करून घेणार आहेस? पण अशानें आम्हीं नाहीं हो तीं करणार? आम्हांला तुला साहाय्य द्यावयाचें तर देऊंच पण अशा ह्या तुझ्याकरतां म्हणून देऊं असें मात्र समजूं नकोस हं!' नंतर पण लगेच तीच मला वाईट वाटूं नये म्हणून म्हणे, 'अरे वेड्या, मी तुझें काम केल्याशिवाय का अजून राहिलें आहे? माहेराहून आलें त्याच वेळीं तिकडच्या कानांवर घातलें होतें. त्या वेळींच मला विचारायचें झालें कीं, याच वेळीं तूं मनोहराला कां नाहीं आणलास? आपण त्याला आतां साह्य दिलें तर त्याचें साह्य आपल्याला जन्मभर मिळेल. असलीं माणसें मी कसा सोडीन? आणि त्यांतून तूं सांगितल्यावर तर मुळींच सोडणार नाहीं. बोल आतां! मग या तुझ्या भेटीची नव्हती ना आवश्यकता?' मी बसल्या बसल्या खिडकीच्या कठड्याला टेंकून डुलक्या घेत होतों आणि डुलक्या घेत असतांच वरील चित्रें मनापुढून सरकत होतीं. निराशा मनाला आशेनें धीर देत होती.

पुन्हा असें वाटे, फळांच्या करंडीकडे पाहून माणिक खवचटपणानें हंसत आहे. तें पाहून मी तिला विचारीत आहें, 'माणिक, गरीबाच्या गरीब भेटीला तुच्छ लेखतेस? तिला हंसतेस?' त्यावर ती सांगते आहे, 'वाः! आपल्या माणसांनीं आणलेल्या आवडत्या भेटीला कुठें मोल असतें का? तिला कुणी तुच्छ लेखतें का? हें आणलेंस म्हणून मला फार आनंद झाला. आणलें नसतेंस तर बरीक मी तुझ्यावर रागावलें असतें! मी या प्रेमळ भेटीला हंसेन असें तुझ्या मनांत तरी कसें आलें, मनू?'

आणखी असलींच कसलीं तरी नाना प्रकारचीं विचारचक्रें घड्याळांतल्या अनेक चक्रांसारखीं–तीं नियंत्रित तरी असतात, माझ्या डोक्यांतलीं मात्र अनियंत्रितपणें–फिरत होतीं. गाडी भर वेगांत चालली असतां मला वाटे, निराशेच्या साम्राज्यांतून आशेच्या सिद्धीच्या साम्राज्यांत मला त्वरेनें पोंचविण्याकरतांच गाडी असा अट्टहास करीत आहे. नाहीं तरी तें खरंच नाहीं का? माणिककडे पोंचतांच मग निराशा कुठें उरणार होती? निराशा मध्येंच मनाला कशावरून तरी डिंवची व बाबुरावाबरोबर गेलों होतों त्या वेळची आठवण देई, राजाभाऊ इनामदाराचें त्या वेळचें माझ्याशीं झालेलें बेपर्वाईचें स्मरण करायला लावी आणि मला हंसे. तरी पण माणिकच्या आमच्या विषयींच्या खऱ्या प्रेमळपणाच्या व विश्वासाच्या भरभक्कम पायावर आमच्या आशेची सुंदर इमारत बिनधोक उभारतच जात होती! राजाभाऊ इनामदारांबद्दल प्रथम माझें मत चांगलेंही नव्हतें आणि वाईटही नव्हतें. आणि तें कसेंही असलें तरी आम्हां गरीबांच्या दुबळ्या मताला जगांत विचारतो कोण? मी बाबुरावाबरोबर गेलों होतों त्यावेळीं राजाभाऊंची प्रभावळ पाहिली ती तितकीशी त्या वेळीं मला बरी वाटली नाहीं. त्या लोकांबद्दल माझें मत मुळींच चांगलें झालें नाहीं. कदाचित् माझ्याविषयीं त्यांचेंही तसेंच झालें असेल. पण त्या बाबीचा विचार करण्याचें मला कारणच नव्हतें. माणिकचा मला पूर्ण पाठिंबा होता, आग्रहाचें बोलावणें होतें. स्वतःपुरतें मन अजून निडर झालें नव्हतें तरी माणिकमुळेंच तिच्या तिकडच्या लोकांविषयीं आपुलकी वाटायला लागली होती; तीं सर्व माणसें चांगलीं म्हणून मनःश्चक्षूंपुढें उभीं रहात होतीं; त्यांच्या बद्दल एकप्रकारचा स्नेहभावच उत्पन्न होत होता इतकें खरें!

माझ्या पाठीवर कुणी तरी थाप मारली आणि ‘ओह्हो मनोहर ऊर्फ मन्याबापू? कुणीकडे स्कॉलर निघाले आहेत? कसें काय आहे! आपले बाबुराव कुठें आहेत म्हटलं? झालां का जागे?–’ माझ्या कानांत इतके प्रश्न एकदम घुसले.

ते माझे मित्र विष्णुपंत बेळगांववाले होते. बाबुरावांचे आणि माझे स्नेही! बाबुरावामुळेंच त्यांची माझी ओळख झालेली व स्नेह जडलेला. विष्णुपंतांनीं माझी झोंप घालविली आणि विचाराविचारांनाही त्याबरोबर गति दिली. विष्णुपंतांना एकदम पाहून मला आनंद झाला. कारण ते म्हणजे आमचें आनंदाचें ठिकाण आणि उत्साहाचें मूर्तिमंत प्रतीकच होते! मीं त्यांना नमस्कार करून म्हटलें, “काय? विष्णुपंत, तुम्हीं या गाडींतच होतां? मुंबईसच चढलात का? होय? मग मीं कसें पाहिलें नाहीं?”

“पण मीं तरी तुला कुठें पाहिलें होतें? आतां आपलं सहज पहात आलों. कुणी ओळखीचें भेटतें का पहावें. तो तूंच भेटलास. मजा आली.”

“बरं पण बसला आहांत कुठें? सामान वगैरे?” मीं विचारलें.

“तिकडेच सामान आहे. बसलों आहे तिकडेच पण आतां इथें बसतों. तिकडेच काय आहे माझें?” असें म्हणत विष्णुपंत कोटाची कॉलर सावरीत आणि लाल डोळे गरगर फिरवून भव्य मिशांचे पोलिसी आंकडे चढवीत माझ्या समोरच्या बांकावर बसले.

“हं! मन्याबापू, बोल आतां! कसें काय? हल्लीं असतोस कुठें? करतोस काय? अभ्यास संपला कीं नाहीं? आपल्या बाबुरावाची गांठ केव्हां पडली होती? काय म्हणत होता? आतां स्वारी निघाली आहे कुठें? किंनिमित्त?” विष्णुपंतांनीं नेहमींच्या वहिवाटीस अनुसरून एकदम असंख्य प्रश्नांचा मारा करून शेवटीं हंसत हंसत म्हटलें, “बोल, ब्रिजलाला बोल कांहीं हंसुनी बोल!—”

मीही हंसलों, आणि त्यांच्या एकंदर प्रश्नांचीं सगळीं सरळ उत्तरें दिलीं. मीं सांगितलें “ठीक आहे. पांच महिने जवळ जवळ मुंबईत होतों, आतां या गाडींत तुमच्यापुढें आहें. अजून विद्यार्थीच आहें, अभ्यास संपलेला नाहीं. बाबुरावांची भेट पुष्कळ महिन्यांत नाहीं, फक्त कांहीं आठवड्यांपूर्वीं कुशलपत्र आलें होतें, पण त्यांत तुमच्याबद्दल कांहीं

लिहिलेलें नाहीं. आतां निघालों आहें बाबुरावांच्या बंधूकडे-राजाभाऊ इनामदारांकडे! मला त्यांचेकडून माझ्या शिक्षणाच्या खर्चाची सोय करून घ्यावयाची आहे हें निमित्त आहे!—"

माझीं सगळीं उत्तरें ऐकून, माझ्या पाठीवर जोरानें थाप मारून ते 'भले शाबास, मन्याबापू!' म्हणून ओरडले. डब्यांतले बाकीचे लोक त्यांच्या ओरडण्यामुळें एकदम टवकारून आम्हां दोघांकडे आश्चर्यानें पाहूं लागले! मी तर दचकलोंच. पण त्या सर्वांकडे दुर्लक्ष करून विष्णुपंत मला म्हणाले, "मन्याबापू, शहाणा असून शतमूर्ख आहेस असें मी तुला म्हणतों तें याचकरितां! अरे, इनामदार लोक—त्यांत राजाभाऊ इनामदार तुला उपयोगी पडणार? तुला मदत करणार? काय हें तुझ्या माथ्यांत फॅड भरलें आहे रे? ज्याची संपत्ति फक्त वेश्या, वारुणी या व्यसनांतच सफा व्हायची; ज्याला फक्त त्याच्या सभोंवतालच्या हांजीखोर मित्र म्हणविणाऱ्यानींच लुबाडावें; जो बापाला बाप म्हणत नाहीं (दत्तक गेला आहे म्हणून दिवाणजीच म्हणतो!) आईला मानीत नाहीं; बाबुरावासारख्या भावाला बघत नाहीं, त्याची मदत तुला होणार? तुझ्या शिक्षणाला त्याचा उपयोग होणार? वेड्या, वेड्या, मन्या, मुसळाला कधीं अंकूर फुटलेले पाहिले आहेस रे, तुझ्या शेतकी कॉलेजांत? काळ्या कातळावर कसलें बीं उगवून दाखवलें आहेस तुझ्या फार्ममध्यें कधीं?"

विष्णुपंत एकदम जोरांत येऊन खूप बोलून गेले पण मी मात्र सर्द झालों, थिजलोंच! विष्णुपंतांच्या बोलण्यावर कांहीं चिकित्सा करण्याचें धैर्यच मला राहिलें नाहीं. त्यांनीं राजाभाऊवर इतकें तुटून कां पडावें हें मला कळेना, तरी त्यांच्या बोलण्यावरून मला निष्कारण निरुत्साह करण्याचा त्यांचा हेतु मुळींच नव्हता. तसेंच राजाभाऊला अकारण बोलावयाचें त्यांना प्रयोजन तरी काय? राजाभाऊ पूर्वीं मुसळ असतील पण आमच्या माणिकनें मोठ्या प्रयत्नानें त्याचा फुलपुष्पानीं बहरलेला सुंदर वृक्ष बनविला आहे. असें विष्णुपंत बोलतांना माझ्या डोळ्यांपुढें भव्य दृश्य दिसत होतें. राजाभाऊ पूर्वीं काळे कातळ असतील, पण अश्रांत श्रम करून काळ्या कातळावर माती पसरवून, त्यावर पिकें आणणाऱ्या कोंकणांतल्या शेतकऱ्याच्या तोडीचे श्रम करून माणिकनें राजाभाऊ इनामदारांच्या मनाचें

कातळ, उत्कृष्ट पिकाऊ जमीन केली आहे, हें मला माहीत होतें व माझ्या अंतर्दृष्टीला तें दिसत होतें. विष्णुपंतांना तें कांहींच माहीत नसावें, त्यांना तें दिसलें नाहीं तेव्हां जनरीतीप्रमाणें श्रीमंतांबद्दल जें बोलतात तेंच ते बोलले इतकेंच, अशी मी मनाची समजूत करून घेतली. राजाभाऊ इनामदारांना विष्णुपंतांनीं वाईट म्हटलेलें मला बरें वाटलें नाहीं. कारण कल्पनेंत माझें अगोदरच अनुकूल मत झालें होतें. त्यांना वाईट म्हणणें म्हणजे माणिकला वाईट ठरविणें आणि ती वाईट ठरली कीं माझ्या छातीवर निराशेचा फिरून जबर घाव बसणेंच होय ! त्याला मी तयार नव्हतों ! कल्पनेंत देखील विरोधी कल्पना सहन करण्याची शक्ति मला राहिली नव्हती ! मी विष्णुपंतांचा त्याकरितां सौम्यपणानें प्रतिकार करावा म्हणून म्हटलें, " विष्णुपंत, तुम्हीं एकाद्याबद्दल कडक बोलायला लागलां म्हणजे फारच कडक बोलतां ! राजाभाऊंच्या कंजूषपणाचा तुम्हांला काय अनुभव आहे हो ? तसेंच ते कोणालाच विचारीत नाहींत. हें तरी कसें ? परवां बाबुरावांचें पत्र मला आलें होतें; त्यांत त्यांना व्यापाराकरितां राजाभाऊनें दोन हजार रुपये दिल्याचें होतें. तुम्हांला कळलें नसेल हें ! "

" कळलें. तेंही कळलें आणि आपला बाबुराव दोन हजार रुपये घेऊन पुण्यास जाऊन टेकतो न टेकतो तोंच मागून त्याच दोन हजारांच्या वसुलीकरितां राजाभाऊकडून दारांत धरणें धरायला पठाण गेला होता हेंहि कळलें. समजलांत मन्याबापू ? ही एक हकीकत ! राजाभाऊंच्या कंजूषपणाची, किंवा हलकटपणाचीं म्हण वाटेल तर, दुसरी गोष्ट सांगतों. राजाभाऊ तुमच्या आमच्या सारख्यांच्याच बाबतींत मात्र कंजूष आहे. एकाद्या शहाजोग व्यापाऱ्याला त्याचा उपयोग व्हायचा नाहीं; तुझ्यासारखा विद्याव्यासंगी माणसाला त्याचा पाठिंबा मिळायचा नाहीं. त्याचें जग निराळें, मित्र निराळे, खर्च करण्याचीं ठिकाणें वेगळीं, त्याचे मोठेपणाचे अड्डेही वेगळे ! तें जाऊं दे. त्याच्या क्षुद्रपणाची स्वानुभवाची एकच गोष्ट सांगतों, त्यावरून तो तुझ्या कितपत उपयोगी पडेल तें तूंच ठरीव. आम्हां बाबुरावांच्या मित्रांना तो अगोदर बरें पहात नाहीं; शिव्या वाहातो. तुला अजून अनुभव नसेल पण इच्छा असेल तर येईल. जातो आहेसच तेव्हां घेशीलही. तो समजतो कीं बाबुराव त्याला लुबाडतो आणि बाबु-

रावाला आम्हीं त्याचे मित्र लुबाडीत असवों. त्याची इच्छा अशी कीं बाबुरावानें आम्हांला लुबाडावें. तें तसें होत नसल्यामुळें तो आम्हांला बाबुरावांच्या पाठीशीं लागलेले राहू-केतु समजतो. हें बाबुरावानेंच मला सांगितलें आहे पुष्कळदां. त्यावरूनच एकदां राजाभाऊनें एक माझ्याशीं मोठी गंमत म्हणून केली. झालीं असतील दोन वर्षें; माझी आणि राजाभाऊंची त्याच्या परिवारासह पुण्यास रस्त्यांत सहज गांठ पडली. त्यानें इनामदारी खोटें हास्य आणून स्वागत केलें, व चलता का हॉटेलात म्हणून विचारलें. मी हो म्हणालों व आम्हीं हॉटेलांत गेलों. चहा फराळाचें मागविलें. फराळ चालू असतांच राजाभाऊनें हलकेच डोळे मिचकावीत आपले खिशांतील पाकीट काढून बांकाच्या खालून आपल्या दोस्ताच्या हातीं दिलें. सरळ खालीं पाहून मी फराळ करीत असल्यानें मला तें दिसलें. त्याला राजाभाऊनें चिमटा घेतल्याचेंही मी पाहिलें. त्यांचा हलकटपणा माझ्या लक्षांत आला! बाबूराव आम्हांला लुबाडीत नाहीं तर आपण एवढ्यापुरतें तरी या लोकांना लुबाडून यांना फजीत करूं या-यांच्यावर जय मिळवूं या-ही त्याची क्षुद्र बुद्धि! पुढें बिल द्यायच्या वेळीं खिसे चांचपीत, चेहरा बदलीत त्यांनीं ठराविक कांगावा केला. मी हॉटेलचें बिल दिलें—आणि अगोदर सरळ म्हटलें असतें तर मी दिलें नसतें असें नाहीं, उलट आनंदानें दिलें असतें; पण तसें झालें असतें तर ते इनामदार कसले? आणि आपल्या हलकटपणाचा आनंद त्यांना कसा उपभोगतां आला असता ?"

बोलतां बोलतां विष्णुपंत खूपच बोलले. त्यांच्या बोलण्यानें आतां तर मी अर्धमेलाच झालों! इकडून तिकडून धरणं बांधून हृदयाला धीर देत होतों पण तें सारें माझें अवसान डळमळलें. मीही बाबुरावांचाच स्नेही होतों. राजाभाऊ माझ्याशीं या खेपेला तरी कसे वागतात—मला कसे वागवितात-याबद्दल तर्ककुतर्क आतां यावयाला लागले. मी विष्णुपंतांकडे तटस्थपणानें पहात होतों. शेवटीं ते मला म्हणाले-" एवंच, माझा त्या माणसाबद्दलचा हा असा अनुभव आहे. तुला तसा अनुभव नच यावा अशी माझी मनापासून इच्छा आहे. तशीच ईश्वराजवळ मी प्रार्थनाही करीन! बरं, तूं त्याच्याकडे मनांत आलें म्हणून निघाला आहेस का कांहीं धोरण बांधून घेऊन-पूर्वयोजना करून-चालला आहेस? तसें असेल तर

होईलही तुझें कार्य ? नाहीं कुणीं म्हणावें ? आणि तुझें कार्य झालें तर मला आनंदच होईल ! "

" माझा वशिला माणिककडून आहे–तिचें मला अभिवचन आहे–ती राजाभाऊंची बायको आहे–" वगैरे सांगावयाचें माझ्या मनांत आलें पण सांगावेंसें वाटलें नाहीं; आणि सांगितलें असतें तरी विष्णुपंतांना पटलेंही नसतें असें मला वाटलें म्हणून कांहींच तसें सांगितलें नाहीं. " आपला असाच निघालों आहें ! " एवढ्यावरच मीं भागविलें. त्यावर " माझा अनुभव खोटा ठरो. ईश्वर तुला पावो !– " असें हंसत हंसत ते म्हणाले.

माझी वाटेंत उतरावयाची वेळ येईपर्यंत गाडींत बहुतेक याच विषयावर आम्हीं आरतून परतून बोलत होतों. त्या रात्रीं दुसरे विषय निघाले नाहींत, सुचलेच नाहींत. अखेर मी उतरणार तें स्टेशन आलें. अपरात्रच होती. बोलण्याच्या नादांत होतों म्हणून बरें झालें. उतरलों, विष्णुपंतांचा निरोप घेतला; तेही " तुझें येथें काम नसतें तर बेळगांवपर्यंत घेऊन गेलों असतों. मला इच्छा व कल्पना असूनही परिस्थिति तुझ्या सारख्याला साह्य करूं देत नाहीं, त्याला इलाज नाहीं. अशा स्थितींत राजाभाऊ काय वाटेल तें होवो पण तुला पावो. " असें पुष्कळ गाडी सुटेपर्यंत बोलत होते !

गाडी गेली. मी ट्रंक व फळांची करंडी उचलून वेटिंगरूमकडे गेलों. अपरात्रीची वेळ; उजाडेपर्यंत स्टेशन सोडणें शक्य नव्हतें आणि वहानही मिळणें अशक्य होतें. अर्थात् तोंपर्यंत तेथेंच वेळ काढणें भाग होतें. ट्रंक व फळांची करंडी अशी कोपऱ्यांत बांकाला लागून ठेवली व बांकावर बसलों. इकडे तिकडे पाहिलें तों जवळच्या कोपऱ्यांत कुणब्याची एक कुणी बाई व दोन पुरुष दिसले. त्यांचा सारा संसारच्या संसारच जवळजवळ त्यांच्या बरोबर दिसला ! कुठून आले होते कीं कुठें जात होते कोण जाणे ! त्यांचें आपापसांत बोलणें चाललें होतें. स्टेशनपोलीस एक दोनदां हिंडून गेला. मेहेरबानीच त्याची म्हणावयाची कीं त्यानें त्या मंडळींना किंवा मला तेथून बाहेर जावयाला सांगितलें नाहीं. नाहीं तर नेहमीं असें होत नाहीं. स्टेशन पोलीस–त्यांतून लहान सहान स्टेशनचे पोलीस तर–रात्रीं गाडी निघून गेल्यावर वेटिंगरूममध्यें सुद्धां उतारूला थारा लागूं देत नाहींत. पण त्या दिवशीं तसें कांहीं झालें नाहीं.

मी विष्णुपंतांच्या बोलण्यानें अर्धमेलाच झालों होतों. माणिककडे जाण्याची माझी उत्सुकता संपली होती! आपल्या जाण्याचा आपल्याला कांहीं एक उपयोग व्हावयाचा नाहीं; मागल्याप्रमाणें हीही खेप फुकटच जाणार असें आपलें वाटूं लागलें. विष्णुपंतांचें सडेतोड बोलणें झालें पण मला मात्र तें अपशकुनासारखें झालें! आतां माणिकही मनश्चक्षूंपुढें पहिल्याप्रमाणें आनंदी, हंसरी, सुखी, धीर देणारी अशी येईना. राजाभाऊही विकृत स्वरूपांतच दिसूं लागले! काय एकेक मनाचे खेळ तरी!

मनांतले उदास विचार हटविण्यासाठीं किंवा झोंप येऊन 'पॅसेंजर आपापलें सामान संभाळो' अशी पोलीसची सूचना टाळण्यासाठीं मी जागचा उठून पलीकडे ते कुणबी बोलत होते तिकडे गेलों. शेतकऱ्यांशीं बोलावयाचा नाद मला पहिल्यापासूनच असे. भावी आयुष्यहि त्यांच्यांतच मिळून मिसळून काढावयाचें असल्यामुळें त्यांच्यांत मी हौसेनें मुद्दाम मिळें मिसळें. तसं याही वेळीं वेळ जावा, करमणूक व्हावी, त्यांच्याकडूनही शेतीभातीची अनुभविक माहिती मिळवतां आली तर पहावी या सर्व हेतूनें त्याच्याजवळ गेलों व त्यांपैकीं एकाला म्हटलें "कां, पाटील? कुठून आला का कुठें निघालाय? सारा प्रपंच बरोबर दिसतोय म्हणून विचारलें. इकडलेच वाटतें तुम्हीं?

"काय सांगूं, भल्या माणसा, आमच्या कर्माची कथा?" एक गृहस्थ सुस्कारा सोडून म्हणाला. ती सर्व मंडळी दुःखी दिसली. मला तशी कल्पनाही नव्हती.

माझा प्रश्न ऐकून त्या गृहस्थानें मला उत्तर दिलें पण पलीकडे ती बाई, कां कोण जाणे, डोळ्याला पदर लावून रडूं लागली.

"हरणे, गप्प बस ना! कशापायीं रडतीयास आतां? मोप झालं ना तुझं रडणं!" दुसऱ्या गृहस्थानें त्या बाईला थांबविण्याचा प्रयत्न केला. मला कसेंसेंच झालें आणि माझी उत्सुकता जास्तच वाढली.

"त्या बाई कां रडताहेत? आणि तुम्हीं सारे दुःखीकष्टी कां दिसतां आहांत? कृपा करून मला सांगाल का?" मला रहावेना म्हणून मी पुन्हां लोचटपणानेंच विचारलें.

"गरीबाची कर्मकथा ऐकून तुला काय करायची आहे बाबा? तुझ्या हातानं निवारण हुतय का?" त्यांतलाच एक म्हणाला.

"होण्यासारखें असल्यास होईलही; तें तरी कुणीं सांगावें? पण दुःखितांचें दुःख ऐकून घेतल्याशिवाय सांगणार तरी सांगणार काय?" मी हें अगदीं अनावर होऊन कांहींतरीच बोललों. माझें मलाच काय बोललों तें कळलें नाहीं. मीं स्वतः काय थोडा दुःखी होतों? माझें दुःख निवारण करायला जर मी असमर्थ होतों तर त्या बिचाऱ्यांचें दुःख काय कपाळ कमी करणार! पण मी कांहीं तरी बोलून गेलों आणि त्याचा परिणाम त्या मंडळीवर झाला. त्यांनाही दुःख पुष्कळसें अनावरच झालें होतें. खरोखरच गरीबांच्या गोष्टी कोण ऐकून घेत असतो? मी मनापासून म्हटल्याचें त्यांना पटलें; त्यांच्याचपैकीं एकानें 'ऐक बाबा सारी आमची कुळकथा' असें म्हणून सांगायला आरंभ केला. तो म्हणाला, "या इथून उगवतीकडे दहाबारा कोसांवर आमचं गांव—पण आतां आमचं कसलं तें? तिथं आमचं काय आहे? हा पसारा, बायको घेऊन तिथून देशांतराला जायला निघाल्यावर, तिथून आम्हांला घालवून दिल्यावर, आतां आमचं कसलं गांव बाबा! यापुढें इमानानं आणखी अब्रूनं ज्या गावांत पोट भरेल तो आमचा गांव होईल–तो गांव आतां त्या हरामखोर राजाभाऊ इनामदाराचा आहे!"

"काय? राजाभाऊ इनामदाराच्या गांवचे तुम्हीं? त्यांनीं तुम्हांला ही दशा आणली? त्यांच्या पायांत तुम्हीं प्रपंच डोक्यावर घेऊन देशोधडीला जातां आहांत? कां? कां?" मला कसेंसेंच झालें. बोलवेना, जीभही चालेना.

"त्योच! त्योच नीच! त्योच रामोशी! राजाभाऊ, माणसंखाऊ! त्यानंच आम्हांला देशांतराला लावलं आहे बरं! त्यानंच आम्हांला ही दशा आणली आहे! सूर्यनारायण त्याला बघून घेईल! आमच्या संसाराची त्यानें ही दशा केली, त्याच्या संसाराची दशा भगवान् करील!" तो गृहस्थ संतापून बोलूं लागला; तिकडे ती बाई तर जास्तच रडूं लागली.

"इनामदारांनीं तुमच्यावर हा प्रसंग कां आणला पण?" मी विचारलें.

"कां आणला? अहो, ते इनामदार, तालेवार, सीरीमंत, त्यास्नी माझी ही बाईल होवी झाली! द्या दिसा खोपटांत शिरून हिचा हात धरूसा

वाटला, तें साधलं नाहीं! मग ते कसा आसरा देनार? गांवाच्या बाहिर आम्हाली का घालनार न्हाईत हो?"

"अरेरे!" माझ्या तोंडांतून उद्गार आला व अंगावर शहारे आले.

"इनामदारांचे वांटेकरी आम्हीं तीन डुयाधर्न व्हतो, पर आतां असा वखुत आला! भगवानाची मर्जी! गरीबाचा कुणी वाली राहिला आहे का?"

मी काय बोलणार? मी हतबुद्धच झालों! "इनामदार चांगला म्हणून ऐकत होतों. वजनदार समजत होतों. आणि—"

'चांगला आहे तर! मोठा आहे तर? वजनदारबी आहे ना? उलटी पालटींत शिरतो, लुकलबोर्डांत घुसतो, कुन्सीलांत पळतो, मेंबर होतोय. मोठा नाहीं कसा? पैसा पेरतोय. मतं मिळवतोय; जित्याची मिळवतोय, मेलेल्या माणसांची बी घेतोय; वैऱ्याच्या पेटींतली, खालचं खिळं काढून, त्यांतली मतं काढून आपल्या पेटींत घालून, मोठा होतोय ना? मग वजनदार कसा नसल त्यो? पर वाइच कळ काढा देव कुठं दडला नाहीं, चट् बघतुया सारं, वक्तावर समद्यास्नी दिसेल, ह्या हातावरच्या झाडं-झडत्या ह्या हातावर द्याव्या लागतील इनामदाराला. हाय कुठच्या घमेंडींत त्यो!" तो माणूस याप्रमाणें कळवळून, वैतागून, काळीज पिळवटून बोलत होता.

काय? राजाभाऊ इनामदारांचे असे नंगेनाच चालू आहेत? पण माणिकनें सांगितलें होतें त्याची वाट काय? तिनें बनावटच सांगितलें? आतां तिची स्थिति काय असेल? हे प्रश्न माझ्यापुढें येऊं लागले.

"राजाभाऊंची लक्ष्मीसारखी घरीं बायको असतांना असे त्यांचे नंगे नाच कसे चालू आहेत? ती कसे चालू देते?" असें मी कांहीं अर्धवटच आपल्याशीं पुटपुटलों, पण तें त्या पाटलानें ऐकलें व तो म्हणाला,

"अहो, एक का? दोन बायला आहेत त्याला. लग्नाच्या दोन अन् गांवात आवा वायलीच आहे! पण जात कुत्र्याची नव्ह का? हाडूक बघितलं का धावलंच तोंडांत धराया; तिथं घरांतल्या बायका काय करत्याल?"

काय? राजाभाऊंच्या दोन लग्नाच्या बायका? पुन्हां मोठे थोरले प्रश्न मनापुढें उभे राहिले! हें काय? माणिक! तुझी काय अवस्था असल?

"काय म्हणतां? इनामदारांच्या बायकोचं, एकाही बायकोचं त्यांच्यापुढें कांहीं चालत नाहीं? त्या कांहीं बोलत नाहींत? एकसुद्धां?"

" एक बाईल तर नवथरच करून आणली नव्ह का, पांढऱ्या पायाची! पहिली माउली आहे ब्येस! तिचा बाईच वचक हुता अगूदर! तिच्याच पदराखालीं तिला झाला तितका आमच्या या हरणीचा संभाळ तिनं केला नव्हं! जवा तिचा अखेरचा शब्द आला, ' हरणे, आतां माझं कांहीं चालत नाहीं ग बाई! माझा विलाज नाहीं. तूं कुठेंही जा. तुझा बचाव तूं कर!' तवा ह्ये बघा आम्हांला गाव सोडून निघावं लागलं! इतके दिस निघाले ती त्या माउलीची पुण्याई बरं! तिच्याकडे बघूनच आम्हीं तरी गय केली हो इतक्या दिस! न्हाई तर त्याला दावला असतां इंगा! हात मोडून टाकलं असतं! टांगणी तोडली असती, कोंबड्यावाणी मान पिरगाळली असती! काळ्या पाण्यावर गेलों असतों, पर त्या इनामदाराला इसका दावल्याबिगार राहिलों नसतों! पर हरिणी म्हणाली, ती मायमाउली आहे, तिनं आपला संभाळ केला, आपणच देशांतराला जाऊं. भगवान् ज्याला त्याला पाहून घेईल, म्हणून ही वाट धरली बघा आम्हीं!"

हरिणी अजून हुंदक्यावर हुंदके देत होती!

दुसरा जरा वेळानें म्हणाला, " ऐकलीस बाबा आमची कहाणी, बरी वाटली? है काय याच्यावर तुझी तोड?" मी लाचार होऊन त्यांच्याकडे शून्य दृष्टीनें पाहूं लागलों. मी काय उत्तर देणार?

ती मंडळी मुंबईला जात होती; गर्दीमुळें त्यांच्या दोन गाड्या चुकल्या व मागून येणाऱ्या गाडीकरितां ती मंडळी थांबली होती. त्यांच्या तोंडून सारी हकीकत ऐकली. त्यांचे दुःखाचे उसासे, संतापाचे कढ, वैतागाचे शब्द, इनामदाराला शिव्याशाप, माणिकला धन्यवाद, सर्व सर्व ऐकलें. माझी विचारशक्ति नष्ट झाली. अपशकुनावर अपशकुनांनीं गर्दी केली! मी माणिकच्या घरीं काय पहाणार होतों? कशासाठीं जाणार होतों? मला कांहींच कळेना!

उजाडलें व वाहनें येऊं लागलीं. मला माझ्याकरितां नव्हे, तर माणिककरितां, तिला उभाउभी तरी भेटण्यासाठीं जावेंसें वाटूं लागलें. आणि म्हणूनच मोटारींत बसून शून्य मनानें मी माणिकच्या गांवचा रस्ता कढूं लागलों.

# प्रकरण एकोणिसावें

## दुर्दिन

मोटारींतून माणिकच्या गढीसमोरच उतरलों त्या वेळीं दिवस बराच वर आला होता. सकाळचे नऊ वाजून गेले होते तरी सूर्यानें आपलें तोंड दाखविलें नव्हतें. काळ्याकुट्ट ढगांनीं त्याला झांकून टाकलें होतें. दुर्दिन होता तो! त्यांतच कुणी तरी दोन तीन माणसें—एकाच्या हातांत एक मडकें, दुसऱ्याच्या हातांत दोन बांबू, कांहीं काटक्या व एक दोन सरमडाच्या पेंढ्या आणि तिसऱ्याच्या हातांत नव्या कापडाची घडी आणि तांबड्या फुलांचे आणि गुलालाचे दोऱ्यांनीं बांधलेले शिफ्तर—अशी सामग्री घेतलेलीं माणसें, रस्त्यानें जातांना मला दिसलीं. माझ्या हृदयानें ठाव सोडला!

प्रत्यक्षापेक्षा प्रत्यक्षाची कल्पना विलक्षण भीतिप्रद असते. तसेंच माझ्या मनाचें झालें असेल. समोरून एकादें प्रत्यक्ष प्रेत आलें असतें तर मला वाटलें नसतें इतका भयंकर परिणाम त्या अशुभ दर्शनानें माझ्या मनावर झाला! मन चिंती तें वैरी न चिंती म्हणतात तद्वांतली माझी स्थिति झाली! मन गहिंवरून गेलें होतें. शरीर बधिर झालें होतें. चालण्याची शक्ति पायांत उरली नव्हती. एकेक पाऊल पुढें टाकीत असतां, मला आतां पुढें काय दिसेल? कोण काय बोलेल? आपल्याला काय ऐकायला मिळेल? हेच प्रश्न सारखे भंडावीत होते! स्टेशनवर भेटलेल्या त्या माणसांचें दृश्य पुन्हां पुन्हां डोळ्यापुढें येत होतें. त्या बाईच्या रडण्याचा ध्वनि अजूनही कानांत घुमत होता! त्या माणसाचे हातवारे, संतापून बोलणें, दांतओठ चावणें, त्या सर्व प्रकारांची पुनरावृत्ति एकसारखी बुद्धि करीत होती! चालतांना मी मागेंपुढें पहात होतों. दोन अवजड वस्तु हातांत घेऊन चालतांना लंगडल्यासारखें होत होतें व अवघडल्यासारखें झालें होतें. सकाळची वेळ होती, लोकांची ये-जा चालू झाली होतीच. मी पहिल्या दरवाजांतून दुसऱ्या दरवाजापर्यंत कसाबसा रखडतच गेलों. सहज बाजूला दृष्टि गेली तों कुणीतरी कुणब्याची बाई कुदळीनें तटाच्या बाजूची माती उकरीत होती. त्या पलीकडेच एक मरतुकडें गांवठी कुत्रें अगदीं भलत्या वेळींच खुशाल रडत होतें! माझ्या

पोटांत चर्रर्र झालें! गढीचे जीर्ण बुरूज खिन्नपणानें कसेबसे उभे आहेत असें भासत होतें. पाठींत पोंक आलेल्या तटांच्या भोंवतीं उदासीनता स्वच्छंदानें घिरट्या घालीत आहे असा भास होत होता!

गढीवरून उगीचच इकडून तिकडे, तिकडून इकडे कर्णकटु टिट्-टिव–टिट्टिव ' करीत टिटवी हिंडत होती!

याच वेळीं गाडींतील विष्णुपंतांच्या बोलण्याची आठवण झाली. राजा-भाऊ मला पाहिल्यावर कोणत्या नजरेनें पाहतील? बाबुरावाबरोबर पूर्वी आलों होतों त्या वेळेप्रमाणेंच तुच्छतेच्या दृष्टीनें का बाबुरावाच्या पाठीं मागचा राहू म्हणून? आणि मग वाटूं लागलें कीं, राजाभाऊंची आणि आपली भेटच होऊं नये. माणिकला भेटावें आणि आलों तसें परत जावें.

इतक्या वेळांत वळसा घेऊन मी गढीच्या दुसऱ्या दरवाजापर्यंत गेलों. त्या दरवाजाच्या एका बाजूला मोठें पटांगण होतें. एका भिंतीला एक पत्र्याची पडवी दिसली. त्याच्याच पुढें थोड्या अंतरावर बाहेरच्या पडक्या तटाला भलें मोठें खिंडार–गाडी जाण्याइतकें मोठें आणि त्याचकरतां केलेलें–दिसलें. पडवीच्या बाहेर एक नवी करकरीत लँडो बॉडी असलेली मोटार दिसली. तिच्या सभोंवतीं बरीच माणसें, मुलें व कांहीं बायका देखील दिसल्या. माझें तिकडे लक्ष गेलें. त्या मंडळींत राजाभाऊ होते. त्यांचा मित्र अण्णा–हो अण्णाच होता तो–तोही होता. गोपाळभय्याही दिसला. आणखी बराच नवा परिवार दिसला. बाजूस एक वृद्ध विधवा करवती कांठी धोतर आडवें लावून घेतलेली, डोळ्यावर छपरासारखा एक हात ठेवून व एक हात कमरेवर देऊन मोटारीकडे पहात होती. तिच्या-जवळच एक पोरसवदा तरुणी उंची लुगडें नेसून, दागिने घालून उभी असलेली व तिच्या शेजारींच तिचा हात हातांत घेऊन व तिच्या खांद्यावर आपला हात ठेवून वीस बावीस वर्षांची एक सामान्य दिसणारी बाई उभी होती.

मी राजाभाऊंना ओळखलें. अण्णाला मात्र प्रथम मुळींच ओळखलें नाहीं. कारण पूर्वी पाहिलें होतें त्या वेळच्या आणि आज पाहिलें तेव्हां या वेळच्या त्याच्या पोषखांत भयंकर तफावत होती. सर्वांनींच जामानिमा केलेला होता. राजाभाऊंना आणि अण्णाला त्यांच्या पाठीकडून पाहतां एका-द्याला असें खात्रीनें वाटलें असतें कीं राजाभाऊ ते अण्णा असून अण्णा तो

राजाभाऊ असावा! म्हणजे राजाभाऊंचा पोषाख सामान्य होता असें नव्हे तर त्यांच्या पोषाखापेक्षांही अण्णाचा पोषाख भारी होता इतकाच त्यांच मतलब! पण अण्णाचा इतका भारी पोषाख कां झाला होता आणि केव्हां-पासून झाला होता कोण जाणे! मला तर तो राजशालक, संस्थानक, वरपुरुष, वासुदेव, शकार यासारखाच दिसला! सर्वच मंडळी गडबडींत आणि नवी गाडी पाहण्याच्या नादांत होती त्यामुळें माझ्याकडे कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं आणि मी कोणाचें लक्ष जाण्याइतक्या वेळपर्यंत वाटेंतच थांबलोंहि नव्हतों! 'राजाभाऊ, आपला पैसा गेला खरा पण मशीन मिळालं आहे! पैशांची किंमत नाहीं. इतकी सुंदर आणि चांगली मोटार केवळ आपल्यालाच म्हणून मिळाली' असलीं अण्णाचीं कांहीं वाक्यें माझ्या कानांवर पडलीं. त्यावरून मोटार नवी आणली असून त्यांतच सर्व गर्क आहेत असें मी ताडलें. राजाभाऊदिकांनीं जामानिमा चढविला होता खरा पण ते कुठें परगांवींच निघाले होते कीं नव्यां गाडींतून उगाच कुठें सकाळीं फेरफटका करून यावयाच्या तयारींत होते कोण जाणे!

मी वाड्यांत सदरेच्या बाजूला गेलों. जरा इकडे तिकडे पाहिलें. पूर्वी-च्याच ठिकाणीं दादासाहेबांची बैठक दिसली. दादा आपल्या नेहमींच्या बैठकीवर जाड्या काळया फ्रेमीचा चष्मा घालून कसलेंसें वर्तमानपत्र वाच-ण्याच्या नादांत दिसले. बोटाला तोंडांतली थुंकी लावून वर्तमानपत्राचें पान उघडतांना त्यांनीं सहज वर पाहिलें. मी त्यांना जवळ जाऊन आदर-पूर्वक नमस्कार केला. सामान बाजूला ठेवलें. त्यांनीं सत्कारपूर्वक बसा-वयास सांगितलें. औपचारिक विचारपूस केली. बाबुरावाचा स्नेही आणि माणिकच्या माहेरचा म्हणून दादांना मी माहीत असल्यामुळें माझ्याविषयीं त्यांची पूर्वी बरी भावना दिसली होती व आतांही त्याचा प्रत्यय आला.

राजाभाऊ आदिकरून मंडळी हंसत खेळत दिसली. दादांचाही थाट-माट पूर्वीसारखाच दिसला. वाड्यांत विशेष कसली गडबड—सडबड दिसली नाहीं, ह्यामुळें मला जरा हायसें झालें.

बाळक्यानें दादांचा चहा आणला. त्यानें माझ्याकडे पाहिलें. ओळखलें मला, पण हंसला वगैरे नाहीं. परत जाणार इतक्यांत दादांनीं त्याला सांगितलें, " अरे, पाहुण्यांना एक चहाचा कप आण. प्रातर्विधि तोंड धुणं व्हायचं

असेल तुझं अजून ?–" मला उद्देशून दादांनीं विचारलें. स्टेशनवरच मी तें सर्व उरकल्याचें सांगितलें. तितक्यांतच मोटारीचा पोंगा वाजला, थोडी धडधडही ऐकायला आली व जरा वेळांत 'येश्वदे, अग सुंदर, चला कशा आंत ? ढालगज भवान्यांनो ? कशा बाहेर उभ्या येऊन राहिलांत कीं एकाद्या कैकाडणीसारख्या ! येश्वदे, घरांत कांहीं तुला कामधंदा नाहीं वाटतं ? अन् सुंदर तुला वेणीफणी नाहीं का करायची ?' असेही शब्द ऐकूं आले.

मघाशीं बाहेर उभ्या असलेल्या मुली बाहेरून आंत दडदड धांवत जात होत्या आणि त्यांतलीच म्हातारी त्यांच्यामागून वरील बडबड करीत चालली होती. तितक्यांत समोरून बाळक्या चहा घेऊन येत असतां त्या म्हातारीला आडवा आला. त्यासरशीं ती त्याच्यावर खेंकसली–" काय रे रांडलेका, कुठें चहा नेतोस ? एकेकाला दिवसांतून कितीदा पाजतो आहेस ? " बाळक्या तेथेंच कांपत घाबरून उभा राहिला पण जरा वेळानें धीर करून 'पाहुणे आले आहेत त्यांना नेतों आहे' असें सांगून पुढें निघाला.

" या पाहुण्यांनीं तर अलिकडे दमवलं अगदीं रोजच्या रोज ! एक दिवस रिकामा जातो असं नाहीं. इनामदारांच्या इथं गिळायला मिळतं ना यथास्थित ? " असं कांहीं तरी ती म्हातारी जातां जातां बोललीच.

बाळक्या चहा घेऊन आला.

'राजाभाऊ आतां कुठें गांवाला गेले वाटतं ?' मी सहज चहा पीत असतां दादांना विचारलें. कारण त्यांच्या वाड्यांत आल्यावर प्रथम त्यांची चौकशी करणें प्राप्त होतें !

'होय !' दादा म्हणाले.

" कां –? "

" कां ? अरे, आमच्यामागें सध्यां एक का भानगड आहे ? हें वर्ष आम्हांला अतिशय वाईट चाललंय–खर्चाला आळा नाहीं–मिळकतीला नांव नाहीं." त्यांच्या पवित्र्यावरून बहुत दिवसांत मी श्रोता मिळालों होतों कीं काय कोण जाणे ! ते म्हणाले " आमच्या राजाभाऊवर सध्यां कोर्टांत केस आहे ! त्याकरितां आज ते–आतांच–तूं आला असशील आणि ते गेले–तूं पाहिलंसुद्धां असशील–मोटारीनेंच गेले. नवी मोटार नुकतीच घतली आहे सात हजारांची ! तो एक खर्च झालाच आहे."

"केस कसली राजाभाऊंच्यावर ?" दादा वहावत आहेत असें मला वाटलें म्हणून मध्येंच जरा जोरानें मीं त्यांना विचारलें.

"केस कसली! राजाभाऊ लोकल बोर्डाच्या इलेक्शनला उभे राहिले, त्याकरितां खर्च केला, टांगे पळवले, मोटारी धांवल्या, मेजवान्या दिल्या, निवडून आले, मोठेपणा मिळविला, आतां तो मोठेपणा निस्तारताहेत! त्याच संबंधांत त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं मतांच्या बाबतींत कांहीं काळीबेरीं राजाभाऊंच्या माथीं मारण्याची कारवाई केली आहे, चाललीय केस! व त्याकरितां पाण्यासारखा खर्चही होत आहे! असं झालं आहे तें!"

"असं का?" एवढेंच मीं म्हटलें.

"खर्चाच्या बाबतींत एवढेंच नाहीं. या वर्षीं तुला सांगतों—" दादा अवसान बांधून बोलायला लागले, "कुळाकडून पैसा नाहीं, कुळें वसल देत नाहींत, खंड देत नाहींत, तीं झालीं आहेत माजोरी. बोलायला गेलों तर शेती नको म्हणून सोडून मुंबईची वाट धरतात. इकडे मिळकतीची ही कथा! चिरंजीव श्रीमंतांनीं इलेक्शनकरितां पैसे उधळले. नवीन लग्नाचं आणखी एक सोंग करून बसले, त्यांत खर्च झाला, आतां इतक्यांत ती मुलगी गेलेली पाहिलीच असशील तूं! ती राजाभाऊंची दुसरी बायको! मागून गेली ती तिची आई, राजाभाऊंच्या नव्या सासूबाई! झालं, लग्नाचा खर्च झाला. नवी सात हजारांची मोटार घेतली, आणखी केसला खर्च चालूंच आहे आणि त्यांतून दिवस असे! अलिकडे मुखत्यार कारकीर्द झाल्यापासून मी कांहीं पहात नाहीं आणि बोलतही नाहीं! आतां आमचें ऐकतो कोण? आतां कसे तरी दिवसाला धोंडे मारीत काळ कंठतों आहें झालें!" दादा सांगत होते, मी हूं म्हणून ऐकत होतों. त्यांचें बोलणें ऐकावेंसें वाटत होतें आणि ऐकूं नयेसेंही वाटत होतें. पण ऐकल्याशिवाय सुटका नव्हती! मी त्यांचें बोलणें हूं म्हणून ऐकून घेत होतों पण माझें सारें चित्त माणिककडे होतें. ती कुठें दिसली नाहीं व दादांच्या बोलण्यांतही तिचें नांव आलें नाहीं. इनामदारांच्या केसच्या, खर्चाच्या, मिळकतीच्या हकीकतीच्या रंगांत त्यांना माणिकचें नांव कसें सुचावें? दादांच्या बोलण्यावरून वाड्यांतल्या परिस्थितीचा माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला इतकें मात्र खरें? अशा परिस्थितीला त्रासून माणिक माहेरीं तर पुन्हां

जाऊन राहिली नसेल? तसेंच असेल. तसें नसतें तर बाळक्यानें मला पाहि-ल्यावर आंत जाऊन त्यानें माणिकला सांगितलें असतें आणि तिला कळ-तांच तिनें आंत येण्याकरितां निरोप धाडला असता! तेव्हां खात्रीनें ती येथें नसावीच. उगीच आलों आपण इकडे! असेंसुद्धां मग मनांत आलें.

दादांनीं फिरून वर्तमानपत्र हातीं घेतलें. मी कोट, टोपी काढून खुंटीला ठेविली, आळसटपणानें अंगाला आळोखेपिळोखे देत बसलों, पण रहावेना; तेव्हां जरा वेळानें दादांना विचारलेंच, "माणिक इथें नाहीं वाटतं?"

दादांनीं वर मजकडे पाहिलें "अं? काय म्हणालास? माणिक अं— आमची रखमा, हो आंत आहे कीं! अरे हो, तूं तिच्या माहेरचा नाहीं का? मग बरोबर आहे! भेटवतों अं तिला तुला. बाळक्या, अरे बाळक्या कोण आहे रे तिकडे?" दादांनीं नोकरांना लगेच हांका मारायला सुरवात केली. मध्येंच माझ्याकडे वळून आणखी म्हणाले, "आमची रखमा आहे आजारी! एक तरी भोग आहे का आमच्या मागें? कोणत्या मुहूर्तावर आजारी पडली आहे, कांहीं समजत नाहीं! दुखण्याचें पाऊल मागें म्हणून नाहीं, त्या बाबतींत खर्च चाललाच आहे! खर्चाला काय एकच तोंड आहे म्हणतोस? डॉक्टर चालले आहेत, वैद्य चालले आहेत, सारं कांहीं चालूं आहे, पण रखमा आपली दिवसेंदिवस झिजते आहे. लोकांना वाटत असतं इनामदारीचें वैभव आणि सुख पण इनामदारांचें हें अस्सं आहे."

बाळक्या आला व तो आल्यावर दादांचें बोलणें तितकेंच थांबलें. त्यांनीं बाळक्याला मला घेऊन माणिककडे जायला सांगून आपण हातांतल्या वर्त-मानपत्रांत गंभीरपणानें लक्ष घातलें. मनाला जरा कुठें हायसें होत आहे नाहीं, इतक्यांत माणिक आजारी आहे, झिजते आहे हें दादांनीं सांगितलें; माझी कंबर पार खचून गेली. बाळक्या मला घेऊन जाण्याकरितां उभा होता. त्याला करंडी घ्यावयाला खूण केली. त्यानें करंडी घेतली व मी माझी ^क उघडून त्यांतला शकूनें माणिककरितां हौसेनें दिलेला जरीचा खण हल-केंच काढून शर्टच्या आंतल्या बाजूस काखोटींत मारला आणि बाळक्याच्या मागून माणिककडे निघालों. माणिक होती त्या खोलीजवळ गेलों. त्या वेळींच आंतून माणिकच्या सासूबाई—थोरल्या वहिनीसाहेब—बाहेर आल्या. त्यांना मी लवून नमस्कार केला. त्यांनीं मला ओळखलें नाहीं व 'कोण?'

म्हणून विचारलें. मी शक्य तितक्या थोडक्यांत माझी माहिती दिली. माणिकला भेटतों म्हटलें. त्यांनीं बरें म्हटलें. त्या गेल्या, बाळक्यानें दार उघडलें व त्याच्या पाठोपाठ मी आंत गेलों.

समोरच्या पलंगवजा कॉटवर माणिकला पाहिलें आणि एकदम मला घेरी आली. मी मट्दिशीं खालीं बसलों! तोंडांतून 'अरेरे' एवढाच उद्गार निघाला! मला ब्रह्मांड आठवलें. बाळक्यानें मला सांवरलें. माणिकचें लक्ष माझ्याकडे गेलें व ती मोठ्या कष्टानें एका कुशीला वळली!

"मनोहर" खोल आवाजांत माणिकनें हांक मारली. माझे सारे अपशकुन खरे ठरले होते! साऱ्या कुकल्पना जीवंत झाल्या होत्या. वैरी मनानें चिंतलें होतें तेंच दृश्य पुढें मांडून ठेवलें होतें!

"माणिक! माणिक काय ही तुझी अवस्था? तीच का तूं पहिली माणिक?" मी उठून जवळ गेलों. माझ्या डोळ्यांतून पाण्याचा पूर चालला.

"मनोहर, वेड्या, हें काय?" क्षीण शब्दांत माणिक एकेक शब्द उच्चारीत होती! मजकडे टक लावून पाहात होती. तिनें बळेंच तोंडावर हंसूं आणलें पण तिच्या डोळ्याच्या कडा ओलसर झाल्या. जास्त पाणी यायला शिल्लक काय राहिलें होतें? माणिक पूर्वीची कुठें राहिली होती? चेहरा कोळपून गेला होता! वर्ण पांढरा फटफटीत पडला होता. हातापायाच्या काड्या झाल्या होत्या! डोळ्यांतली जादू पार कुठच्या कुठें नष्ट झाली होती! माणिककडे पाहूं कसें? तिच्याशीं बोलूं काय? कोणत्या शब्दांत? मी आलों कशासाठीं आणि येथें पाहतों आहे काय? निघतांना केवढा उत्साह होता, किती उंच उंच मनोरथ झाले होते! बाळक्यानें बाजूस ठेवलेल्या करंडीकडे पाहिलें, व माझ्या डोळ्यांना आणखी महापूर आला. माणिकच्या आजारांत उपयोगी पडावी म्हणून ही फळफळावळ आणिली होती का? असें मनांत येऊन मी जास्तच रडूं लागलों.

"मनोहर, माझ्या गळ्याची शपथ आहे बरं का? पूस बघूं डोळे! तूं रडतो आहेस पण मला क्लेश होताहेत ना?" माणिक उठून बसण्याचा प्रयत्न करीत एकेक शब्द सावकाश म्हणाली. मी मनाला महाप्रयासानें आवरलें. डोळे पुसले! बाजूला खुर्ची होती ती जवळ ओढून घेऊन तीवर कसाबसा बसलों! बाळक्या अजून बाजूलाच होता. त्यानें माणिकला नीट

बसती केली. मग ती त्याला म्हणाली, "बाळक्या, जा बरं; नाहीं तर मामी तुझ्यावर रागावतील. छोट्या बाईसाहेब तुला बोलतील. पुन्हां थोड्या वेळानं ये अं!" बाळक्या वाईट तोंड करून जड पावलांनीं निघाला पण तो तिथून जावयाला नाखूष दिसला. माणिकला क्षणभर विसंबूं नये असें त्याला वाटत असावें असें दिसलें. तो बाहेर जायला निघाला इतक्यांत त्याच्या नांवानें बाहेर कर्कश असें कुणीतरी ओरडलेंच ! बाळक्या गेला. त्याच्याकडे आणि माझ्याकडे पाहात माणिक शुष्कपणानें हंसली !

माणिकच्या हंसण्यांत कोणता अर्थ भरला होता ? त्या स्थितींतसुद्धां तिच्या हंसण्यानें खोलीभर प्रकाश पडल्याप्रमाणें वाटला ! माणिक उकिरड्यावर पडलें तरी आपलें अस्तित्व दाखविणारच ! खरंच माणिक उकिरड्यावरच पडली नव्हती का ? त्यानेंच तर तिची ही दशा झाली होती ना ?

" मनोहर " माणिकनें क्षीण स्वरांत हांक मारली.

" काय माणिक ? "

" तूं आल्याचें बाळक्यानें मला मघाशींच सांगितलं. तूं आलास हें ऐकून मला कित्ती बरं वाटलं म्हणतोस ? गगनांत मावेनासा आनंद झाला !" बोलतांना तिच्या निस्तेज डोळयांत पुन्हां अश्रुबिंदू चमकला. ती जरा थांबून पुन्हां म्हणाली, "झाली तुझी परीक्षा ? मिळाली तुला स्कॉलरशिप ?"

" परीक्षा झाली, पण स्कॉलरशिप मिळाली नाहीं."

' अरेरे! अन् तिकडे निराशा झाली म्हणून आशेनें इकडे आलास ?' माणिक म्हणाली. तिनें आपलें तोंड दोन्ही हातांनीं दाबून धरलें. तिला हुंदका आवरेना ! रडायला देखील तिच्यांत त्राण नव्हतें ! "

" माणिक, माणिक—"

" मनोहर! माझ्याकडे तूं मोठ्या आशेनें आलास ! मीच तुला आशा दिली होती ! पण–पण मनोहर, मला क्षमा करशील का ? मी तुम्हां सर्वांची अनंत अपराधी आहें ! मी तुमच्यासारख्या अनेक जीवांना आशा लावून निराश करण्याचं पातक केलं आहे ! मनोहर—"

" माणिक, असें दीनपणें बोलूं नकोस ! तूं काय केलें आहेस ? "

" मी तुझ्यासारख्याला आधाराचीं वचनें दिलीं, अनेक गोरगरीबांना गोड शब्दाचीं मधाचीं बोटें चाखविलीं, त्या सर्वांना आतां निराशेनें

तडफडावें लागत आहे. किती लोक गांव सोडून गेले. किती लोक उपाशी मेले, किती लोक शिव्याशाप देत असतील! मनोहर, किती लोकांची मी अपराधी आहें! इच्छा केली होती काय आणि झालं कसं!"

मी माणिकची समजूत घालूं कशी? तिचा यांत कोणता अपराध होता? मूर्खाचा–दुष्टाचा धनीपणा पत्करण्याचा तिचा अपराध म्हणावयाचा काय? पण तिनें त्याला वळविण्याचा प्रयत्न काय थोडा केला होता? तिला त्यांत यशही आलें नव्हतें का? केवढ्या उत्साहानें ती त्या गोष्टी सांगत होती! त्या काय साऱ्या लटक्याच होत्या? हो! तिचा तो भासच होता असें आतांच्या ह्या परिणामावरून म्हणावें लागतें!

मी माणिकला समजविण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होतों.

ती मला समजविण्याची शिकस्त करीत होती!

आज राजाभाऊ वाड्यांत नव्हते–परगांवीं गेले हें एकपरी बरेंच झालें असें मला वाटलें. धडपणानें आम्हांला मनमुराद बसतां बोलतां तरी आलें.

नंतर मी विषय बदलण्याचा प्रयत्न केला, आणलेलीं फळफळावळ काढलीं. पेरू पाहून तशा अवस्थेंत सुद्धां माणिकला निरतिशय आनंद झाला! "माझा आवडता जिन्नस आणलास वाटतं?" म्हणून तिनें विचारलें. "खाऊं का रे मी?" असेंसुद्धां ती म्हणाली! तिच्या हातीं ते दिले असते तर तिनें खरेंच खाल्ले असते! तिनें मागितले देखील, पण मी द्यावयाला कचरलों. आम्हीं बोलत असतां एकदां राजाभाऊंची नवी सासू दार उघडून डोकावून गेली. पुन्हां माणिकची सवत एकदां येऊन हिंडून गेली. येसूही मध्येंच येऊन, हिंडून, थोडा वेळ उभी राहून, माणिकला हवं नको विचारून गेली.

त्या सर्वांची ये–जा झाल्यावर माणिकनें सर्वांची माहिती मला सांगितली. ती माहिती ती देत असतां, तिच्या आवाजांत होणारे बदल, चेहऱ्यांत पडणारे फरक, त्या त्या वेळीं तिला होणारा त्रास वगैरे स्पष्ट दिसत होतें. 'माणिक तूं बोलूं नकोस. तुला त्रास होतो आहे, मला सगळं समजतंय–कळलंय–' म्हणून मी तिला पुन्हां पुन्हां सांगत होतों, तरी माझें ती ऐकत कुठें होती? तिला इतक्या दिवसांत पोटांतलें ओकायला—मन मोकळें करायला–मिळालें होतें कोण? मी आल्यानें तिला दुःखही

तितकेंच झालें आणि आनंद पण तितकाच झाला! मला काय काय सांगू असें तिला झालें होतें. चार शब्द बोलावेत, पांच मिनिटें थांबावें, पुन्हां बोलावें, असें तिचें चाललें होतें तरी ती बोलतच होती. माणिकनें दोन मोसंब्याच्या फांकी घेतल्या. मी शकूनें दिलेला खण तिला दिला व तो तिनें पाहिला. किती वेळ तरी त्याकडे ती टक लावून पहात होती! तिला तो आवडला! ती गालांत हंसल्याचा भास झाला पण तिचे डोळे ओले झाले. तिचे डोळे खणाकडे होते. पण तिच्या मनांत काय येत असेल त्या वेळीं? 'मी बरी होईन? पहिल्यासारखी होईन आणि मग शकूनें दिलेल्या या खणांची चोळी अंगभर करून घालीन!' असें येत असेल का?

पण माणिकच म्हणाली "शकूनें किती चांगला खण पाठविला आहे! माझी आवड माझ्यापेक्षां तिलाच माहिती आहे! शकू, सुमन, वत्सला, माझ्या मैत्रिणी किती चांगल्या आहेत! त्यांचें माझ्यावर किती अलोट प्रेम आहे! पण मी बरीक त्या सर्वांची महान अपराधी आहे! कुणाच्याही मना सारखें मला वागतां आलें नाहीं, येत नाहीं, येणार नाहीं. माझ्या अपराधाला जगांत तोड नाहीं!" पुन्हां तिचं हें पालुपद आलंच!

"माणिक, हें काय म्हणतेस तूं? तुझ्याकडे काय त्याचें?" मी तिची समजूत करण्याच्या हेतूनें म्हटलें. "उद्यां तूं बरी झालीस म्हणजे—"

"काय? मी बरी होणार?" असं म्हणून माणिक किती चमत्कारिक हंसली. तिचें हंसणें म्हणजे माझ्या छातींत कोणी सुरी खुपसल्याप्रमाणें मला वाटलें! मी तिच्याकडे पहातच राहिलों.

"तर काय? तूं बरीच होणार नाहींस?" मी पुन्हां म्हटलें. "अशी भलतीच मनाची समजूत करून घेऊं नये, माणिक! उद्यां डॉक्टर जेजुरी-करांना आणवतों! वैद्य पानशांना बोलावलं तर ते येतील, तूं बरी होणार नाहींस म्हणजे काय गोष्ट आहे?"

माणिक पुन्हां भेसूर हंसली आणि म्हणाली, "वेड्या, डॉक्टर, वैद्य का मला बरे करणार आहेत? डॉक्टर वैद्य शरीरभोगावर उपचार करूं शकतात! मनाच्या रोगावर त्यांचं काहीं चालत नाहीं, हें तुला माहीत नाहीं वाटतं?" थोडा वेळ थांबून आणखीही ती पुढें म्हणाली, "आणि मी मरणाला भीत आहें, त्याच्याबद्दल मला वाईट वाटतंय असं का तुला

वाटतं? आतां मरणानेंच मला बरं वाटणार आहे, त्याचीच मी आतांशा रोज वाट पहात असतें ! ”

माणिकच्या बोलण्यांत दारुण निराशा ओतप्रोत भरली होती. मी तिला बोलती बंद केली पण माझ्या बोलण्यांत कसला जोरच नव्हता ! ती बोलती बंद झाली पण एकदां हंसली. याही हंसण्याचें शल्य असह्यच होतें.

माणिकनें मला आल्यासारखें चार दिवस रहावयाला सांगितलें. मीही राहिलों. तिला माझ्याशीं पुष्कळ पुष्कळ बोलावयाचें होतें. माझी याही ठिकाणीं निराशा झाली खरी. पण माझ्या क्षुद्र निराशेची माणिकच्या पृथ्वीमोलाच्या प्राणापुढें किंमत काय होती? माझ्याप्रमाणेंच किती गरीब असहाय्य प्राणी निराशेच्या फोफाट्यांत भाजत होते तेथें माझी काय कथा? माझ्यासारख्या अनेक जीवांना साह्य देणाच्या ईर्षेनेंच माणिक झटतां झटतां निराश होऊन, अशी शरपंजरीं पडली होती ना !

माणिकनें किती तरी गोष्टी सांगितल्या. माहेराहून ती आल्यापासून अंथरुणाला खिळण्यापर्यंतच्या सर्व अवस्था तिनें सावकाश सांगितल्या. माहेरीं येतांना राजाभाऊंच्या मनाची स्थिति आपण कशी बनविली होती, कोणतीं कोणतीं कामें त्यांच्या हातून करवयाला आरंभ झाला होता, त्यामुळें आपल्याला आशा कशी वाटूं लागली, पण तेंच परत आल्या वेळीं राजाभाऊंच्या वागण्याची मजल किती पुढें गेली होती, आपल्याला कसा राग आला, संताप कसा सहन झाला नाहीं, त्या आवेशांत आपण राजाभाऊंना कसे स्वतःच्या शहाणपणाच्या जोरावर बोलावयाला गेलों, चार समजुतीच्या गोष्टी सांगण्याचा प्रयत्न कसा अनाठायीं झाला, झिंगून आल्यामुळें आपल्याला यथास्थित कसा मार मिळाला, मित्रांच्या नादानें दारीं येणाऱ्या गरीब शेतकऱ्यांना कसे पायाखालीं तुडवलें, खोट्या मोठेपणाला बळी पडण्याची बुद्धि कशी झाली, दिसावयाला देशाची सेवा पण तो एक जगाला राजरोस लुबाडण्याचा मार्ग कसा आवडूं लागला, त्या पायीं आजपर्यंत काय काय अनन्वित प्रकार झाले, आज कोणतें संकट ओढवून घेतलें हें सर्व सर्व कांहीं तिनें मोकळ्या मनानें मला सांगितलें. दुसऱ्या लग्नाची अण्णानें कशी उठावणी दिली, ते सगळे फार्स कसे झाले, त्या वेळीं आपले कसकसे हाल झाले याचें साग्र निवेदन तिनें मजजवळ केलें. आतां आपला

समाचार फक्त एक सासूबाई कळकळीनें कसा घेतात, दुसरा बाळक्या आपल्याकरितां कसा झटतो व त्यामुळें इतरांकडून त्याचा छळसुद्धां कसा होतो हें सांगून त्यांच्याबद्दल तिनें भले उद्गार काढले!

राजाभाऊ गांवाहून आले. ते कांहीं बोलले नाहींत. मीही कांहीं बोललों नाहीं. काय बोलणार मी? मी बहुतेक माणिकजवळ बसलेला असें! राजाभाऊ माणिककडे ढुंकूनही पहात नव्हते कीं चौकशी करीत नव्हते! आम्हांला अडथळा केला नाहीं, हें आमचें नशीबच समजत होतों! त्यांच्या सौख्यांत, ऐषआरामांत, चैनींत कोणताच कमीपणा नव्हता! त्यांचें जसें चालावयाचें तसेंच चालू होतें! नवी बायको होती, नवी मोटार होती, सर्व कांहीं यथास्थित होतें.

एक दिवस माणिकचें आणि माझें बोलणें झालें—

" पण, माणिक, असें हें झालें कसें?"

" माझ्या कमनशिबामुळें!"

" तूं आजारी झाल्यावर आईला आणि बाबांना बोलाविलें नाहींस का?"

"इथं आनंदोत्सव थोडाच होता? त्यांच्या दुःखांत आणखी भर घालावीशी मला वाटली नाहीं!"

" तुला त्रास होत असतांना तूं आम्हां कुणाला एका शब्दानेंही कां कळविलें नाहींस?"

" मान सांगावा जनाला, अपमान सांगावा मनाला म्हणतात, हें तूं जाणतोसच! शिवाय तुम्हीं तुमच्या उद्योगांत होता ना? तुमच्या उद्योगांत निष्कारण व्यत्यय नसता का आला?"

" तूं औषध घेत नाहींस, तुला मरावेंसें का वाटतें?"

" हो! मोठ्या आनदानें!"

" कां?"

" कारण जगण्यासारखं माझ्याजवळ कांहीं नाहीं म्हणून!"

" तुला मरणाची भीति वाटत नाहीं?"

" मनु, माझ्या मनाला केव्हांच मरण आलेलें आहे! स्वारीच्या वर्तनानें माझ्या मनाला जबर जखमा झाल्या. त्यानेंच त्याचा अंत झाला आहे! मेलेल्या मनाला कोणत्या मरणाची भीति वाटणार?

" बरं तुला वाईटही वाटत नाहीं ? "

" नाहीं ! "

" कशाबद्दलच वाईट वाटत नाहीं ? "

" तें कां ? या भरल्या संसारांतून, तुम्हां सगळ्यांतून जावं लागणार आणि त्याहीपेक्षा पुष्कळ योजलं, पुष्कळ ठरवलं, तें कांहीं हातून झालं नाहीं, होत नाहीं, होणार नाहीं या जाणीवेनें मनाला मरणापेक्षां वाईट वाटतं ! मरणापेक्षां अपयश खोटें, त्याचें दुःख मोठें, म्हणतात ना ? त्या-बद्दल वाईट वाटल्यावाचून कसें राहणार ? "

डोळ्यांत पाणी आल्यानें तिनें उशींत तोंड घातलें. मी निर्जीवच बनलों !

' माणिक, असं बोलूं नकोस ! '

' मनोहर, मी वेडी आहें. '

' धीर सोडूं नकोस, अजूनही तूं चांगले दिवस पाहशील ! '

' या जन्मांत ? तें आतां अशक्य आहे ! ' माणिक शुष्क हंसली, ' मनोहर, असली वेडी आशा तूंही बाळगूं नकोस !

मी हृदय पिळवटून कळवळून म्हटलें, ' माणिक, काय करावं तुला ? '

' माझ्या अपराधाची क्षमा करावी ! गरीब माणिकची आठवण ठेवावी ! उणेंअधिक बोललें असेन तें सारें विसरून जावें ! '

' माणिक, माणिक ! हें काय बोलत आहेस तूं ? तुला हें बोलवतें तरी कसें ? '

' वेड्या, निराशा माझ्याकडून तें बोलवीत आहे ! '

' मग, तुझ्यासाठीं आम्हीं करावें तरी काय ? '

' काय करावं सांगूं ? आलास, चार दिवस राहिलास, माझें मनोगत ऐकून घेतलेंस, माझें मन हलकें झालें ! माझ्या अखेरच्या घटकेपर्यंत तूं माझ्याजवळ राहिलास तर मला हवाच आहेस. पण तूं आतां राहूं नकोस. येथून जा, आपल्या वाटेला लाग.'

' मी जाऊं ! कुठें जाऊं ? '

' येथें कशाला आला होतास ? तुला विद्यार्जनाला सहाय्य मिळावें म्हणून ना ? येथें तर हें असें ! तुला आपला वेळ व्यर्थ कसा घालवितां

येईल ? आणखी चार ठिकाणीं जाऊन तुला साह्य मिळवायला हवें ना ? तुझ्या जन्माचें कार्य आहे तें! मी कांहीं तुझ्या जीवनाचें सर्वस्व नव्हे ! '

मला माणिकचा एकही शब्द ऐकवेना ! ती थांबून पुढें म्हणाली, 'मनू, आतां राहिलास हेंच पुष्कळ झालें! पण यापुढें राहिलास तर घरांतून तुला त्रास पोंचूं लागेल. मलाही तो झाल्याशिवाय राहणार नाहीं. सध्यां वाड्यांत राज्य निराळें आहे ! अधिकारी वेगळे आहेत. माझ्याशीं विशेष आपुलकी दाखवणें आजकाल राजद्रोह करण्याइतकें भयंकर आहे! सर्वांचे चाळे तुझ्या दृष्टीला येत नाहींत, पण तुला आणखी ठेवून घेतलें तर आज जी गत बाळक्याची आहे तीच तुझी झाल्याशिवाय रहावयाची नाहीं !'

माणिकचें हें बोलणें मला पटलें. रोज ती एकेक कलेनें क्षीणच होत होती ! मला जसें तिनें सांगितलें, तसेंच तिला मधून मधून भेटायला येणाऱ्या गरीब शेतकऱ्यांना आणि त्यांच्या बायाबापड्यांना हेंच, माझ्या-सारखेंच ती सागत होती ! हरिणीची आणि तिच्या उध्वस्त झालेल्या संसाराची आठवण झाली कीं माणिकला दर वेळीं भडभडून येई.

मला आता तेथें राहवेना आणि जाववेनाही ! राहिलों तर राजाभाऊ आणि त्यांच्या प्रभावळींतले मणी काय बोलतील, काय म्हणतील, कसे वागवतील, कदाचित् वाड्याबाहेर हांकूनही देतील, कसला नेमच नव्हता! म्हणून राहणें अशक्य वाटूं लागलें तर माणिकच्या अखेरच्या दिवसांत तिला सोडावी कशी याची कल्पनाही भयंकर वाटूं लागली !

माणिकची कल्पना खरी ठरूं लागली. राजाभाऊंच्या नव्या सासूबाई मला उद्देशून उपरोधिक बोलूं लागल्या. बाळक्याला मृदंगाप्रमाणें दोहों-कडून मार बसूं लागला. नवी मालकीण, आमच्यासमोर येऊन चमत्का-रिकपणानें पाहून हंसून जाऊं लागली. जेवावयाच्या वगैरे वेळीं अण्णा, ' कां ? मनोहरपंत, आतां आणखी किती दिवस मुक्काम ? ' असें उपरोधिक विचारून अप्रत्यक्ष जाण्याची सूचना देऊं लागले. दादा बोलत नव्हते, थोरल्या वहिनीसाहेबही बोलत नव्हत्या पण त्यांचें कशांतच कांही नव्हतें !

हें दिसूं लागतांच मात्र वाड्यांत अधिक राहणें माझें मलाच कसेंसें वाटूं लागलें. माणिकची प्रकृति इतक्या स्थितीला आली होती तरी तिनें आपल्या माहेरीं कळविलें नव्हतें, व दुसऱ्यांनाही कळवूं दिलें नव्हतें! दुस-

त्यांचें इतकें अडलें होतें तरी काय? मी येऊन चार दिवस राहिलों, मला सुद्धां माणिकनें कळवूं दिलें नाहीं आणि मलाही प्रथम बुद्धि झाली नाहीं, आवश्यकता सुद्धां वाटली नाहीं. आपण आलों आहोंत, आतां चार दिवसांत माणिकच्या प्रकृतींत बदल होईल असें मला वाटलें होतें. पण तिच्या मनाची आणि प्रकृतीची मजल फारच पुढें गेल्याचें आढळून आल्यावर आणि कोणत्याही सबबीवर वाड्यांत जास्त दिवस राहतां येणें अशक्य हें कळून चुकल्यावर मी निघण्यापूर्वी माणिकचे आई व बाबा तिच्या जवळ असलेच पाहिजेत असें ठाम ठरविलें व मग मी तिला विचारलेंही नाहीं. सर्व हकीकतीचें सविस्तर पत्र मी लिहिलें आणि तिला न विचारतांच टाकलें!

मन घट्ट करून मी जाण्याचें नक्की ठरवलें; माणिकला सांगितलें, तिनें रुकार दिला. अगदीं शांत मनानें तिनें परवानगी दिली. त्या वेळीं ती म्हणाली, 'मनोहर, चार दिवसांचा गोड सहवास दिलास! यांत मिळालेला मला अनिर्वचनीय आनंद, मी मृत्यूच्या वेदना सोशीत असतांना सुखावह होईल! तूं मला हें दिलेंस, पण मला तुम्हांला कांहींच देतां आलें नाहीं रे!' रुद्ध कंठानें माणिक कशीबशी बोलली! 'आतां सरत्या घडीपर्यंत मी आणि माझा निरंतरचा मित्र मृत्यु!'

'माणिक! मी जातों आहें, पण उद्या तुझे आई, बाबा येथें येतील. तुला एकटीला टाकून जाणें मला शक्य नाहीं. मी त्यांना पत्र पाठवून बोलावलें आहे.'

'काय?' माणिकनें एवढेंच विचारून मजकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांतले अश्रु डोळ्यांत थबकले, रडतां रडतां हंसू गालावर आलें, आनंद नाचला! समाधानाची, दुःखाची कीं कसली तरी विचित्र अशी लकेर डोळ्यांत चमकून गेली! मी तिच्याकडे तटस्थ पहात राहिलों!

'बरं!' किती तरी उशीरानें मजकडे न पाहतां, वर आकाशाकडे लय लावून माणिकनें शब्द उच्चारला! खऱ्या मायेचीं माणसें जवळ असल्याखेरीज माणिकला त्या स्थितींत एक क्षणभर तरी ठेवणें शक्य होतें का?

"मनोहर, उद्यां तूं जाणार?"

"हो—"

"शकूनें, सुमननें, माझ्याबद्दल विचारलें तर काय सांगशील त्यांना?"

" काय सांगूं ? " मला गहिंवर आवरेना !

" मी सांगूं का ? "

" हं ! "

" माझीं पत्रं वाचायची त्यांना फार हौस होती. आजवरची माझीं पुष्कळ पत्रं त्याच्याजवळ असतील. तुझ्याजवळ त्यांना एक पत्र द्यावेंसें वाटतें ! माझी आपली शेवटची तेवढीच आठवण त्याच्याजवळ राहील ! नाहीं तरी आतां मी त्यांना दुसरें काय देणार आहें ? "

" मग दे पत्र ! "

" पण पत्र लिहायला शक्ति कुठें आहे ? मी सांगेन, तूं लिहून घेशील का ?"

मी होकारार्थी मान हलविली. तिला त्यांतही आनंद झाला. लगेच तिनें लेखनसाहित्य घ्यावयाला मला सांगितलें.

किती तरी वेळ ती सांगत होती आणि मी लिहीत होतों. ती शांतपणानें सांगत होती. मी पत्र लिहित होतों. माझ्या डोळयांतील पाणी कागदावर पडून लिहिलेलीं अक्षरें त्या पाण्यानें वाहून जात होतीं !

दुसऱ्या दिवशीं सकाळींच मी माणिकचा निरोप घेतला ! अतृप्त लोचनांनीं तिला पहात होतों, तिची मंगल मूर्ति डोळयांत सांचवून घेत होतों; प्रत्येक शब्दाचा मोती कानांत सांठविण्यासाठीं मी धडपडत होतों ! ती रडली–मी तर ओक्साबोक्सीं रडत होतों. रडतरडतच वाड्याच्या बाहेर पडलों ! दुर्दिन ! दुर्दिन ! त्या दिवसापासून एकसारखे दुर्दिनच होते आणि ते आतां अखेरपर्यंत आमच्या सहवासाला रहावयाचे होते !

माणिक आमच्यांतून गळल्यावर दुर्दिनाशिवाय आमच्या नशिबीं काय येणार ? पूर्वजन्मींचें आमचें असें कोणतें भयंकर पातक असेल कीं त्याच्या पायीं माणिकसारख्यांना आम्हीं मुकावें ?

माझें शरीर तेथून परत निघालें होतें पण मन मात्र माणिकभोंवतीं घुटमळत राहिलें होतें. देवावरचा विश्वास उडत चालला होता तरी प्रतिक्षणीं त्याचीच अनन्य भावानें प्रार्थना करावीशी वाटत होती कीं, ' देवा, माणिकला बरी कर, तिच्या हातून उदंड सत्कार्य होऊं दे ! '

पण देवाच्या मनांत माणिकविषयीं काय ठरलें होतें हें त्याचा तोच जाणे !

---

# प्रकरण विसावें

## माणिकची अखंड आठवण

मनु, शकू, सुमन, वत्से आणि माझ्या बंधु भगिनींनों!

तुमची आवडती माणिक आज अशी शरपंजरीं पडली आहे. देव-लोकीं उद्यां जाईल; किंवा परवां जाईल. आज देखील असून नसल्या-सारखीच आहे!

बाळपणापासून आपण एके ठिकाणीं बसलों, बोललों, वागलों, खेळलों नाना प्रकारचे बेत केले, मनोरथ रचले, आशा बाळगल्या. देवानें तशी परिस्थितिही थोडीशी दिली. पण मध्येंच हें असें झालें. सुरवातीच्या अगोदरच मी अशी तुमच्यांतून चाललें! देवानें मला इच्छा दिली, हौस दिली, परिस्थितिहि दिली पण त्याबरोबर खंबीर मन, बळकट शरीर आणि बुद्धीला चिवटपणा हीं दिलीं नाहींत! शाळेच्या चिमण्या जगांत आपलें सर्वांचें ठरल्याप्रमाणें उद्यां तुम्हीं सगळीं विद्याविभूषित झाल्यावर, खेड्यापाड्यांतून आपलें आयुष्य वेंचायला जाण्यास तयार व्हाल, त्यावेळीं तुमचीं मनें खंबीर पाहिजेत, शरीरें मजबूत टेविलीं पाहिजेत, चिकाटी शेवटपर्यंत राहिली पाहिजे! खेड्यांत जाऊन रहा-यचं—तिथें काल कंठायचा—तिथली घाण उपसावयाची—तिथला अंधेर घालवून त्या ठिकाणीं नवजीवन निर्माण करायचं—पराक्रमाचा प्रकाश तिथें उधळून द्यायचा—हें सर्व दिसतें तितकें सोपें नाहीं, वाटेल तितकं सहजासहजीं होणारें नाहीं. चार दिवस शहराचा कंटाळा आला म्हणून थारेपालट करण्यासाठीं खेड्यांत सुखानें आराम करायला व तिथल्या अनाथ–अपंगांना चार शिळोप्याच्या आणि शहाणपणाच्या गोष्टी सांगायला जाणें नव्हे! उंटावरून शेळ्या राखण्याचें तें काम नव्हे! ज्ञानार्जनानंतरचे तुमचे ते भावी बेत ठरले आहेत, म्हणून

तुम्हांला सांगावेंसें वाटतें! खेड्यांत जातांना तुम्हांला तुमच्या सुखाच्या कल्पना बदलल्या पाहिजेत, कष्टाची तयारी ठेवली पाहिजे; विरोध उपहास, बेपर्वाई, मूर्खपणा, वेडेपणा याला भितां कामा नये. तेथून परततां कामा नये! तुम्हीं तुमच्याकरितां आहांत यापेक्षां, दुसऱ्याकरितां, गरीबांकरितां आहांत हें तुम्हांला सदैव मनाशीं जागृत ठेवलें पाहिजे, त्यासारखें वागलें पाहिजे! माझा उपयोग आतां तुम्हांला नाहीं तुमचा उपयोग मला नाहीं. नसू द्या. ईश्वराची इच्छाच तशी होती त्याला तुम्हीं—मी काय करणार? मी देहानें तुमच्यांतून जात असलें तरी मनानें मी तुमच्यांतच राहीन. माझा आत्मा तुमच्याच सभोंवतीं हिंडत राहील! तुम्हांला मला प्रत्यक्ष पहावेंसें वाटलें तर गरीब शेतकऱ्यांच्या झोपड्यांत जेथें करुण स्वर तुम्हांला ऐकायला येतील तेथें मी आहें असें समजा व तेथें मला पहा. माझी कसली हौस राहिली असेल असें तुम्हांला वाटून ती पुरवावी असें तुम्हांला वाटत असेल तर खेड्यांच्या आजच्या भयानक परिस्थितीला न घाबरतां तिथें जाऊन राहून तिथल्याकरितां आपल्या ज्ञानाचा, बुद्धीचा, आयुष्याचा उपयोग करून द्या म्हणजे माझी तुम्हीं मोठी हौस पुरवल्यासारखेंच होईल! एवढी पुरवाल ना माझी हौस? तुम्हीं पुरवायची नाहीं तर मग कुणी पुरवायची? तुम्हांला हें मनांतलें गुपीत सांगायचें नाहीं तर कुणाला सांगायचें? माझा अंत असा झाला! माझा बोल कुणावर नाहीं. माझ्या माणसांचा कोणताही अपराध नाहीं! त्यांची बुद्धिच तितकी, त्यांच्या दृष्टीचें जगच तेवढें! तुम्हांला खेड्यांतून थोडी फार अशीच परिस्थिति दिसेल! माझी अखेर पाहून, तुम्हीं घाबरून जाऊन, भिऊन, खेड्यांचें नांव टाकूं मात्र नका! माझ्यासारखी एकच माणिक काय पण अशा माझ्यासारख्या कितीतरी माणिकांना खेड्यापाड्यांच्या सुखापायीं प्राण वेंचावे लागतील. पण त्यांनीं

ते आनंदानें हौसेनें वेंचायला पाहिजेत ! नको का वेंचायला ? खेड्यांत खपण्यांत नांव नाहीं, मोठेपणा नाहीं, कुणी विचारणार नाहीं, कुणी बोलणार नाहीं; कुणी आपला शीण घेणार नाहीं ! पण त्याकरितां का आपल्याला कामें करायचीं असतात ? लोकांकरितां का आपल्याला कांहीं करायचें असतें ? तसें कुणीं विचारलें, शीण घेतला तर नको का असतो आपल्याला ? पण सगळयांच्याच नशिबीं तें कुठून येणार ? आणि नसलें नशिबीं म्हणून काय कांहींच करायचें नसतें ?

माझ्या मनाची विचित्र स्थिति झाली आहे. गोंधळ उडाला आहे. तुम्हांला काय लिहूं आणि किती लिहूं असें झालें आहे पण काय करूं ? जुळवून विचार लिहिण्याचें सुद्धां अशा स्थितींत मला जमेना ! माझें हें शेवटचें पत्र—हो अगदीं शेवटचेंच नाहीं तर काय ? आतां मी जगेन किती आणि लिहिणार केव्हां ? म्हणून माझ्या मनोमंजूषेंत—डोक्याच्या कवटींत जें जें कांहीं आहे, होतें, असेल नसेल तें या वळीं मनोमंजूषा उघडी करून—डोक्याची कवटी पालथी करून—मी आज तुम्हांला लिहीत आहे ? मला जुळवून सांगतां आलें नाहीं तें जुळवून घ्या. चालत्या घडीवर नजर ठेवून चालणारे, आपल्याच पुरतें पहाणारे, दुसऱ्याचे पाय मागें ओढणारे, स्वार्थासाठीं दुसऱ्यांचा संसार उध्वस्त करणारे, सगळया प्रकारचे लोक तुम्हांला खेड्यांत आढळतील; त्या सर्वांना पचनीं पाडून त्यांच्यांवर मात करून तुम्हांला गरीबांसाठीं झगडायचें असेल तर मन व शरीर खंबीर, सुदृढ ठेवा; अल्पसंतुष्ट, चिवट, चिकट बना ! आणि कार्य हातीं घ्या. मला जें साधलें नाहीं तें तुम्हीं साधा परिस्थिति पचनीं पाडा. मी परिस्थिति पचनीं पाडण्याचा प्रयत्न केला पण परिस्थितीनेंच तुमच्या या माणिकला गिळलें आहे ! त्या परिस्थितीवर तुम्हीं सगळयांनीं मिळून विजय मिळविला म्हणजे मी स्वर्गामध्येंडी सुखी होईन ! यापेक्षां आणखी तुम्हांला काय लिहूं !

माझ्या माणसांवर रागावूं नका ! माझ्या माणसांसारखीं जगांत आणखीही माणसें भेटतील त्याच्यावर रागावूं नका! त्यांचा तिरस्कार करूं नका! तर त्यांना वळविण्याकरितां व त्यांचें आयुष्य, त्यांची संपत्ति, गरीबांच्या सुखासाठीं खर्च व्हावींत म्हणून तुमच्या बुद्धीचा, शक्तीचा, युक्तीचा आणि आयुष्याचा उपयोग होऊं द्या. ईश्वरानें मला यश दिलें नाहीं पण तो तुम्हांला तें खचित देईल.

तुम्हां सर्वांची—

**माणिक**

पत्र मला लिहावयाला लावलें होतें. पण पत्रावर सही त्याही स्थितींत माणिकनें स्वतः केली होती ! तोच तिचा अमूल्य ठेवा आमच्याजवळ होता! तीच तिची अखण्ड आठवण आमच्याजवळ राहिली होती!

एक दिवस नित्याप्रमाणें आम्हीं सर्वजण माणिकच्या पत्राचें पारायण आस्थेनें करीत असतांना, माणिकच्याच पत्रांतील ' परिस्थितीनेंच तुमच्या या माणिकला गिळलें आहे ! ' या वाक्यावर आलों, तों त्याच वेळीं टपाकच्या शिपायानें एक पत्र माझ्या अंगावर फेंकलें —

माणिक काळानें गिळल्याचें दुष्ट वृत्त त्यांत होतें !

यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम् ।
त्वया कृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूदन ॥



— समाप्त —